अ ध्या त्म-ग्रं थ-मा ला

(१)

# ज्ञानेश्वरवचनामृत



रा. द. रानडे, एम्. ए.



किंमत रुपये ३-१२-०



व्हीनस बुक स्टॉल : पुणें २

# द्वितीयावृत्तीची प्रस्तावना.

ज्ञानेश्वरवचनामृताची द्वितीय आवृत्ति काढण्याचा सुयोग आज सुमारें पंचवीस वर्षांनीं ईशकृपेनें येत आहे. पहिल्या आवृत्तींत केवळ ज्ञानेश्वरींतून उतारे घेतले होते. ग्रंथास पूर्णत्व यावें या हेतूनें ज्ञानेश्वरांचे 'अमृतानुभव' व 'चांगदेवपासष्टी' हे जे दुसरे दोन ग्रंथ त्यांतून कांहीं उतारे या द्वितीयावृत्तींत घेतले आहेत. या बाबतींत श्री. गणपतराव ऊर्फ काका कारखानीस, व प्रा. शं. गो. तुळपुळे यांनीं मला मदत केली याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. ज्ञानेश्वरांच्या तत्वज्ञानाचें संपूर्ण आकलन होण्याच्या दृष्टीनेंहि या दोन ग्रंथांतील निवडक उताऱ्यांची जरूरी होती. ज्ञानेश्वरवचनामृताच्या पहिल्या आवृत्तीमध्यें भासणारी ही उणीव प्रस्तुत आवृत्तीनें दूर होईल अशी आशा आहे.

अमृतानुभवांतील विचारसरणीविषयीं विद्वानांत मतभेद असले तरी ज्ञानेश्वरांचा हा ग्रंथ तत्वज्ञानाचे दृष्टीनें श्रेष्ठ आहे यांत शंका नाहीं. तसेंच तो समजण्यासहि ज्ञानेश्वरीच्या मानानें थोडा कठिण आहे. हा ग्रंथ वेदांत्यांना अति प्रिय असून आजवर तो अनेक टीका-ग्रंथांचा विषय झालेला आहे, ही एकच गोष्ट अमृतानुभवाची विद्वन्मान्यता सिद्ध करण्यास पुरेशी आहे. या ग्रंथावर ज्ञानेश्वरांच्या परंपरेंतील एक सत्पुरुष शिवकल्याणस्वामी यांनीं शके १५५७ मध्यें रचिलेली 'नित्यानंदैक्यदीपिका' या नांवाची ओवीबद्ध टीका प्रसिद्ध असून अमृतानुभवांतील मर्म उकलून दाखविण्याचे दृष्टीनें ती बहुमोल आहे. तसेंच शके १६२० च्या सुमारास पंढरपूरचे एक सत्पुरुष प्रल्हादबोवा बडवे यांनीं केलेलें अमृतानुभवाचें समश्लोकी संस्कृत भाषांतर, व अगदीं अलीकडे प्रसिद्ध संतकवि श्री. दासगणु यांनीं अमृतानुभवावर रचिलेली ओवीबद्ध मराठी टीका हे दोन्ही ग्रंथ ज्ञानेश्वरांच्या मूळ ग्रंथाच्या अभ्यासास पोषक आहेत. अमृतानुभवाचें मूळचें नांव 'अनुभवामृत' असावें असें स्वत: ग्रंथकारानें आपल्या ग्रंथांत केलेल्या कांहीं उल्लेखावरून वाटतें (अमृ. १०-१९, २०, २४, २५, २९). लौकिकांत मात्र हा ग्रंथ अमृतानुभव याच नांवानें ओळखला जातो. अमृतानुभवावर योगवासिष्ठाचा परिणाम बराच झालेला असून या दोन ग्रंथांत [illegible] साम्य

पुष्कळच आहे. विशेषतः अमृतानुभवांतील ज्ञानेश्वरप्रणीत स्फूर्तिवादास योगवासिष्ठांत आधार मिळतो व या ग्रंथांतील अनेक शब्दप्रयोग, कल्पना, दृष्टांत व सिद्धांत यांचा उपयोग ज्ञानेश्वरांनीं आपल्या ग्रंथाचें कामीं करून घेतल्याचें दिसून येतें.

अमृतानुभवाच्या अंतरंगाचा विचार करतां ज्ञानेश्वरीप्रमाणें या ग्रंथांतहि सद्‌गुरुमहिमा मुक्तकंठानें गायिलेला दिसून येतो. विशेषतः अमृतानुभवांतील दुसरें प्रकरण मुख्यतः गुरुवर्णनपर असून त्यांत ज्ञानेश्वरांनीं आपलें अलंकारचातुर्य जणुं एकवटलेलें दिसतें. श्रीनिवृत्तिनाथांना निमित्तमात्र करून ते म्हणतात, कीं सद्‌गुरु हा साधकानें लावलेलें भक्तीचें उपायवन फुलविणारा वसंतऋतु असून गुरु हा गुप्तरूप किंवा अमूर्त असला तरी तो मूर्तिमंत कारुण्यरूपच होय. अविद्येच्या आडरानांत वाट चुकलेल्या असहाय जीवांची हांक ऐकून तो धांव घेतो, आणि मायाकुंजरास मारून त्याच्या गंडस्थलांतील अनुभवरूपी मुक्तमोत्यांचें जेवण तो त्या जीवांना घालतो. सद्‌गुरु हा आत्म्यास आत्मसुख दाखविणारा आरसाच असून गुरुकृपा ही जणुं आत्मबोधरूपी चंद्राच्या विखुरलेल्या कला एकवटणारी पौर्णिमाच आहे. तो भेटतांच सर्व उपायांची धांव खुंटते आणि गुरुकृपेच्या सागरास मिळणारी प्रवृत्तिगंगा आपोआप स्थिरावते. गुरुकृपेच्या उदकांत स्नान केलें असतां जीव इतका पवित्र होतो, कीं त्याला प्रत्यक्ष शिवपणहि ओवळें वाटूं लागतें. सद्‌गुरु हा उघड असूनहि दिसत नाहीं आणि सर्वत्र असूनहि कोठें नाहींसा झाला तें कळत नाहीं. तो गुप्तरूप असल्यानें सहजच शब्दातीत, अनुमानातीत आणि प्रमाणातीत आहे. किंबहुना, प्रमाणें जेव्हां सरतात, तेव्हांच गुरुरूपी प्रमेयाचा अविष्कार होतो. शेवटीं ज्ञानेश्वर म्हणतात, कीं डोळा दर्पणावांचून स्वतःस पाहूं शकत असेल तरच गुरुस्वरूपाची लीला यथार्थपणें सांगतां येईल (अमृ. क्र. १).

तत्त्वज्ञानाचे दृष्टीनें पाहतां ज्ञानेश्वरांनीं अमृतानुभवांत वर्णिलेलें परमात्मस्वरूप विवेचनीय आहे. परमात्म्याचें स्वरूप सच्चिदानंदातीत आहे हें सांगतांना ज्ञानेश्वर म्हणतात, कीं वर्षून गेलेला मेघ, समुद्रास मिळालेला प्रवाह, प्राप्य स्थळ दाखवून मागें राहिलेला मार्ग, फळास

जन्म देऊन सुकलेलें फूल, रसनिर्मिति करून नाहीसें झालेलें फळ, रसिकास तृप्तीचें सुख देऊन आटून गेलेला रस, मुखास मुख दाखवून मागें सरणारा आरसा, किंवा निद्रितास जागें करून स्वत: दूर जाणारें माणूस, हीं सर्व ज्याप्रमाणें निवृत्त होतात, त्याप्रमाणें सत्, चित् व आनंद हीं तिन्हीं पदें द्रष्ट्यास द्रष्टा दाखवून स्वत: मौनाच्या वाटेस लागतात (अमृ. क्र. २). ज्ञानेश्वरांची वरील विचारसरणी पाहत असतां शंकराचार्यांच्या 'आनंदमयोऽभ्यासात्' या सूत्राची सहजच आठवण होते. आनंद हा ईश्वरस्वरूप आहे कीं तो ईश्वराचा गुण आहे हा वाद जुना असून या बाबतींत शंकराचार्य व रामानुजाचार्य यांचीं मतें परस्परविरोधी आहेत. रामानुज आनंद हा ईश्वराचा गुण मानतात, तर शंकराचार्य ईश्वर आनंदरूप समजतात. शंकराचार्यांचें पुढील वचन उल्लेखनीय आहे.

"अन्नप्राणमनोमयविज्ञानानंदपंचकोशानाम् ।
एकैकान्तरभाजां भजति विवेकात् प्रकाशतामात्मा ॥"

परमात्मस्वरूपासंबंधीं ज्ञानेश्वरांनीं व्यक्त केलेले विचार शंकराचार्यांच्या वरील मताशीं ताडून पाहण्यासारखे आहेत. असो जग म्हणजे चिद्विलास किंवा 'जग अस्तिकी वस्तुप्रभा' हा सिद्धांत मांडतांना ज्ञानेश्वर म्हणतात, की जगद्रूपानें प्रकट होण्यांत त्या स्वयंप्रकाश परमात्म्याच्या एकत्वास यत्किंचितहि बाध येत नाहीं. प्रतिबिंबानें मूळ वस्तूचें, तरंगांनीं जळाचें, किंवा किरणांनीं सूर्याचें एकत्व जसें बिघडत नाही, तद्वत् विश्वरूपानें मूळ परमात्म्याच्या ऐक्याचें सूत कधींहि तुटत नाहीं. विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं सर्व एका परब्रह्माच्या ठिकाणीं होत असलीं तरी हा सारा खेळ एका निमिषांत घडून येतो. आतां विश्वाचा लय आणि त्याची पुनरुत्पत्ति यांमधील जी अवस्था तीच परब्रह्माची सहजावस्था होय. निद्रा संपली आहे पण जागृति आलेली नाहीं अशा संधींतील जी आपली स्थिति तशीच ही परब्रह्माची सहजावस्था होय. या अवस्थेस ज्ञानेश्वर 'निकराचा आत्मभाव' असें म्हणतात. या स्थितींत पाहणें आणि न पाहणें हीं दोन्हीं सारखीच

निरर्थक ठरतात. सर्वांगांनीं देखणा असा सूर्य स्वतःचे उदयास्त पाहतो किंवा पाहत नाहीं हें म्हणणें जसें खोटें, त्याप्रमाणें सहजावस्थेंतील परमात्मतत्व हें ज्ञानाज्ञानातीत आहे. तात्पर्य, परमात्मा हा 'स्फूर्तिमात्र' असून स्वतः विश्वरूपानें फांकत असतांहि आपल्या एकपणास न मुकणयाची त्याची आत्मलीला खरोखर अपूर्व आहे. याप्रमाणें ' ययाचिये तुळे । हाचि यया ' अशा निरुपमपरीनें आत्मा आपल्या विलासानें आपल्याच ठायीं राणीव करीत आहे, असें ज्ञानेश्वर म्हणतात ( अमृ. क्र. ३ ). पुढें परमात्म्यास चिदादित्य कल्पून त्याचें ज्ञानाज्ञानातीत स्वरूप वर्णितांना ज्ञानेश्वर म्हणतात, कीं ज्ञान हें अज्ञानाचा नाश करितें खरें; पण अग्नीनें कापुराबरोबर स्वतःसहि जाळून घ्यावें त्याप्रमाणें अज्ञाननाश करण्यांत ज्ञान स्वतःच नष्ट होतें. तरंगाचें रूपास येणें हेंच जसें त्याचें निमणें, किंवा विजेचा उदय हाच जसा तिचा अस्त, त्याप्रमाणें ज्ञानाची वाढ हाच त्याचा नाश होय. कारण सूर्यास ज्याप्रमाणें तेज-तम हीं सारखींच, त्याप्रमाणें आत्मज्ञानाच्या दृष्टीनें पाहतां ज्ञान व अज्ञान असा भेदच नाहीं. याप्रमाणें ज्ञानाज्ञानाचा निरास करून चिद्गगनांत उदयास येणाऱ्या चिदादित्याचें आकलन करण्याचा प्रयत्न करणें हें स्वतःच्या छायेपलीकडे उडी मारण्याप्रमाणें व्यर्थ होय असें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे. यापुढें जाऊन ते म्हणतात, कीं ज्या आत्मस्थितींत आपले गुरु श्रीनिवृत्तिनाथ यांनीं आपणास आणून ठेवलें ती स्थिति वाचेच्या हातीं देणें अशक्य आहे कारण आत्मस्थिति वर्णन करणारी वाक्सृष्टि अद्यापि निर्माणच झालेली नाहीं ( अमृ. क्र. ४ ). ही ब्रह्मनिष्ठावस्था ज्यास प्राप्त झाली आहे त्याचीं चिन्हें अमृतानुभवांतील नवव्या प्रकरणांत आलीं आहेत. तेथें ज्ञानेश्वर म्हणतात, कीं शेवंतीच्या फुलाचें एकपण जसें त्या फुलाच्या सहस्र पाकळ्यांनीं बिघडत नाहीं, त्याप्रमाणें आत्मज्ञानी पुरुषाच्या आत्मस्थितींत त्याच्या विषयोपभोगामुळें खंड पडत नाहीं. दृष्टि आरशावर पडतांक्षणी तिला दृष्टिच दिसावी, त्याप्रमाणें आत्मस्थिताच्या इंद्रियवृत्तीचे विषयाकडील धांवे त्या विषयांसकट आत्मरूप होतात. हातास स्पर्श, डोळांस रूप व जिव्हेस माधुर्य अशा विविध रूपांनीं अनुभवास येणारा कापूर जसा तत्वतः केवळ परिमलरूप असतो, त्याप्रमाणें विषयेंद्रियांच्या वैचित्र्यांत

आत्मस्थितीच्या दृष्टीनें एक परब्रह्मच स्फुरत असतें. चंद्रावर चांदणें पडावें किंवा समुद्रावर वर्षाव व्हावा, त्याप्रमाणें त्याच्या विषयेंद्रियांचे सर्व व्यवहार होत असतात. उसाचीं भिन्न भिन्न पेरीं हीं जशीं तत्वतः एक-रसात्मक होत, तसा आत्मज्ञाचा व्यवहारहि केवळ ब्रह्मरूप होय. बोलण्यानें त्याचें मौन मोडत नाहीं किंवा व्यापार करण्यानें त्याची अक्रिया बिघडत नाहीं. त्याची अद्वैतदशा आपण होऊन द्वैताच्या अंगणांत येते व जों जों भेद अधिक तों तों त्याच्या दृष्टीनें अभेदाची दुणी म्हणजे वाढच होते. अशा रीतीनें त्याची विषयसेवा कैवल्यावरहि मात करते व अभेदभक्तीच्या घरांत भृत्य आणि भज्य यांचा कालोवा होऊन जातो ( अमृ. क्र. ५ ). या अभेदभक्तींत, ज्ञानेश्वर म्हणतात, देवच भक्त होतो व देवाच्या दाटणीनें देऊळ आटून जातें. अशा स्थितींत जपध्यानादि उपचारहि ईश्वरस्वरूप होऊन गेल्यामुळें येथें देवच देवास देवानें भजतो असें म्हणावे लागतें. एकच डोंगर कोरून त्यांतून देव, देऊळ व परिवार हीं सर्व निर्माण करावीं, त्याप्रमाणें हा अभेदभक्तीचा व्यवहार घडत असतो. किंबहुना, ज्ञानी भक्त हा देवास अभेदभावानें भजतो किंवा भजत नाहीं ही दोन्हीं बोलणीं सारखींच व्यर्थ होत. कारण परमात्म्याच्या ठायीं निंदा ही स्तुति व स्तुति ही निंदा असून या दोहींची परिणति तेथें एका मौनांत होते ( अमृ. क्र. ६ ). म्हणून अमृतानुभवाचा समारोप करतांना ज्ञानेश्वर म्हणतात, कीं श्रीनिवृत्तिरायाच्या कृपाशीर्वादानें लाभलेलें हें सुख वास्तविक मीं निवांतच भोगावयाचें; पण महेशानें सूर्याहातीं दिलेल्या तेजाच्या सूत्रामुळें जसा सर्व जगाला प्रकाश मिळाला, त्याप्रमाणें हें माझें स्वतंत्र प्रतिपादन नसून गुरुकृपेच्या दैवी संपत्तीचें हें औदार्य आहे. कारण जें वस्तुतः प्रकटच आहे त्या स्वयंप्रकाशास आमच्या बोलांनीं आणखी प्रकाशित तें काय करणार ? तेव्हां जें सदा उघडच आहे तें पुनः प्रकट करण्याच्या भरीस न पडतां आपल्या वैखरीनें ' मौनाचेंहि मौन ' धरावें हें बरें. किंबहुना, हा केवळ ' सिद्धानुवाद ' असून आपलें व्याख्यान म्हणजे पाण्यावर मकरीचें चित्र काढण्यापैकीच होय. एवंच, प्रत्यक्ष दशोपनिषदेंहि यापुढें पाऊल टाकूं शकत नाहींत असें पाहून आत्मबोधानें जेथें बुडी दिली असें हें श्रीमंत

अनुभवामृत सेवून जीवन्मुक्तहि अनुभवामृतरूप होवोत, असें ज्ञानेश्वर म्हणतात ( अमृ. क्र ७ ).

'चांगदेवपासष्टी' हें एक प्रासंगिक प्रकरण आहे. त्याची रचना आळंदी येथें शके १२१६ चे सुमारास झाली असावी. तापीतीरीं मठ करून राहिलेले महान् हठयोगी चांगदेव यांनीं ज्ञानेश्वरांची कीर्ति ऐकून त्यांना एक पत्र पाठविण्याचें योजिलें. मात्र अनुभवानें थोर, परंतु वयानें लहान अशा ज्ञानदेवास 'आशीर्वाद' लिहावा की 'नमस्कार' लिहावा या संशयांत चांगदेवानें कांहींच न लिहितां एक कोरें पत्र त्यांच्याकडे धाडून दिलें. त्यास उत्तर म्हणून 'चांगदेवपासष्टी' हें ६५ ओव्यांचें प्रकरण ज्ञानेश्वरांनीं लिहिलें. चांगदेवपासष्टी हें एका दृष्टीने अमृतानुभवाचें सार आहे असें म्हटल्यास हरकत नाहीं. त्यांत प्रारंभींच परमात्म्याला श्रीवटेश असें संबोधून त्याच्या ना 'प्रकट ना लपाला' अशा आत्मस्थितीचें वर्णन आलें आहे. विश्वस्फूर्ति ज्यास झांकत नाहीं असा हा परमात्मा 'आपणिया आपण' सन्मुख होतो व हें त्याचें आत्मदर्शन आरशांत स्वतःचें प्रतिबिंब पाहण्याप्रमाणें 'वायांचि देखणें' नव्हे, असें ज्ञानेश्वर म्हणतात ( चां. क्र. १ ). आपण आणि चांगदेव यांतील अद्वैत त्यांनीं फारच बहारीनें वर्णिलें आहे. तळहातानें तळहातास मिठी द्यावी, किंवा सोन्याचा कस सोन्यानेंच पारखावा, त्याप्रमाणें आपणां दोघांतील हा संवाद असून आपण एकमेकांस मुकेपणानेंच भेटणार असें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे. किंबहुना, मिठानें पाण्याचा ठाव घेऊं पाहण्याच्या प्रयत्नांत स्वतःच नामशेष व्हावे, त्याप्रमाणें आत्मस्वरूप अशा चांगदेवास भेटों गेलें असतां आपणा दोघांची स्वतःसिद्ध असणारी भेट बिघडून जाईल अशी ज्ञानेश्वरांस भीति वाटते. याप्रमाणें स्वानुभवरसाळ असें हें काव्यरूपी खाद्य आपणांस श्री 'निवृत्तिमाउली' कडून चांगदेवाच्या निमित्तानें ज्ञानदेवांकरवीं लाभलें आहे. तें श्रोत्यांच्या हातीं देतांना आपल्या अधिकारपूर्ण वाणीनें ज्ञानेश्वर म्हणतात, कीं ज्ञानदेव व चक्रपाणी हे जणुं दोन डोळस आरसेच होत व परस्परांस पाहतांना ते भेदभावास मुकून एकरूप झाले आहेत. या अभेदाच्या भूमिकेवरून जो कोणी या ओव्या दर्पणरूप करील त्यास आत्म्याएवढें सुख प्राप्त होईल, असें ज्ञानेश्वरांचें आश्वासन आहे. ( चां. क्र. २ )

रा. द. रानडे

# ज्ञानेश्वरवचनामृत.



## प्रस्तावना.



१. श्रीज्ञानेश्वरांच्या चरित्राचा विचार करण्याच्या अगोदर तीन गोष्टींचा आपल्यास येथें अल्पमात्र विचार कर्तव्य आहे: (१) ज्ञानेश्वरकालीन ऐतिहासिक स्थिति; (२) ज्ञानेश्वरकालीन वाङ्मयस्थिति; (३) ज्ञानेश्वरकालीन धार्मिक स्थिति. ज्ञानेश्वरकालचें महाराष्ट्र म्हणजे एक सुखसंपन्न महाराष्ट्र होतें. भिल्लमापासून चालत आलेल्या यादववंशांत निर्माण झालेला रामदेवराव हा देवगिरी येथें राज्य करीत होता. ज्ञानेश्वरांनीं त्याचें " यदुवंशाचा विलास, सकळकळांचा निधि, व न्यायातें पोसणारा " असा गौरवानें उल्लेख केला आहे ( क्र. १ ). ज्ञानेश्वरकालीं अद्याप मुसलमानांची स्वारी महाराष्ट्रांवर झाली नव्हती. नानापंथ, नानामतें हीं जरी निर्माण झालीं होतीं, तरी तीं हिंदुधर्मांमधीलच होतीं. रामदेवरावाचा हेमाडपंत या नांवाचा एक मोठा मुत्सद्दी, व हुषार कारभारी होता. त्याच्या अमदानींत सर्व कलांना, विद्यांना, व धर्मालाही फार उत्तेजन मिळालें. रामदेवरावाची कारकीर्द शके ११९३ पासून शके १२३१ पर्यंत झाली. ज्ञानेश्वरांचा जन्म व रामदेवाची कारकीर्द हीं जवळजवळ समकालीनच होतीं असें म्हटलें तरी चालेल. ज्ञानेश्वरांनीं आपला ज्ञानेश्वरी ग्रंथ " शके बाराशतें बारोत्तरें " मध्यें लिहिला हें प्रसिद्धच आहे. ज्ञानेश्वरांचा समाधिकाल व्हावयाच्या अगोदर म्हणजे शके १२१८ च्या अगोदर दोनच वर्षें म्हणजे शके १२१६ मध्यें, अल्लाउद्दीन खिलजी हा देवगिरीवर स्वारी करण्याच्या उद्देशानें अचलपूर अगर एलिचपूर येथपर्यंत आपलें सैन्य घेऊन आला; परंतु रामदेवरावानें

नजराणा देऊन त्यास परत पाठविलें. म्हणजे, ज्ञानेश्वरांचा समाधिकाल होईपर्यंत अद्याप मुसलमानांचा अंमल दक्षिणेंत मुळींच बसला नव्हता. ज्ञानेश्वरांच्या समाधीनंतर दहा वर्षांनीं म्हणजे शके १२२८ मध्यें अल्लाउद्दीन खिलजीनें मलीक काफरास ३०,००० घोडेस्वार देऊन रामदेवरावावर पाठविलें, व त्याचा पराजय करून त्यास दिल्लीस कैद करून नेलें. रामदेवराव सहा महिने तेथें राहून नंतर परत आला, व तो शके १२३१ सालीं निवर्तला. देवगिरीचें राज्य शके १२४० पर्यंत कायमचें मुसलमानांच्या ताब्यांत गेलें नाहीं.

२. आतां ज्ञानेश्वरकालीन वाङमयाची परिस्थिति कशी होती तें आपण थोडक्यांत पाहूं. मुकुंदराज या नांवाचा जो संतकवि होऊन गेला त्यानें आपल्या 'विवेकसिंधु' च्या अकराव्या अध्यायाच्या शेवटीं "शके अकरा दाहोत्तरू । साधारण संवत्सरू" मध्यें आपला ग्रंथ लिहिला असें सांगितलें आहे. हाच महाराष्ट्रवाङमयांतील उपलब्ध असलेला वेदांतानुभवप्रधान पहिला ग्रंथ होय असें म्हणावयास हरकत नाहीं. मुकुंदराजाचा 'परमामृत' हा ग्रंथही फारच उत्कृष्ट आहे; व त्यावरूनच कदाचित् ज्ञानेश्वरांनीं अमृतानुभव अगर अनुभवामृत हें नांव आपल्या ग्रंथास दिलें असेल. या परमामृत ग्रंथांतील बाराव्या प्रकरणांत स्वानुभवसुखाचें फार बहारीनें वर्णन केलें आहे. "स्वेदकंपादि उठती । अष्टसात्त्विक भाव प्रकटती । पावे साम्राज्यसंपत्ती । रंक जैसा" (१२. १); "परम सुखाचेनि भरे । एकही स्फूर्ति न स्फुरे । कार्यजाती विसरे । निमिष्यांत" (१२. १०); "गुरुसांप्रदायाची वाट । न धरितां करिशी प्रगट । तरी गुज घेऊनी चावट । होतील बहु" (१४. २१) वगैरे ओंव्या फारच चांगल्या आहेत. या ग्रंथाची भाषा थोडी बहुत आधुनिक दिसते. पण ग्रंथकार-भेदामुळें भाषाही भिन्न होऊं शकतात. तथापि मुकुंदराजापेक्षां सुद्धां 'महानुभावपंथ' अगर 'महात्मापंथ' यांतील ग्रंथकारांच्या भाषा-शैलीशीं ज्ञानेश्वरांची भाषा फार जुळते. अलीकडे रा. विनायक लक्ष्मण भावे यांनीं महानुभावपंथासंबंधीं जी माहिती प्रसिद्ध केली आहे तीवरून

पाहतां ज्ञानेश्वरीरचनेच्या पूर्वी भाषाशैली व विचारशैली कशी असावी यांचें अनुमान आपल्यास काढतां येण्याजोगें आहे. महानुभावपंथाचे सर्व ग्रंथ छापून निघावयास पाहिजेत; तथापि उपलब्ध असलेल्या माहितीवरून सुद्धां महाराष्ट्रभाषेच्या वाङमयांत महानुभाव पंथानें बरीच भर टाकिली आहें असें अनुमान काढलें अगतां वावगें होणार नाहीं. या महानुभाव पंथाचा उत्पादक चक्रधर यास शके ११८५ मध्यें संन्यासदीक्षा मिळाली, व शके ११९४ मध्ये तो हा प्रांत सोडून बद्रिकाश्रमीं गेला. याचे जरी ग्रंथ प्रत्यक्ष उपलब्ध नाहींत, तथापि त्याच्या शिष्यमंडळींपैकी पुष्कळांनीं ग्रंथरचना करून ठेविली आहे. महींद्रभट या नांवाच्या त्याच्या शिष्यानें ‘ सिद्धांतसूत्रपाठ ’ या नांवाचा एक ग्रंथ केला आहे; त्यांत चक्रधराच्या तोंडचीं वचनें उद्धृत केलीं असून तीं १६०९ आहेत, व तीं सर्व मराठींत आहेत. “ पुरुषू जंवं जंवूं पळे । तंवं तंवूं विषो पाठीं लागे । पुरुषू जंवं जंवूं पाठीं लागे । तंवं तंवूं विषो पळे ” अशा प्रकारचीं हीं सूत्रें आहेत. चक्रधराच्या शिष्यांपैकीं भास्कर यानें शके ११९१ मध्यें ‘ शिशुपालवध ’ हा ग्रंथ रचला. “ चाउली पडली अंतःकरणी । तव म्हणे रुक्मिणी । हा गे कवण आंगणीं । चाहाळ काइसा ” अशा प्रकारच्या त्यांच्या ओंव्या आहेत. ज्यांचे शक उपलब्ध आहेत अशा इतर ग्रंथकारांपैकीं केशवराजसूरि यानें शके १२०६ त ‘ मूर्तिप्रकाश ’ या नांवाचा ग्रंथ रचला. “ कीं भरौनि नित्य सुखाचा ताटीं । मिया ठेविली ब्रह्मरसाची वाटी । तै सुमनें लावोनि वोठीं । पान करितु ” अशा प्रकारच्या त्याच्या ओंव्यांचा मासला आहे. व सरासरी ज्ञानेश्वरी रचनेच्या समकालीन म्हणजे शके १२१३ मध्यें नरेंद्रपंडित यानें ‘ रुक्मिणी-स्वयंवर ’ या नांवाचा आपला ग्रंथ संपविला. “ म्हणोनि उपसाहावें सकळ श्रोतां । म्यां वर्णिली श्रीकृष्णकथा । जे पूर्वीं व्यासादिकांशीं कथितां । आली होती पुराणश्रुती ” हा एक त्याच्या ओंव्यांचा मासला आहे. या सर्व ओंव्यांचें ज्ञानेश्वरांच्या ओंव्यांशी किती साम्य आहे हें तज्ज्ञ वाचकांस सहज दिसून येईल. एकंदरींत पहातां महानुभावपंथ विठ्ठलसांप्रदायापेक्षां कितीही भिन्न असला, तथापि त्या सांप्रदायानें मराठींतील काव्यरचना बरीच वाढविली हें खास.

३. ज्या परमार्थसांप्रदायामध्यें ज्ञानेश्वर निर्माण झाले तो सांप्रदाय म्हणजे नाथपंथाचा सांप्रदाय होय. ज्ञानेश्वरांनीं क्रमांक २ मध्यें आपला सांप्रदाय मत्स्येंद्र, गोरक्ष, गहिनी यांपासून कसा आला याचें फार सुंदर वर्णन केलें आहे. या नाथांचें राहण्याचें मूळचें स्थान कोणतें याद्दल अद्याप निश्चित निकाल झालेला नाहीं. बंगाल देशामध्यें, हिंदी प्रांतामध्यें, महाराष्ट्रदेशांत, जेथें तेथें मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ, इत्यादिकांच्या कथा सारख्याच ऐकूं येतात. त्यावरून हे नाथ अमुकच प्रांतांत मूळ होते असें सांगणें कठीण आहे. जालंधरमैनावतीची गोष्ट बंगाली दिसते. गोरक्षांचीं कांहीं पदें हिंदी भाषेंतही आहेत. आपल्याकडे महाराष्ट्रांत सातारा जिल्ह्यांत मत्स्येंद्रगड या नांवाचा डोंगर, व गोरक्षचिंच या नांवाचें झाडही या नाथांच्या स्मरणार्थ दाखविलें जातें. गोरक्षांची समाधि नगर जिल्ह्यांत नेवाशाजवळ एका डोंगरांत दाखवितात. नाशिक जिल्ह्यांत त्र्यंबकेश्वरीं गहिनीनाथांचा मठ प्रसिद्धच आहे. ज्ञानेश्वरांच्या लिहिण्यावरूनही त्र्यंबकेश्वराजवळच्या सप्तशृंग डोंगरावर मत्स्येंद्रनाथांनीं भग्नावयव चौरंगीनाथांस संपूर्णावयव केलें असें दिसतें ( क्र २ ). गोदावरीच्या उगमाजवळ ब्रह्मगिरीवर गोरक्षांची गुहा अद्यापि दाखविली जाते; व त्यांत एक लिंगही आहे. एकंदरींत इतकी गोष्ट खरी कीं, या नाथांचें मूळचें वसतिस्थान कोठलेंही असो, निवृत्तिज्ञानेश्वरांदिकांस त्यांची भेट नाशिकजवळच झाली असावी. ज्ञानेश्वरांचे पणजे त्रिंबकपंत यांस आपेगांव येथें गोरक्षनाथांनीं, व आजे गोविंदपंत यांस गहिनीनाथांनीं, उपदेश दिल्याचे उल्लेख आहेत. गोरक्षांचे ' गोरक्षसहिता ' वगैरे संस्कृत ग्रंथ प्रसिद्धच आहेत तथापि रा. चांदोरकर यांनीं मिळविलेलें, व रा. भावे यांनीं ज्याचा उल्लेख केलेला आहे असें, गोरक्षांचें 'अमरसंवाद' या नावाचें प्रकरण मराठींतही उपलब्ध आहे. यांत पृष्ठमात्रा, शद्बांची जुनी रूपें, वगैरे असल्यानें हें पुस्तक अकराव्या शतकांतलें असावें असें रा. भावे यांचें मत आहे. " आकाशकुसमीं जरी परिमळ भेटे। नातरी नाथलिये वांझेचें लेंकरूं त्रिभुवन भोगी। ससेंचेया सीगें तिषटें। हें बोलणेंचि ल्टिकें " या प्रकरणांतील ओंवींपासून ज्ञानेश्वरींतील कल्पनांस मूलभूत होण्यास हें प्रकरण कसें योग्य आहे हें दिसून येईल. ' गोरक्षगीता ' या

नांवाचें जें आणखी एक प्रकरण उपलब्ध आहे, त्यांत गोरक्षनाथांचा व गहिनीनाथांचा संवाद असल्यानें त्याचें कर्तृत्व गहिनीनाथांकडे येतें, असें रा. भावे यांचें मत आहे. गहिनीनाथांच्या या ग्रंथांत "तेणें कामशक्ति खुंटली। मग वायूतें ऊर्ध्वगति जाली। आला मणिपुराजवळी। देखिली बाळी कुंडली॥ वेढे येकायेकीं उकली। बहुतां दिवसांची असे भुकेली। ऊर्ध्व होऊनी मुखें गिळी। व्हाटुळी गा" या ओंव्यांवरून ज्ञानेश्वरींतील योगविषयक कल्पनांचें व या प्रकरणांतील कल्पनांचें किती साम्य आहे हें तज्ज्ञ वाचकांस सहज दिसून येईल. ज्ञानेश्वरांनी मत्स्येंद्र, गोरक्ष, व गहिनी या सर्वांचा उल्लेख ज्ञानेश्वरीच्या अखेरीस आपली जी गुरुपरंपरा दिली आहे तींत केला आहे. मत्स्येंद्रनाथांनी आपण 'अव्यत्यय समाधि' भोगावी या हेतूनें गोरक्षनाथांस आपला सांप्रदाय वाढविण्याविषयीं अधिकार दिला. गोरक्षनाथांनीं तें आपलें 'शांभव वैभव' गहिनीनाथांस दिलें. गहिनीनाथांनीं मोठ्या कृपळुपणानें 'कलीमध्यें निमग्न झालेल्या लोकांस यानें सोडवावें' म्हणून आपलें सर्व आत्मज्ञान निवृत्तिनाथांस दिलें. व निवृत्तिमेघापुढें मी चातक आपली चोंच पसरून बसल्यानें त्यांतील दोनचार थेंबच माझ्या चोंचींत आले आहेत असें ज्ञानेश्वरांनीं मोठ्या नम्रपणानें म्हटलें आहे (क्र २).

४. वर आपण त्रिंबकपंतांस गोरक्षनाथांचा उपदेश मिळाला म्हणून लिहिलें आहे ते त्रिंबकपंत ज्ञानदेवाचे पणजे होत. शके ११२९ मध्यें हे हयात असून बीड परगण्याच्या मुख्य अधिकाऱ्याचें काम त्यांजकडे असावें असें दिसतें. त्यांचे चिरंजीव गोविंदपंत यांस गहिनीनाथांचा उपदेश झाल्याचा उल्लेख आहे. यावरून ज्ञानेश्वरांस नाथपंथाचें बाळकडू आनुवंशिक संस्कारांमधूनच मिळालें असावें असें दिसतें. ज्ञानेश्वरांचे वडील विठ्ठलपंत हे या गोविंदपंतांचे चिरंजीव होत, व पैठणनजीक गोदावरीच्या उत्तरेस आपेगांव या नांवाचें जें गांव आहे त्याचें कुलकर्णीपण यांजकडे असे. यांची वृत्ति प्रथमपासूनच वैराग्यशील होती. तथापि हे एकदां आळंदीस गेले असतां तेथील कुलकर्णी सिधोपंत यांस हा वर पसंत पडून त्यांनीं आपली कन्यां रखुमाबाई यांस दिली. कांहीं वर्षें प्रपंच केल्यावर त्यांस पुत्ररत्न होईना

म्हणून, त्यांचें आधीचेंच वैराग्य प्रज्वलित होऊन बायकोकडून पडत्या फळाची आज्ञा घेऊन ते काशीस जाऊन रामनंदस्वामी यांस भेटले, व त्यांजकडून त्यांनीं संन्यासदीक्षा मिळविली. इकडे रखुमाबाईस व सिधोपंतांस विठ्ठलपंतांचें मुळींच वर्तमान कळेना, म्हणून तीं अंतःकरणांत खिन्न होऊन राहिलीं. कर्मधर्मसंयोगानें रामानंदस्वामी तीर्थयात्रेस जात असतां आळंदी हें प्रसिद्ध क्षेत्र असल्यानें त्यांचा तेथें मुक्काम पडला. त्यावेळीं रखुमाबाई व सिधोपंत यांजकडून सर्व वर्तमान कळून त्यांस वाईट वाटलें, व काशीस गेल्यावर विठ्ठलपंतांस त्यांनीं परत प्रपंचांत जाण्यास सांगितलें. त्यांच्या आज्ञेप्रमाणें विठ्ठलपंत परत आले, व त्यांस निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई हीं अनुक्रमें चार मुलें आपेगांव येथें झालीं. जनाबाईचा एक अभंग उपलब्ध आहे त्याबरहुकूम पाहिलें असतां निवृत्तीचा जन्म शके ११९० मध्यें होऊन पुढें तीन तीन वर्षाच्या अंतरानें म्हणजे शके ११९३ मध्यें ज्ञानदेवांचा, ११९६ मध्ये सोपानांचा, व ११९९ मध्यें मुक्ताबाईचा अनुक्रमें झाला. या जन्मसंवत्सरांपेक्षां निवृत्तिनाथांचा जन्म शके ११९५ मध्यें होऊन त्यानंतर दोन दोन वर्षांनीं म्हणजे ज्ञानेश्वरांचा शके ११९७ त, सोपानांचा, ११९९ त, व मुक्ताबाईचा १२०१ मध्ये जन्म झाला असें मानण्याची जास्त वहिवाट आहे. याचें कारण असें कीं, ज्ञानेश्वरांनीं बालछंदाच्या आपल्या अभंगांत "बालछंदो बावीस जन्में। तोडिली भवाब्धीची कर्में" अशा रीतीनें आपल्या बाविसाव्या वर्षी झालेल्या समाधीचा उल्लेख केला आहे. आतां ज्ञानेश्वरांच्या समाधिकालासंबधानें तो शके १२१८ सालीं झाला याविषयीं नामदेव, विसोबा खेचर, जनाबाई, व चोखामेळा यांचे ऐकमत्य आहे. यावरून ज्ञानेश्वरांचा जन्म शके ११९७ मध्यें झाला या मतास बळकटी येते. असो विठ्ठलपंत "चैतन्याश्रमवासी" असून "गृहवासी" झाल्यानें त्यांची लोकांनीं थट्टा चालविली. त्यांस व त्यांच्या मुलांस त्यांनी वाळींत टाकलें. त्यामुळें आपल्या मुलांची मुंज व सोडमुंज होईना, म्हणून पुनः वैराग्य उत्पन्न होऊन ते आपल्या चारी मुलांस बरोबर घेऊन त्र्यंबकेश्वरीं ब्रम्हगिरीस प्रदक्षिणा घालण्याच्या उद्देशानें तिकडे गेले. ब्रम्हगिरीस रोज त्यांचा प्रदक्षिणा घालण्याचा क्रम चालू असतां एके दिवशीं झाडींतून

एका वाघानें त्यांच्यावर झडप घातली. त्यावेळीं वाघाच्या तावडींतून आपली सुटका करण्याच्या उद्देशानें ते आपल्या मुलांस घेऊन बाजूस होतात न होतात तोंच निवृत्तीनाथांची व त्यांची चुकामूक पडली. कर्मधर्मसंयोगानें निवृत्तिनाथ तेथून जे गेले ते गहिनीनाथांच्या गुहेंत गेले. ही गुहा अद्याप ब्रम्हगिरीवर दृष्टीस पडते. तेथें त्यास गहिनीनाथांनीं उपदेश देऊन त्यांजवर वरदहस्त ठेविला. तेथून पुढें निवृत्तिनाथ परत येऊन आपल्या भांवंडांस मिळाले. त्यानंतर लौकरच विठ्ठलपंतांचें देहावासन झालें असावें असें दिसतें; पण त्याचा शक उपलब्ध नाहीं. आतां आपल्या सर्व लहान भावंडांची काळजी निवृत्तिनाथांवरच येऊन पडली. याच प्रसंगीं निवृत्तिनाथांकडून ज्ञानेश्वरांस परमार्थाचें रहस्य प्राप्त झालें असलें पाहिजे असें दिसतें त्या सर्व मुलांची बुद्धिमत्ता व परमार्थाचें ओज इतकें जबरदस्त होतें कीं त्यांनीं पैठणच्या ब्राम्हणांकडून, व हेमाडपंत, बोपदेव यासारख्या मुत्सद्दी व विद्वान गृहस्थांकडून शके १२०९ मध्यें शुद्धिपत्र मिळविले. त्यानंतर तीं भावंडें नेवासें येथें आलीं. तेथें सच्चिदानंदबाबा मरणोन्मुख असतां त्यास ज्ञानेश्वरांनीं वांचविलें. या उपकाराच्या स्मृतीनें सच्चिदानंदबाबा ज्ञानेश्वरीचा आदरानें लेखकु झाला. ज्ञानेश्वरी शके १२१२ त लिहिली गेली हें प्रसिद्धच आहे. नेवासे येथें देवालयांतील एका खांबावर नंदादीपाची एक देणगी कोरली आहे या खांबास बसून ज्ञानेश्वरांनीं आपली ज्ञानेश्वरी सांगितली असें म्हणतात. यानंतर निवृत्तिनाथांनीं आतां एक स्वतंत्र ग्रंथ रच असें ज्ञानेश्वरांस सांगितल्यामुळें त्यांनीं अमृतानुभव हा ग्रंथ लिहिला असें म्हणतात. यानंतर ज्ञानेश्वर आपल्या निवृत्ति व इतर भावंडांसहवर्तमान पंढरपुरांस गेले. तेथें नामदेवांची व त्यांची भेट होऊन नामदेवाप्रमाणेंच हेही पंढरीसांप्रदायाचे आद्य आचार्य बनले. निवृत्तिनाथज्ञानेश्वरादिकांनीं जे अभंग रचले ते या प्रसंगानंतरचे असावेत. नंतर शके १२१५ मध्यें ज्ञानदेव व नामदेव यांनी इतर संतांसहवर्तमान उत्तर हिंदुस्थानची यात्रा करण्याचें ठरविलें, व पंढरपुराहून कऱ्हाडच्या मार्गानें जाऊन त्यांनीं हिंदुस्थानांतील पुष्कळ तीर्थें पाहिलीं. दिल्ली व बनारस या गांवांसही ज्ञानदेव व नामदेव गेले असावेत असें दिसतें. तेथून ते जे परत आले, ते शके १२१८ च्या कार्तिक

शुद्ध पौर्णिमेस पंढरपुरास पोंचले. या वेळचा पंढरपुरचा उत्सव फारच अवर्णनीय झाला. त्यानंतर ज्ञानेश्वरांनीं आपली देह ठेवण्याची इच्छा दर्शविल्यावरून ज्ञानदेव व नामदेव इतर संतांसहवर्तमान आळंदीस आले. तेथें कार्तिक वद्य १३ दिवशीं कथाकीर्तन करीत असतां ज्ञानेश्वरांनीं देह ठेविला. "ज्ञानदेवें घेतलें दान। हृदयीं धरूनियां ध्यान। समाधि बैसला निर्वाण। कथा कीर्तन करीतु॥ बालछंदो बावीस जन्मे। तोडिली भवाब्धीची कर्मे। चंद्रार्क तारांगणें रश्में। दान घेतला हरि" असा या समयींचा ज्ञानेश्वरांचा अभंग आहे ज्ञानेश्वरांच्या समाधीवर निवृत्तिनाथांनीं चिरा ठेवला. त्या दु:खाची सरी कोणास द्यावी ? ज्ञानेश्वरांनीं बहुतकरून सिद्धेश्वराकडे तोंड करूनच समाधि घेतली असावी. ज्ञात्यानें समाधीच्या कालीं उत्तराभिमुख बसावें हा नियम ज्ञानेश्वरांस लागू नव्हता. सिद्धेश्वराचें लिंग ज्ञानेश्वरांच्या समाधीच्या पश्चिमेस आहे. पण ज्यास "पूर्वपश्चिमभावच उरला नाहीं" त्यांस उत्तर काय, किंवा पश्चिम काय, दोन्ही दिशा समाधि घेण्यास सारख्याच होत !

५. ज्ञानेश्वरांचे चार प्रसिद्ध ग्रंथ म्हटले म्हणजे ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, अभंग, व चांगदेवपासष्टी हे होत. यांखेरीज त्यांच्या नांवावर मोडणारी आणखींही कांहीं प्रकरणें आहेत, परंतु वरील चारच सर्वांत प्रसिद्ध आहेत. त्यांतल्या त्यांत ज्ञानेश्वरीसारखा अनुभव, काव्य, व तत्त्वज्ञान या तीन्हीं दृष्टीनीं पाहिले असतां मराठी भाषेंत आजपर्यंत ग्रंथ झाला नाहीं, व इतर कोणत्याही भाषेंत झाला आहे किंवा नाहीं याबद्दल शंकाच आहे. ज्ञानेश्वरी ही जरी गीतेवरील एक टीका असली तथापि स्वतंत्र ग्रंथ या नात्यानेंच तिची फार किंमत आहे. या प्रस्तुतच्या ग्रंथांकांत ज्ञानेश्वरीमधूनच उतारें घेतलेले आहेत; व त्यांची विषयवार रचना करून ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान एकंदरींत कसें होतें, हें त्यांच्याच शब्दांत सांगण्याचा प्रयत्न केला आहे. ज्ञानेश्वरींतील अद्वैत म्हटलें म्हणजें भक्तीयुक्त अद्वैत होय. ही अद्वैतांतील भक्ति "अनुभवाचा विषय असून बोलण्याचा विषय नव्हे" असें ज्ञानेश्वरांनींच १८. १९५१ मध्यें सांगितलें आहे. अमृतानुभवाची गोष्ट

जरा किंचित् निराळी आहे. रा. पांडुरंग ज्ञानेश्वर कुलकर्णी यांनीं अमृतानुभवाचा अभ्यास करून त्यांत रामानुजांनीं आपल्या श्रीभाष्यामध्यें शंकराचार्यांच्या मायेच्या विरुद्ध जे आक्षेप घेतले आहेत तेच आक्षेप ज्ञानेश्वरांनीं मायेच्या विरुद्ध अगर अज्ञानाच्या विरुद्ध घेतले आहेत असें दाखविलें आहे. या गोष्टीचा आपण पुढेंमागें केव्हांतरी विचार करूं. आज आपल्यास अमृतानुभवाच्या तत्त्वज्ञानाचा विचार कर्तव्य नसून एकंदरींत ज्ञानेश्वरींतील ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान कसें होतें हेंच पहावयाचें आहे. कांहींकांच्या मतें अमृतानुभव ग्रंथ हा ज्ञानेश्वरांनीं अगोदर लिहिला असून त्यानंतर ज्ञानेश्वरी हा ग्रंथ लिहिला आहे; प्रो. वा ब. पटवर्धन यांचें मत असें आहे. तथापि, एकंदरींत पाहतां अमृतानुभवामध्यें "वैकुंठीचे सुजाणें । ज्ञानपाशीं सत्त्वगुणें । बांधिजे हें बोलणें । बहु केलें" ( ३-१७ ) अशी जी ओवीं आहे तिचा संदर्भ भगवत्गीता १४-६ " सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ " या श्लोकावर जी ज्ञानेश्वरीची व्याख्या आहे तिच्याशीं लागत असल्यानें व तींत सत्त्व गुणानें मनुष्य कसा बांधला जातो याची चर्चा बरीच केली असल्यानें, अमृतानुभव ग्रंथ ज्ञानेश्वरीनंतर लिहिला असावा असें म्हणण्यास बळकट आधार येतो. अमृतानुभवाचें तत्त्वज्ञान एकंदरीत नीरस आहे. रा भावे यांनीं म्हटल्याप्रमाणें " अमृतानुभव हा ग्रंथ म्हणजे एक शुद्ध रसायन आहे; यांत शर्करा नाहीं आणि यास अनुपानही नाहीं. " ज्ञानेश्वरीची गोष्ट वेगळी आहे. उपमा, भाषासौन्दर्य, तत्त्वज्ञान, साक्षात्कार, भक्ति व अद्वैत यांची सांगड, अलौकिक निरीक्षणशक्ति, अप्रतिहत कवित्वशैली, अलोट वाङ्माधुर्य, या सर्व गुणांच्या संमिश्रणानें असा ग्रंथ 'न भूतो न भविष्यति' असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्ञानेश्वरांच्या अभंगांची गोष्ट जवळ जवळ तशीच आहे. त्यांबद्दल आम्ही ग्रंथांक २ यामध्यें विचार करीतच आहों. प्रस्तुत, ज्या ज्ञानेश्वरीच्या आधारानें आम्हीं पुढील उतारे घेतले आहेत ती ज्ञानेश्वरी म्हटली म्हणजे एकनाथांनीं संशोधन केलेली ज्ञानेश्वरी होय. एकनाथांच्या प्रतींत ९००० ओंव्या असून रा. राजवाडे यांनीं शोधून काढिलेल्या प्रतींत ८८९६ ओंव्या आहेत; म्हणजे एकनाथी ज्ञानेश्वरीपेक्षां

राजवाडी ज्ञानेश्वरींत एकशें चार ओंव्या कमी आहेत. भाषेचा जुनेपणा, प्राचीन प्रयोग, जुनें व्याकरण, या दृष्टींनीं ज्ञानेश्वरीचा अभ्यास करावयाचा झाल्यास राजवाडे यांच्या ज्ञानेश्वरीचा फार उपयोग होणार आहे. तथापि, आपलें कार्य हल्लीं ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान काय होतें एवढेंच पहावयाचें असल्यानें तें एकनाथी ज्ञानेश्वरीवरूनही भागणार आहे. शिवाय, सर्वांच्या पाठांत एकनाथी ज्ञानेश्वरीच असल्यानें त्या पाठांचा जितका लोकांस उपयोग होईल तितका दुसऱ्या पाठांपासून होणार नाहीं. या कारणामुळेंच पुढें जे ज्ञानेश्वरींतून उतारे काढले आहेत ते एकनाथी ज्ञानेश्वरीच्या आधारानेंच काढले आहेत.

६. आतां एकंदरींत ज्ञानेश्वरीमध्यें विठ्ठलभक्ति अगर विठ्ठलभक्ति-विषयक उल्लेख नाहींत अशा प्रकारचा जो एक आक्षेप ज्ञानेश्वरीवर घेण्यांत येतो त्याचा आपण थोडासा विचार करून नंतर ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान काय होतें याच्या विचाराकडे वळूं. ( १ ) ज्ञानेश्वरी अध्याय १२ यांत ज्ञानेश्वरांनीं पुढीलप्रमाणें महेशास श्रीविष्णूंनीं डोक्यावर धारण केल्याचें लिहिलें आहे:—

मग याहीवरी पार्था । माझ्या भजनीं आस्था ।
तरी तयातें मी माथां । मुकुट करीं ।।
उत्तमासि मस्तक । खालविजे हें काय कौतुक ।
परी मान करितीं तिन्ही लोक । पायवणियां ।।
तरि श्रद्धावस्तूसि आदरु । करितां जाणिजे प्रकारु ।
जरीं होय श्रीगुरु । सदाशिव ।।
परि हें असो आतां । महेशातें वानितां ।
आत्मस्तुती होतां । संचार असे ।।
ययालागीं हें नोहे । म्हणितलें रमानाहें ।
अर्जुना मी वाहें । शिरीं तयातें ।। ज्ञा. १२. २१४–२१८.

यांत आपला निष्ठावंत भक्त शंकर यास विष्णूनें आपल्या डोक्यावर धारण केलें आहे असें म्हटलें आहे. पंढरपुरास विठ्ठलाची जी मूर्ति आहे तिच्या डोक्यावर शंकराची पिंडी असल्याबद्दलचा जो समज प्रचलित आहे त्यास अनुलक्षून वरील ओंव्या लिहिल्या असाव्यात असें दिसतें. निवृत्तिनाथांनीं एक अभंग केला आहे त्यांतही पुंडलिकानें " विष्णुसहित शिव " पंढरींस आणला असें लिहिलें आहे:—

पुंडलिकाचें भाग्य वर्णावया अमरीं । नाहीं चराचरी ऐसा कोणी ।
विष्णुसहित शिव आणिला पंढरी । भीमातीरीं पेखणें जेणें ॥

रामदासांनीं आपल्या मनाच्या श्लोकांत

विठोनें शिरीं वाहिला देवराणा । तया अंतरीं ध्यास रे त्यासि नेणा ॥

अशा रीतीनें विठ्ठलाच्या मूर्तीवर शंकराची पिंडी असल्याबद्दलचा स्पष्ट उल्लेख केला आहे. ज्ञानेश्वरींतून वर उद्धृत केलेल्या ओंव्यांत ज्ञानेश्वरांनीं विष्णूनें आपला भक्त जो शंकर त्याचें महत्त्व वाढविण्याकरितां त्यास शिरीं धारण केलें आहे असें स्पष्ट लिहिलें आहे. आतां पंढरपूर येथील मूर्तीखेरीज अन्यत्र कोठेंही विठ्ठलाच्या मूर्तीवर शंकराची पिंडी असल्याचें ऐकिवांत नाहीं; यावरून वरील ओंव्या पंढरपूरच्या विठ्ठलासच अनुलक्षून लिहिल्या गेल्या असाव्यात असें म्हणण्यास हरकत नाहीं. ( २ ) याखेरीज आणखी एका ठिकाणीं ज्ञानेश्वरांनीं गीताप्रासादाचें वर्णन करीत असतां पंढरीस विठोबास भेटण्याची जी एक पद्धत होती तीस अनुलक्षूनच पुढील ओंव्या लिहिल्या असाव्यात असें वाटतें:—

ऐसा व्यासें विंदाणियें । गीता प्रासादु सोडणियें ।
आणूनि राखिले प्राणियें । नानापरी ॥
एक प्रदक्षिणा जपाचिया । बाहेरोनि करिती यया ॥
एक ते श्रवणमिषें छाया । सेविती ययाची ॥
एक ते अवधानाचा पुरा । विडापाऊड भीतरां ।

घेऊनि रिघती गाभारां । अर्थज्ञानाच्या ॥
ते निजबोधें उराउरी । भेटती आत्मया श्रीहरी ।
परी मोक्षप्रसादीं सरी । सर्वांही आथी ॥
समर्थाचिये पंक्तिभोजनें । तळिल्या वरिल्या एकचि पक्वानें ।
तेवि श्रवणें अर्थें पठणें । मोक्षचि लाभे ॥ ज्ञा. १८. ४४-४८

या ओंव्यांत ' निजबोधें हरीस भक्त उराउरी ' कसे भेंटतात याचा मोठ्या गौरवानें ज्ञानेश्वरांनीं उल्लेख केला आहे. विठ्ठलाच्या मूर्तीस उराउरी भेटण्याची पद्धत ही पंढरपुरासच विठ्ठलसांप्रदायांतच असून अन्यत्र कोठें दिसून येत नाहीं. यावरून या ओंव्यांतही पंढरपुरच्या विठ्ठलभक्तीचा उल्लेख असला पाहिजे असें दिसतें. ( ३ ) जरी प्रत्यक्ष विठ्ठल हा शब्द ज्ञानेश्वरींत आला नसला, तथापि विठ्ठलसांप्रदायाचे आधारभूत जे " संत " त्यांचा पुष्कळ ठिकाणीं ज्ञानेश्वरीमध्यें उल्लेख आला आहे; उदाहरणार्थ " आत्मज्ञानें चोखडीं । संत हे माझीं रूपडी " ज्ञा. १८ ' संतातें पाहतां गिवसावें " ज्ञा. १८ ' ज्ञानदेव म्हणे तुम्हीं । संत वोळगावेति आम्हीं । हें पढविलों जी स्वामी । निवृत्तिदेवीं " ज्ञा. १२. आतां " संत " हा शब्द पंढरपूरच्या सांप्रदायांत जितका ऐकिवांत आहे तितका तो अन्यत्र नाहीं. त्याप्रमाणेंच, विठ्ठलसांप्रदायाचा आणखी एक आधारस्तंभ म्हणजे कीर्तनभक्ति, तिचाही उल्लेख ज्ञानेश्वरांनीं गौरवानें ज्ञानेश्वरींत केला आहे. " कीर्तनाचेनि नटनाचें । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे । जें नामचि नाहीं पापाचें । ऐसें केलें ॥ " या ज्ञा. ९ मधील उताऱ्यावरून ज्ञानेश्वरांनीं कीर्तनाचे किती गोडवे गाइले आहेत हें दिसून येईल. ( ४ ) खरें पाहिलें असतां विठ्ठल व कृष्ण यांत ज्ञानेश्वरांस भेद वाटत नसल्यानें व कृष्णाचा तर ज्ञानेश्वरीमध्यें घडोघडीं निर्देश असल्यानें विठ्ठलाचा स्वतंत्र रीतीनें नामनिर्देश करण्याचें ज्ञानेश्वरांस फारसें प्रयोजन पडलें नसावें. ज्ञानेश्वरी अध्याय ९ ओंवी २१० मध्यें " कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामांचें निखिल प्रबंध " या ओंवीत कोणत्याही नांवानें देवास संबोधिलें असतां हरकत नाहीं मग त्यास कृष्ण म्हणा, अगर विठ्ठल म्हणा, असा

अर्थच ज्ञानेश्वरांस अभिप्रेत आहे. (५) कांहीं लोकांचें म्हणणें तर असें आहे कीं, ज्ञानेश्वरीकार हे शैव होते, व त्यांस विष्णुभक्ति माहीत नव्हती. यास उत्तर ग्रंथांक २ मध्यें दिलें आहे. तथापि येथें इतकें म्हणण्यास हरकत नाहीं कीं ज्याप्रमाणें वर विष्णूस कोणत्याहि नांवानें पाचारिलें असतां हरकत नाहीं असें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे, त्याप्रमाणें देवास कोणत्याही नांवानें संबोधिलें असतां हरकत नाहीं, मग त्यास शिव म्हणा अगर विष्णु म्हणा, अशीच ज्ञानेश्वरांची भावना होती. ज्ञानेश्वरी अध्याय १७ ओंवी २२३ मध्यें वाग्भवतपाचें वर्णन करीत असतां तोंडांत कोणतेंही नांव आलें तरी हरकत नाही, मग तें शैव असो किंवा वैष्णव असो, असाच उदारपणाचा उपदेश ज्ञानेश्वरांनीं केला आहे. ज्यांस सर्वच देव तेथून सारखे, कृष्ण असो, विष्णु असो, हरि असो, विठ्ठल असो, अगर शिव असो, त्या ज्ञानेश्वरांनीं यांपैकीं एखाद्या देवाचा उल्लेख केला नाहीं म्हणून त्याबद्दलची भक्ति त्यांचे ठायीं नव्हती असें म्हणतां येणार नाहीं. ज्ञानेश्वरांच्या अभंगांतून तर विठ्ठलाचें नाम जागोजागीं आलें आहे, व हे अभंग जर ज्ञानेश्वरीकारांचेच आहेत असें आपणांस सिद्ध करतां आलें—आणि ही गोष्ट ग्रंथांक २ मध्यें आपण करूं—तर ज्ञानेश्वरीकार विठ्ठलभक्त होते याबद्दल संशय राहणार नाहीं.

---

## तत्त्वज्ञान.

७. आतां आपण ज्ञानेश्वरींतील ज्ञानेश्वरांची सर्वांगीण शिकवण कशी होती याचा थोडक्यांत विचार करूं. ज्ञानेश्वरीची भाषा इतकी अर्थपूर्ण व विचारपूर्ण आहे कीं, ज्ञानेश्वरांचें हृद्गत पूर्णपणें समजण्यास एक मोठा ग्रंथच लिहावा लागेल. हल्लींच्या आपल्या प्रस्तावनेंत स्थलसंकोचामुळें या विषयाचा थोडक्यांतच विचार करणें प्राप्त आहे. प्रथम ज्ञानेश्वरांनीं आपले गुरु निवृत्तिनाथ यांचें वर्णन ज्ञानेश्वरींमध्यें जें जागजागीं केलें आहे त्याचा आपण थोडक्यांत विचार करूं. केनोपनिषदांत

सांगितल्याप्रमाणें जाणणें म्हणजे नेणणें होय, व नेणणें म्हणजे जाणणें होय, या मतास अनसरून ज्ञानेश्वरांनीं आपल्या गुरूचें वर्णन करतां येणें अशक्य आहे, असें लिहिलें आहे. गुरूचें वर्णन करूं गेल्यास कल्पतरूवर फुलांचा हार चढविणें, क्षीरसागरास पाहुणचार करणें, अगर कापुरास सुवास देणें याप्रमाणेंच हास्यास्पद होणार आहे. सोन्यास रुप्याचा मुलामा चढवावा त्याप्रमाणेंच गुरूची स्तुति करणें हें असून, निवांत रीतीनें नमन करणें हेंच गुरूचें वर्णन होय ( क्र. ५ ). गुरुकृपा प्रसादरूपानें अंगावर गंगेप्रमाणें धाऊन आली असतां विषयविष व शोक हीं दोन्हीं नाहींशीं होतात. गुरुकृपा ही आधारशक्तीच्या अंकावर बालकाप्रमाणें साधकास वाढवीत असून ती हृदयाकाशमंचकावर त्यास झोके देते; त्यापुढें प्रत्यग्ज्योतीची ओंवाळणी करून आत्मसुखाचीं बाळलेणीं ती त्याच्या अंगावर लेवविते; सतराव्या अमृतकलेचें दुग्ध त्यास प्राशून अनाहताचा हल्लर वाजवितें, व समाधिबोधामध्यें ती त्यास निजविते ( क्र. ६ ). अशा गुरुकृपेचें वर्णन करणें म्हणजे एखाद्या रंकानें अमृताचा सागर पाहिल्यावर त्यास भाजीचा नजराणा करण्याप्रमाणेंच होणार आहे ( क्र. १० ). अशी ही गुरुकृपा माझ्यावांचून अन्यत्र कोठेंही नाहीं असें ज्ञानेश्वर म्हणतात; जणूं कांहीं मी माझ्या गुरूचा एकुलता एक पुत्र आहे ! आधणांत खडे घातले असतांही ते या गुरुकृपेनें अमृतरूप बनतील ! गुरूनें अंगिकार केला असतां सगळा संसारच मोक्षमय होऊन जाईल ( क्र. ११ ). या समर्थास करतां येणार नाहीं असें या चराचरांत काय आहे. ? वनांत पानें खाणाऱ्या वानरांकडून या समर्थानें लंकेश्वराचा नाश करविला, व एकटया अर्जुनाकडून अकरा अक्षौहिणी सैन्य जिंकविलें; ही गुरुकृपा मजवर झाल्यास त्यांनींच लाविलेलें हें सारस्वताचें गोड झाड रसभावफुलांनीं फुलेल, व नानार्थफळभारानें लटकून सर्व जगास सुखाची प्राप्ति करून देईल ( क्र. १२ ). आतां येथें व्यासादिक महामुनींचा शिरकाव झाला म्हणून आम्हांस कोणी प्रतिबंध करील असें कधींही घडणार नाहीं; क्षीरसिंधूच्या तटावर गजांचे समुदाय पाणी पिण्यास आले असतां तेथें एखाद्या मुरकुटास कोणी प्रतिबंध करतो काय ?

ज्या गगनांत गरुडानें उड्डाण करावें, त्या गगनांतच ज्यास पंख फुटले नाहींत असें पांखरूंही आपल्या शक्तीप्रमाणें उडतें, राजहंसाचें चालणें फार श्रेष्ठ झालें तरी दुसऱ्या कोणी चालूंच नये असा त्याचा अर्थ होत नाहीं; म्हणून व्यासांच्या पाठोपाठ भाष्यकारांस वाट पुमून मी अपात्र असलों तरी ही ग्रंथरचना करीन. आधींच चित्तयुक्त, आणि त्यांतच श्रीगुरुकृपा जर जोडेल, तर माझे श्वासोच्छ्वासही नवे नवे ग्रंथ बनतील असें ज्ञानेश्वर म्हणतात ( क्र. १३ ).

८. ज्ञानेश्वरींतील तत्त्वज्ञान गीतेंतील तत्त्वज्ञानाच्या पायावर उभारलें आहे, हें सांगण्याची जरूरी नाहीं. यामुळेंच गीतेमध्यें तत्त्वज्ञानाचे जे जे विषय येतात ते ते सर्व ज्ञानेश्वरींत आले आहेत. अशाचपैकीं मुख्य म्हटला म्हणजे प्रकृति व पुरुष यांचा संबंध हा होय. ज्ञानेश्वरांची दृष्टांत, उपमा, वगैरे देऊन कोणताही कठीण विषय अतिशय हृदयंगम करण्याची शैली फार प्रसिद्धच आहे. प्रकृति व पुरुष यांचा जागजागीं ज्ञानेश्वरांनीं विचार केला आहे. पुरुष कांहीं करीत नाहीं, व प्रकृति सर्व करित्ये हें दाखवितांना पुरुषास लोहचुंबकाची व प्रकृतीस लोहाची ज्ञानेश्वरांनीं उपमा दिली आहे. ज्याप्रमाणें लोहचुंबक चलनवलन न करितां लोहास भ्रमवितो, त्याप्रमाणें पुरुषही चलनवलन न करितां प्रकृतीस चेष्टवितो ( क्र. १४ ). नखापासून केसापर्यंत प्रकृति शरिरांत जागृत असून मनबुद्धयादिकांस टवटवी इच्याचमुळें प्राप्त होते ( क्र. १५ ). तथापि प्रकृति व पुरुष या दोघांसही आपण अनादि-सिद्धच समजलें पाहिजे. या प्रकृतिपुरुषांचा संयोग वर्णन करण्यास दुरापास्त आहे. येथें बायको मिळविते, व पुरुष काम न करितां खातो. या स्त्रीपुरुषांचा संग कधींही घडत नाहीं; तथापि इच्यामुळें विश्व निर्माण होतें. याला केवळ आडनांव पुरुष आहे, परंतु तो स्त्रीही नाहीं व नपुंसकही नाहीं. तो अनंग, पेंगा, निकवडा, व अतिवृद्धाहूनही वृद्ध आहे; याच्या उलट हिचा थाट पाहिला असतां क्षणांक्षणामध्यें नवें नवें रूप धारण करून ही जडास सुद्धां माजविते. या पुरुषाचें पुरुषत्व अंवसेस चंद्राचें तेज लोपावें त्याप्रमाणें प्रकृतीमध्यें लोपून जातें. हा प्रकृतीमध्यें उभा असतो. पण

जुईच्या झाडास जसा एक आधारस्तंभ द्यावा तसा प्रकृतींत असतो, प्रकृति नदीच्या तीरावर असणारा हा एक मेरूच होय; याचें प्रतिबिंब पाण्यांत पडतें, पण हा प्रवाहाबरोबर वाहात नाहीं ( क्र. १६ ). प्रकृतीचें नाहीं हेंच रूप होय. ही निद्रितास समीप असून जागत्या पुरुषापासून दूर राहते. केवळ सत्तासंभोगानें ही गुर्विणी होते. ही प्रसूत झाली असतां ती जें सुंदर बालक प्रसवते, त्याचा ब्रह्मा हा प्रात:काल, विष्णु हा माध्यान्ह, व सदाशिव हा सायंकाळ होय. हें बाळ खेळून महाप्रळयाच्या शेजेवर जें एकदां निवांत निजतें, तें पुन: कल्पोदय झाल्याखेरीज जागेंच होत नाहीं ( क्र. १७ ).

९. प्रकृतिपुरुषविवेकाप्रमाणेंच क्षराक्षरविवेक, क्षेत्रक्षेत्रज्ञविचार, अगर देहात्मविचार, हेही ज्ञानेश्वरीच्या तत्त्वज्ञानाचे पाये होत. यांपैकीं क्षराक्षराचा विचार करतांना ज्ञानेश्वरांनीं असें सांगितलें आहे कीं, महत्तत्त्वापासून तो थेट तृणापर्यंत जें जें कांहीं गुणत्रयाच्या टांकसाळींत निर्माण होतें, व ज्यास जगत् अशी संज्ञा आहे; तसेंच ज्याच्यावर क्षरपणाचा खोटाच आळ आलेला आहे, जो खळाळींच्या उदकावर न हालत असतांही हालणाऱ्या चंद्राप्रमाणें दिसतो, व ज्यास जीव अशी संज्ञा आहे; हीं दोन्ही मिळून क्षर पुरुष होत ( क्र. १९ ). अक्षर पुरुष या जीवांच्या मध्यभागीं गिरिवरांत जसा मेरु शोभावा त्याप्रमाणें शोभतो. सागर आटून गेल्यावर तरंग अगर पाणी कांहींच नसतांना जी अनाकार दशा प्राप्त होते, अगर सर्व कळा नाहींशा झाल्यावर ज्याप्रमाणें अमावास्येस चंद्र नाहींसा होऊन राहतो, त्याप्रमाणेंच या अक्षर पुरुषाचें स्वरूप समजावें ( क्र. २० ). या क्षर व अक्षर पुरुषामध्यें एक आंधळा, वेडा, पंगु आहे, दुसरा सर्वांगसंपूर्ण आहे; परंतु हे एकाच ग्रामामध्यें राहात असल्यानें त्यांचा संयोग घडला आहे. या दोहींखेरीज तिसराही एक पुरुष आहे, त्यास या दोघांचेंही नांव सहन होत नसून तो उगवल्याबरोबर या दोहोंसही त्याच्या ग्रामासकट खाऊन सोडतो; हा तिसरा पुरुष उत्तमपुरुष होय ( क्र. २१ ). ज्याप्रमाणें वह्नि काष्ट खाऊन शेवटीं आपणच जळून

जातो, ज्याप्रमाणें ज्ञानानें अज्ञान नाहीसें केल्यावर ते स्वतःच ज्ञानातीत बनतें, ज्याप्रमाणें कल्पांतकाळीं सर्व नदीनदास खाऊन टाकून एकार्णव आपली मर्यादा ओलांडून जातो, त्याप्रमाणें जागृत, स्वप्न, सुषुप्तीच्या पलीकडची जी वस्तु तीच उत्तमपुरुष होय. जो प्रकाश्यावांचून प्रकाश आहे; जो ईशितव्यावांचून ईश आहे; जो विश्रांतीचा विश्राम, सुखाचें सुख, व तेजाचें तेज आहे; ज्याची उपमा ज्यासच योग्य आहे; असा तो उत्तम पुरुष होय (क्र. २१). आतां क्षेत्रक्षेत्रज्ञाचा विचार करतांना पापपुण्य या शरीरांत पिकतें म्हणून या शरीरास आम्ही क्षेत्र म्हणतों, असें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे. रथांगाच्या मेळाव्यास जशी रथ ही संज्ञा प्राप्त होते, त्यप्रमाणें छत्तीसही तत्त्वे मिळून क्षेत्र होतें (क्र. २२). हा क्षेत्रक्षेत्रज्ञ संबंध म्हणजे जीवात्मसंबंधच होय. देह व आत्मा हे दोन्ही इतके भिन्न आहेत, कीं एकाचें तोंड पुर्वेकडे, तर दुसऱ्याचें तोंड पश्चिमेकडे आहे. देह हा जणूं कांहीं काळानळाच्या कुंडांत घातलेल्या लोण्याच्या गोळ्याप्रमाणें आहे. माशी आपले पंख हालविते न हालविते, इतक्यांत हा नाहींसा होऊन जातो; अग्नींत पडला तर याचें भस्म होतें; श्वानाच्या आधीन झाला तर हा विष्ठारूप बनतो; या दोन्हीतूनही सुटला तर हा कृमींचा एक पूंज बनतो. याच्या उलट आत्मा हा नित्य शुद्ध असून " सकळ ना निष्कळ, अक्रिय ना क्रियाशीळ, कृश ना स्थूळ, अल्प ना बहुवस, रिता ना भरित, मूर्त ना अमूर्त, आनंद ना निरानंद " असा आहे. सृष्टि उत्पन्न झाली असतां हा उत्पन्न होत नाहीं व सृष्टीचा व्यय झाला असतां याचा व्यय होत नाहीं. ज्याप्रमाणें आकाशांत अहोरात्रें यावींत, त्याप्रमाणें या आत्म्यावर देह येतात; तो मात्र जशाचा तसाच कायम राहतो (क्र. २३).

१०. या आत्म्याचा सत्त्वरजतमांशीं संबंध आल्यानें या शरीरांत असे-पर्यंत त्याच्या क्रिया कशा होतात, व त्यांच्या संयोगामुळें मृत्यूनंतर त्याची गति कशी होतें, याचें ज्ञानेश्वरांनीं फार चांगलें वर्णन केलें आहे. सत्त्वाचें प्राबल्य शरीरांत असतांना कमल सोडून सुवास जसा बाहेर फांकावा, त्या-प्रमाणें आत्म्याची प्रज्ञा बाहेर प्रकाशमान होते; व सर्वेंद्रियांत विवेक राबत

असून महानदी जशी वर्षाकालीं उचंबळते, तशी बुद्धि शास्त्रजातामध्यें विस्तीर्ण होते. सत्त्वाचें बाहूल्य असतांना मृत्यु आल्यास आत्म्यास पुन: ज्ञान्यांमध्यें जन्म प्राप्त होतो; राजा डोंगरास गेला असतां त्याचें रावपण जसें मोडत नाहीं, अगर दिवा कोठेंही नेला असतां तो जसा प्रकाश पसरवितो, त्याप्रमाणें सत्त्वयुक्त आत्म्याची स्थिति सर्वत्र प्रकाशमानच असते. ज्यावेळेस शरीरांत रजोगुण वाढतो, तेव्हां सर्व इद्रियें विषयांकडे मोकाट धांवतात; परदारादिकांचा प्रसंग पडल्यास विरुद्ध असा वाटत नाहीं; शेळी जशी खाद्याखाद्य विचारीत नाहीं, त्याप्रमाणें रजोगुणास विरुद्ध व अविरुद्ध कांहीं नसतें. रजोगुणाचें लक्षण म्हटलें म्हणजे कांहीं तरी अचाट कामें करणें हें होय. एकादा मोठा प्रासाद बांधणें, अश्वमेध तडीस नेणें, नगरें व जळाशय निर्माण करणें, इत्यादि क्रिया रजोगुणामुळें होतात. हा रजोगुण वाढला असतां मृत्यु आल्यास राजमंदिरांत राहूनही जसा एकादा भिकारी असावा तशी याची स्थिति होते; कारण मोठ्या श्रीमंताच्या वऱ्हाडाबरोबर जरी बैल गेला तरी त्याच्या नशिबींचा कडबा कधीं चुकत नाहीं. ज्यावेळीं शरीरांत तमाचें प्राबल्य होतें तेव्हां अंतर्बाह्य अविवेकच माजतो; दुष्कृत्य करण्यास चित्तास उल्हास वाटतो. तामस मनुष्य मदिरा न घेतां डुलतो, व सन्निपातावांचून बरळतो. आणि तमाची वृद्धि झाली असतां मृत्यु आल्यास इहलोकींही आग आणि परलोकीही आग अशी स्थिती होते ( क्र. २४ ) .खरें पाहिलें असतां आत्मा येत नाहीं. व जात नाहीं; आत्म्याचा धर्म आत्म्यांत पाहणें, व शरीराचा धर्म शरीरांत पाहणें हेंच ज्ञानाचें चिन्ह होय. तारांगण समुद्रांत बिंबलें तरी तें तुटून जसें पाण्यांत पडत नाहीं, तद्वत्च चैतन्य देहांत प्रकट झालें तरी त्यापासून तें अलिप्तच राहतें ( क्र. २६ ).

११. ईश्वराचा जगताशीं संबंध कसा आहे याचें वर्णन करीत असतांना ज्ञानेश्वरांनीं गीतेंतील मूळचें अश्वत्थाचें रूपक फारच विस्तृत रीतीनें पुढे मांडून गीतेंतील भाव आपल्या शब्दांनीं व कल्पनांनीं फारच विशद करून सांगितला आहे. विश्वरूपी अश्वत्थ हा इतर वृक्षांप्रमाणें खालीं मुळें वर शाखा असा नसून, याचें मूळ ऊर्ध्वांत आहे व वाढ अधोमुख आहे असें ज्ञानेश्वर

म्हणतात (क्र. २७). या विश्वाश्वत्थाचें ऊर्ध्व ईश्वरस्वरुपांत आहे (क्र. २९) व त्याचा अधोमुख विस्तार सत् ना असत् स्वरूपाचा आहे. ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें तरुणांगीं आलिंगिलेंनिवीण आलिंगून सकाम करते, त्याप्रमाणेंच या स्वरूपामध्येंही माया उत्पन्न होऊन जगद्रूप भासते ( क्र. २९ ). हें जगत् म्हणजेच उद्यांपर्यंतही न टिकणारा अश्वत्थ होय; वीज जशी क्षणोक्षणीं पालटते, हालणाऱ्या पद्मदलावरील जळ जसें चंचळ असतें, त्याप्रमाणेंच या विश्वाश्वत्थाचीही स्थिति आहे. वेगातिशयानें भूमीवर फिरणारी भिंगोरी जशी अचल भासते, त्याप्रमाणेंच हा संसारवृक्ष मोडत मांडत असूनही लोकांस अव्यय आहेसा वाटतो ( क्र. ३० ). या ठिकाणीं या शिनसाळ झाडाचें उत्पाटन होणार कसें, असा प्रश्न उत्पन्न होणें साहजिक आहे. त्यास उत्तर इतकेंच आहे कीं, ज्याप्रमाणें मृगजळाच्या तळ्यावर साळीकेळीं लावितां येणार नाहींत ( क्र. ३१ ), अगर ज्याप्रमाणें व्योमकुसुमांचा देंठ तोडतां येणार नाहीं, त्याप्रमाणेंच या संसारवृक्षाचें खंडण करण्यास परिश्रम मुळींच लागत नाहींत. आत्मज्ञानावांचून हा अश्वत्थ तोडण्याचे जितके उपाय करावेत तितके सर्व व्यर्थ होत. स्वप्नांत भय वाटल्यास त्यास औषध जशी जागृति, त्याप्रमाणें हा अश्वत्थवृक्ष तोडण्यास उपाय म्हणजे केवळ एक आत्मज्ञानच होय ( क्र. ३२ ). या संसाराचें अश्वत्थरूपानें ज्याप्रमाणें वर्णन करितां येईल, त्याप्रमाणेंच त्यास मायानदीचा दृष्टांतही देतां येईल. या नदीस मोहाचा पूर आल्यानें यमनियमांचीं नगरें इच्या जोरामुळें वाहून जातात. या नदींत द्वेषाचे मोठे भोंवरे, मत्सराची आडवळणें, व प्रमदादि महामीन आहेत. ही मायानदी तरण्यास जो जो म्हणून उपाय करावा, तो तो अपायच होतो. स्वयंबुद्धीच्या बाहूच्या जोरावर, वेदत्रयाची सांगड घालून अगर अहंभावाची धोंड पकडून, हा मायासमुद्र तरून जाण्याची इच्छा केल्यास हरिणीच्या पोरानें बळकट जाळें कुरतडावें, अगर मुंगीनें मेरु ओलांडावा तशा प्रमाणेंच होणार आहे. हा मायासागर तरून जाण्यास एकच उपाय आहे, व तो म्हटला

म्हणजे ईश्वराचें सर्वभावानें भजन करणें हा होय. अशा निस्सीम भक्तास हें मायाजळ अलीकडच्या तीरावरच नाहीसें होतें ! ( क्र. ३३ ).

१२. परंतु असा चमत्कार आहे कीं, हें जग देवानें आंतबाहेर व्यापिलें असूनही या जगांत देवच नाहीं असें दैवहीन लोक म्हणतात ( क्र. ३४ ). आकाशानें सर्वत्र व्यापावें, वायूनें क्षणभरही उगें नसावें, अग्नीनें दहन करावें, पर्वतांनीं आपलें ठाण सोडूं नये, समुद्रांनीं आपली रेखा ओलांडून जाऊं नये, इत्यादि जे सृष्टीचे नियम आहेत त्यांचा नियंता मी असूनही हे लोक मी नाहींच असें म्हणतात ( क्र. ३५ ). या जगांतील सर्व बळ माझें असतां त्या बळाची कल्पनाही त्यांस करवत नाहीं. माझें बळ काढून घेतलें असतां कोल्हेरीच्या वेताळाप्रमाणें तें निर्जीव पडतील याची त्यास कल्पनाही होत नाहीं. ( क्र. ३७ ). कांहीं लोक तर माझें अस्तित्व मानूनही माझ्याकडे चुकीच्या दृष्टीनें पाहतात. कामिणीनें ज्याची दृष्टि वेधली आहे तो ज्याप्रमाणें चांदण्यास पिवळें म्हणतो, त्याप्रमाणें हे माझ्या निर्मळ स्वरूपांत दोष पाहतात. मी अमानुष असतांही मला ते मानुषभाव लावितात. नक्षत्रें पाण्यांत प्रतिबिंबल्यानें हीं रत्नेंच आहेत असें समजून तीं घेऊं जाणारे हंस जसे नाश पावतात, त्याप्रमाणेंच नाशिवंत स्थूळाकारांत मला पाहणारे लोकही नाश पावतात ( क्र. ३८ ). मला अनाम्यास नाम, गुणातीतास गुण, अचरणास चरण, अश्रवणास श्रोत्र, अचक्षूस नेत्र कल्पून, ते माझी प्रतिष्ठापना, आव्हान, व विसर्जन करतात. मी एकाचा कैंपक्ष घेतों व दुसऱ्यास रागानें मारतों, असें मानुषधर्म हे मला लावितात. एकादा आकार पुढें करून हाच देव म्हणून त्याचें भजन करतात, आणि तोच बिघडल्यावर त्यास ते टाकून देतात ( क्र ३९ ). अशा प्रकारें संकुचित दृष्टीनें मला न पाहतां ब्रह्मादिपिपीलिकापर्यंत मला पाहणारे, व या जगांत जें जें भूत आहे तें तें भगवत्स्वरूपच आहे असें मानणारे जे लोक आहेत त्यांसच ज्ञानाची पहांट झाली असें समजावें ( क्र. ४१ ). एरव्हीं निरनिराळीं नामें, निरनिराळीं वर्तनें, निरनिराळे वेष पाहून अंत:करणांत भेद उत्पन्न झाल्यास जन्मसहस्रें झालीं तरी संसारांतून पार

पडतां येणार नाहीं; एकाच तुंबिणीच्या वेलास दीर्घ, वक्र वर्तुळ, अशीं जशीं फळे लागतात, त्याप्रमाणें भिन्न भिन्न वस्तूंमध्यें अभेद पाहणें हेंच ज्ञानाचें लक्षण होय (क्र. ४२). शिवाय, ईश्वर व जगत् यांचा संबंध वन्हि व ज्वाळा याप्रमाणें आहे; माणिक व माणिकाचें तेज हीं जशीं दोन नाहींत, त्याप्रमाणें ईश्वर व जगत् हीं भिन्न नाहींत (क्र. ४३). अशा ईश्वराचें यथातथ्य रीतीनें ज्ञान प्राप्त होणें ही फार कठीण गोष्ट आहे. उदरांतील गर्भास ज्याप्रमाणें मातेचें वय कळत नाहीं, मशकास ज्याप्रमाणें गगन ओलांडवत नाहीं, पर्वतावरून खालीं आलेल्या उदकास ज्याप्रमाणें वर चढवत नाहीं, त्याप्रमाणें मजपासून उत्पन्न झालेल्या जगास माझें स्वरूप कळणें अशक्य आहे (क्र. ४४). येथें ज्यास जाणीव प्राप्त झाली, त्यास नेणिवेनें ग्रासलें व जो नेणिवेंत तृप्त झाला त्यास जाणीव उत्पन्न झाली असा चमत्कार होतो. आपला शरीरभाव सोडल्यावांचून, सर्व गुणांचें लोण उतरल्यावांचून, सर्व संपत्तीची कुरवंडी केल्यावांचून, देवाचें स्वरूप कळणें शक्य नाहीं (क्र. ४५). ईश्वराच्या विभूतींच्या विस्तारांत मन न घालितां ईश्वराचें एक स्वरूप जाणलें म्हणजे पुरें; सर्व नक्षत्रें वेचावीं अशी इच्छा झाल्यास ज्याप्रमाणें गगनाची मोट बांधली असतां कार्य होईल, अगर पृथ्वींतील परमाणूंचा झाडा घ्यावा अशी इच्छा झाल्यास ज्याप्रमाणें भूगोलच काखेंत घेतल्यास पुरें, त्याप्रमाणें विभूतीविशेष पाहणें झाल्यास ईश्वराचें एक स्वरूप पाहिलें म्हणजे झालें (क्र. ४८).

१३. हें विश्वरूप काय आहे हें पाहण्याबद्दलची अर्जुनाची अत्यंत उत्कंठा गीता व ज्ञानेश्वरी यांच्या अकराव्या अध्यायांत वर्णिली आहे. हें विश्वरूप बाहेर लोचनास गोचर व्हावें म्हणून अर्जुनानें श्रीकृष्णांस अंतरीचें गुज दाखविण्याविषयीं प्रश्न केला (क्र. ४९). ज्या ठायास ईश्वराचें मुद्गलरूप म्हणतां येईल, जेथून हीं द्विभुज व चतुर्भुज रूपें प्रकट होतात, ज्याचें गायन उपनिषदें करितात, जें रूप सनकादिक पोटाळून राहतात, तें अगाध रूप दृष्टीस गोचर व्हावें अशी अर्जुनानें इच्छा दर्शविली (क्र. ५०). परंतु तें रूप दिव्यदृष्टिवांचून दिसणें अशक्य असल्यानें श्रीकृष्णानें प्रथम अर्जुनास

दिव्यदृष्टि दिली; दिव्यदृष्टि प्राप्त झाल्यावर अर्जुन चमत्काराच्या अर्णवांत बुडून गेला; प्रथम तो जें रूप पाहत होता त्याचेंच आतां विश्वरूप बनलें ( क्र ५२ ). परंतु तें विश्वरूप इतकें ' घोर, विकृत, आणि थोर ' होतें कीं न पाहिलेलें रूप आपण आतां पाहिलें म्हणून अर्जुनास जरी आनंद झाला, तथापि जें पाहिलें तें इतकें भयंकर होतें कीं त्यामुळें अर्जुन गर्भगळितच होऊन गेला; व तें रूप पाहण्याचें सामर्थ्य अंगीं नसल्यानें त्यानें ईश्वरास मुळचेंच रूप दाखीव अशी प्रार्थना केली. पुत्राचे सहस्र अपराध झाले तरी पिता त्यास जशी क्षमा करतो, अगर सख्याचें उद्धत वर्तन जसा सखा निवांतरीतीनें साहतो,त्याप्रमाणें देवानें आपल्यास क्षमा करावी म्हणून अर्जुनानें ईश्वराचें अपराधक्षमापनस्तोत्र केलें (क्र. ५३). विश्वरूपास अर्जुनाचें धसाळपण पाहून मोठा विस्मय वाटला; जें आपलें अपरंपार रूप कीं जेथून कृष्णादिक अवतार निर्माण झाले त्याची अर्जुनास भीती वाटावी हें पाहून त्यास थोडाबहुत कोपही आला; अमृताच्या समुद्रांत बुडलों असता मरेन म्हणून ज्याप्रमाणें एखाद्यानें वर येण्याची धडपड करावी, अगर सोन्याचा इतका मोठा डोंगर घेऊन काय करावयाचा ह्मणून त्याचा जसा अव्हेर करावा, त्याप्रमाणें अर्जुनानें विश्वरूपाचा अव्हेर केला (क्र. ५४). तथापि भक्ताची इच्छा प्रबळ म्हणून विश्वरूपानें पुन: कृष्णरूप घेऊन अर्जुनाचें सांत्वन केलें. विश्वरूपपटाची घडी त्यानें अर्जुनाकरितां उकलून दाखविली होती ती गिऱ्हाइकी होत नाहीं म्हणून त्यानें पुन: मिटली. इतक्या ठावपर्यंत शिष्याचें वर्तन सहन करणारे गुरु कोणत्या देशांत आहेत असें ज्ञानेश्वर विचारतात (क्र. ५५). असो.

१४. एकंदरींत स्वरूप असो, अगर विश्वरूप असो, ज्याच्या त्याच्या भावनेप्रमाणें ज्यानें त्यानें तें आपल्या कृतनिश्चयाचें घर केलें पाहिजे. ब्रह्मस्वरूपासच विश्वबाहु, विश्वांघ्रि, विश्वतश्चक्षु, विश्वमूर्धा, विश्वतोमुख अशा संज्ञा आहेत. शून्य काय आहे हें दाखविण्याकरितां ज्याप्रमाणें वर्तुळ काढावें लागतें, त्याप्रमाणें अद्वैत सांगावयाचें झालें तर तें द्वैताच्या भाषेंत बोलल्यावांचून गत्यंतर नाही. एकंदरींत ईश्वराचें स्वरूप

अनिर्वर्णनीय आहे हें खास (क्र. ५९). या स्वरूपासच चित्सूर्याची उपमा देऊन ज्ञानेश्वरांनीं सोळाव्या अध्यायाच्या प्रारंभीं त्याचें मोठ्या बहारीनें वर्णन केलें आहे. या चित्सूर्याचा चमत्कार असा कीं जो उगवला असतां सर्व जग मावळून जातें; ज्याच्या प्रकाशापुढें ज्ञानाज्ञानचांदण्या लोप पावतात; ज्याच्यामुळें जीवपक्षी आपल्या अहंकाराची घरटीं सोडून बाहेर येतात, लिंगदेहकमळाच्या पोटांत नाश पावत असणाऱ्या चिद्भ्रमराचा बंदिमोक्ष होतो, व भेदनदीच्या दोन्ही तीरांवर विरहवेडी होऊन आरडत असणाऱ्या बुद्धिबोधरूपी चक्रवाकांचा संयोग होतो; ज्याच्या तेजांत उन्मेषरूपी सूर्यकांताच्या ठिणग्या पडल्यामुळें संसाराचीं दागें भस्म होतात; व जो सोहंतेच्या माध्यान्हीं आल्यावर आत्मभ्रांतिरूप छाया आपल्या पादतळांतच नाहींशी होते; अशा अहोरात्रांच्या पलीकडे असलेल्या ज्ञानमार्तंडाचें दर्शन घेण्याचें भाग्य कोणास लाभलें आहे असें ज्ञानेश्वर विचारतात (क्र ६०).

## नीतिमीमांसा.



१५. येथपर्यंत आपण ज्ञानेश्वरीतील मुख्य मुख्य तत्वज्ञानांचे मुद्दे पाहिले. याच्यापुढें आपण ज्ञानेश्वरांनीं ठिकठिकाणीं आपल्या ग्रंथांत जी अत्युत्तम नीतिमीमांसा केली आहे तिजकडे थोडें लक्ष देऊं. ज्ञानेश्वरींतील अध्याय तेरा हा नीतिमीमांसेचा एक आकर आहे असें म्हटलें तरी चालेल. ज्ञानेश्वरींतल्याप्रमाणें नीतिमीमांसा पाश्चात्य ग्रंथांतूनही क्वचित्‌च आढळेल. उपमा, उदाहरणें, व दृष्टांत देऊन विषय हृदयंगम करण्याची ज्ञानेश्वरांची शैली नीतिमीमांसेंत जितकी दृष्टीस पडते तितकी ज्ञानेश्वरींतही अन्यत्र क्वचितच दिसेल. अमानित्वाचें लक्षण करतांना ज्ञानेश्वरांनीं असें म्हटलें आहे कीं आपल्यास कोणी योग्यता अगर महत्त्व दिल्यास व्याधानें रुंधलेल्या मृगाप्रमाणें आपण गजबजून जावें, आपली कीर्ति आपण कानांनीं ऐकूं नये, व आपली पूज्यता डोळ्यांनीं पाहूं नये, कोणी आपल्यांस नमस्कार केल्यास तो मरणाचा मोबदलाच आहे असें समजावें, वाचस्पतीसारखी जरी आपली

सर्वज्ञता असली तरी मोठेपणाच्या भीतीनें आपण वेडिवेमध्यें दडावें. जगानें आपली अवज्ञा करावी, व सोयऱ्याधायऱ्यांनीं आपला संबंधच तोडावा, अशी इच्छा आपण धरावी. आपला संबंध वायु अगर गगन यांशीं ठेवून झाडेंझुडें ही आपल्यास प्राणापेक्षां जास्त आवडावीं. हा अमानित्व गुणच ‘ अखंड अगर्वता ’ या सदराखालीं ज्ञानेश्वरांनीं अध्याय ९ मध्यें वर्णिला आहे. हें सर्व जगच जर देवाचें स्वरूप आहे, तर त्यांत लहानमोठा हा भेद उरत नाहीं. उंचीवरून येणारें उदक जसें नम्रपणानें खालीं येतें, त्याप्रमाणें सर्व भूतजातीशीं आपण नम्रतेनें वागावें ( क्र. ६३ ). अदंभित्व हा गुण आपलें दानपुण्य वगैरे झांकून ठेवण्यामध्यें आहे. ज्याप्रमाणें एखादी कुलवधु आपलें अवयव लपविते, अगर एखादा कृषीवल आपलें पेरिलेलें झांकून ठेवितो, त्याप्रमाणें आपली सत्कृत्यें लपवून ठेवणें यासच अदंभित्व म्हणावें (क्र. ६४). पाण्याच्या एका तरंगासही धका न लावणें, सर्व सृष्टींतील परमाणु हे लहान जीवच आहेत असें समजून कारुण्यानें पाउलें टाकीत जाणें, वाऱ्यास अगर आकाशासही धका लागेल या बुद्धीने आपले हात न हालविणें, अगोदर स्नेहपूर्ण दृष्टीनें पाहून नंतर साच आणि मवाळ शब्द बोलणें, या व इतर अशाच कृति “अहिंसा” या सदराखालीं येतात (क्र. ६५). नदीनदांचे समुदाय जळाचे लोट घेऊन आले असतांही समुद्र त्यांस जमा आपल्या पोटांत सांठवितो, त्याप्रमाणें सर्व त्रिविधतापास सहन करणें हीच शांति ( क्र. ६६ ). जगाशीं आपली जुनाटच सोयरीक आहे असें समजून एखाद्या उमललेल्या कमलास ज्याप्रमाणें कानाकोंपरा रहात नाहीं, त्याप्रमाणें आपल्या वर्तनांत कानाकोंपरा न ठेवणें यासच ऋजुता म्हणावें ( क्र. ६७ ). आचार्योपास्तीचें लक्षण सांगतांना ज्या देशांत गुरुगृह असेल तो देश कायम चित्तांत वसणें, स्वामीच्या भेटीवांचून निमिषही युगाप्रमाणें वाटणें, गुरुग्रामीचें कोणी आल्यास गतायुष्यास जीव जोडल्याप्रमाणें आनंद होणें, गुरूस माय कल्पून स्तन्यसुखानें त्याच्या अंकावर कदाचित् आपण लोळणें, ज्या दास्यानें संतुष्ट होऊन गुरु माग म्हणतील अशा प्रकारचें दास्य करण्याची इच्छा धरणें, देहांतीं आपल्या शरीराची माती ज्या ठिकाणीं गुरूचे चरण असतील त्या ठिकाणीं मेळविण्याची इच्छा करणें,

गुरुदास्यानें कृश होऊन गुरुप्रेमामुळें पुष्ट बनणें, गुरुसांप्रदायधर्मावांचून वर्णाश्रमधर्म न जुमानणें, वक्त्रानें गुरुनामाचे मंत्र सदा वाहणें, इत्यादि गोष्टी आचार्योपासनेमध्यें येतात ( क्र. ६८ ). शुचित्व म्हणजे कापराप्रमाणें मन स्वच्छ करणें, बाहेर कर्मानें देह क्षालून आंत ज्ञानदीप लावणें, आंतील सद्भाव स्फटिकगृहींच्या दीपासारखे बाहेर स्वच्छ दिसणें, यास शुचित्व म्हणतां येईल ( क्र ६९ ). आकाशांतील अभ्रें, नक्षत्र, तारा, ग्रह वगैरे धांवत असतांही भ्रमणचक्रांत न भोंवणाऱ्या ध्रुवाचा गुण तो स्थैर्य होय ( क्र. ७० ). कामबागुल ऐकेल म्हणून अंतःकरण इंद्रियांच्या दारांत न ठेवणें, अगर एखाद्या व्यभिचारिणी स्त्रीस तिचा दांडगा पति बांधून ठेवितो त्याप्रमाणें आपल्या प्रवृत्तीवर टेहेळणी करणें, यास आत्मनिग्रह म्हणावें ( क्र. ७१ ). ओकलेल्या अन्नाकडे पाहून ज्याप्रमाणें रसनेस लाळ स्रवत नाहीं, अगर एखादें प्रेत पाहून त्यास आलिंगन देण्यास जसा कोणी धजत नाहीं, त्याप्रमाणें विषयाबद्दल तिटकारा उत्पन्न होणें यास वैराग्य म्हणतां येईल ( क्र ७२ ). सूर्याचा जसा निरभिमान उदयास्त होतो, अगर ऋतुकाळीं फळून वृक्ष जसे फळलों असें जाणत नाहींत, त्याप्रमाणें हें कार्य मी केलें, अगर माझ्यामुळें सिद्धीस गेलें, अशी वृत्ति मनांत उत्पन्न न होणें यासच अनहंकार म्हणावें ( क्र. ७३ ). जन्ममृत्युजरादुःखें हीं अंगावर पडलीं नसतां दुरूनच त्याबद्दल भीति उत्पन्न होणें, उद्यांचा मुक्काम घातक आहे हें समजून आजच सावध राहणें, समर्थाशीं हाडखाईर वैर पडलें असतां आठही प्रहर शस्त्र परजून राहणें, पद्मदळाशीं आज स्पर्धा करणारे डोळे पुढें पिकलेल्या पडवळाप्रमाणें होतील हें समजून मनांत उद्वेग बाळगणें, हातपाय लुळे होण्याच्या अगोदरच आत्मज्ञान चिंतून ठेवणें, हें दोषदर्शन होय ( क्र. ७४ ). एखादा अतिथि जसा बिढारांत बसावा त्याप्रमाणें आपल्या गृहांत वागणें, अगर आपलीं जीं पुत्रकन्या असतील तीं वृक्षातळीं सहजगत्या बसणाऱ्या गोरुवाप्रमाणें आहेत असें समजणें, यासच अनासक्ति म्हणावें ( क्र. ७५ ). शैलवृक्षांचीं कुहरें, जळाशय, व तपोवनादिकांवर प्रीति असून जनपदाची अखंड खंती बाळगणें यास एकांतप्रियता म्हणतां येईल ( क्र. ७६ ). वल्लभापुढें रिघतांना

पतिव्रता स्त्रीस कोणतेंही सांकडें वाटत नाहीं, त्याप्रमाणें एकभावानें ईश्वरापुढें धांवणें यासच अनन्यभक्ति म्हणावी ( क्र. ७७ ). व परमात्मवस्तूवांचून दुसऱ्या कोणत्याही गोष्टीच्या मागें धांवणें ही भ्रांति आहे असें समजून ध्रुवाप्रमाणें निश्चल राहणें यास अध्यात्मज्ञान म्हणावें ( क्र. ७८ ). अशा रीतीनें ज्ञानेश्वरांनीं अमानित्वादिगुणांची, अगर भगवद्गीतेंत ज्यास ज्ञान म्हटलें आहे त्याची, मीमांसा केली आहे.

१६ हीं जीं ज्ञानाचीं लक्षणें सांगितलीं त्याच्या उलट सर्व लक्षणें अज्ञानाचीं होत. ज्ञानी मनुष्याप्रमाणेंच अज्ञानी मनुष्याचें लक्षणही ज्ञानेश्वरांनीं पुष्कळ उपमा व दृष्टांत देऊन केलें आहे. पर्वताच्या शिखरावरून जसें एकाद्या मनुष्यानें न उतरावें त्याप्रमाणें जो महत्वाच्या अद्रीवरून उतरत नाहीं त्यास अज्ञान म्हणावें एखादा भाता जसा फुंकला असतां फुगतो, व सोडला असतां आकर्षण पावतो, त्याप्रमाणें संयोगवियोगांनीं या अज्ञानी मनुष्याच्या मनांत भरतीओहोटी होत असते. ज्याप्रमाणें एखादा अरण्यांत असलेला कुवा कांटयांनीं किंवा हाडांनीं भरलेला असावा, त्याप्रमाणें त्याचें मन विकल्प व संशय यांनीं भरलेलें असतें. सिंह ज्याप्रमाणें चांगलें व वाईट पहात नाहीं त्याप्रमाणें हा स्त्रीविषयीं कांहींच विचार करीत नाहीं. असा अज्ञानी मनुष्य चांचल्यानें मर्कटाचें भावंडच शोभतो. ज्याप्रमाणें एखादा पोळ मोकळा सुटावा, अगर ज्याप्रमाणें एखादा पोळ मोकळा सुटावा, अगर ज्याप्रमाणें एखादें आंधळें हत्तीचें पोर इकडे तिकडे धांवत सुटावें, त्याप्रमाणें या मनुष्याचें मन विषयांत सैरावैरा धांवतें. एखाद्या अंत्यजास राज्यावर बसविलें असतां तो जसा अभिमानानें ग्रस्त होतो, अथवा एखाद्या अजगरानें लांकूड गिळिलें असतां तो जसा ताठतो, त्याप्रमाणें हा अज्ञानी मनुष्य गर्वानें फुगलेला दिसतो. लाटण्याप्रमाणें न लवणें, व पत्तराप्रमाणें न द्रवणें, हे गुण त्याच्या अंगांत येतात; त्यास तारुण्याचें भुररें चढलें असल्यानें एखाद्या कडयावरून सुटलेल्या धोंडयाप्रमाणें तो गडगडत खाली येतो. एखाद्या गारुड्याचें माकड असावें त्याप्रमाणें स्त्रीच्या छंदानें तो नाचतो, व एखाद्या प्रेमयुक्त भक्तानें

देवाचें भजन करावें त्याप्रमाणें एकाग्रचित्तानें तो स्त्रीची उपासना करतो. एखाद्या कुणबटाप्रमाणें हा नवेनवे देव मांडतो, व ज्याचा मोठेपणा त्याच्या नजरेस येतो अशा गुरुचा हा उपदेश घेतो. माझी मूर्ति निपजवून ती घराच्या एका कानाकोपऱ्यांत बसवितो, व आपण देवोदेवींच्या यात्रेस निघून जातो. माझें नित्य आराधन असलें तरी एखाद्या विशेष कार्याचें दिवशीं यानें कुळदेवतेचें भजन केलेंच ! एखाद्या गांवांत जशी वेश्या असावी, त्याप्रमाणेंच याचें चित्त या देवावरून त्या देवावर व त्या देवावरून या देवावर जातें. उपनिषदांकडे यांचे लक्ष असत नाहीं. योगशास्त्र रुचत नाहीं. अध्यात्मज्ञानाकडे याचें चित्त नसतें. मोराच्या अंगावर पुष्कळ डोळस पिसें असावी, पण त्यांस दृष्टिमात्र नसावी, त्याप्रमाणें हा कितीही शास्त्रें पढिन्नला तरी त्यास अध्यात्मज्ञान मात्र नसतें ( क्र. ७९ ).

१७. गीतेच्या सोळाव्या अध्यायांत दैवीसंपत्तीचे व आसुरीसंपत्तीचें जें वर्णन केलें आहे त्यास अनुसरून ज्ञानेश्वरांनींही या विषयांची चर्चा आपल्या टीकेंत फार सुंदर रीतीनें केली आहे. जो दैवीसंपत्तीमध्यें निर्माण होतो त्यास सर्वत्र आत्माच दिसत असल्यानें त्याची ऐक्यबुद्धि होऊन त्यास भय कसें तें उरत नाहीं. आपला वल्लभ गांवास गेला असतां एखाद्या पतिव्रतेस विरह-क्षोभ होऊन तिला लाभालाभ जसे दिसत नाहींत, त्याप्रमाणें सत्स्वरूपाकडे याची दृष्टि असल्यानें त्यास सुखदुःखाचें कारण रहात नाहीं. धूपानें अग्निप्रवेश करून ज्याप्रमाणें नाहीसें व्हावें, अगर चंद्रानें पितृपक्ष पोशीत असतां आपला ऱ्हास करून घ्यावा, त्याप्रमाणें स्वरूपसाक्षात्काराकरितां दैवीसंपत्तीचा मनुष्य आपल्या प्राणेंद्रियशरीराची आटणी करितो. ज्याप्रमाणें सापाच्या त्वचेस पायानें लाथाडिलें असतांही ती आपली फणा वर उचलीत नाहीं, त्याप्रमाणें अशा मनुष्यास लोकांची वाईट कृत्यें पाहूनही क्रोध येत नाहीं. एखादी व्याधि जिकण्याकरितां सद्वैद्य जसा आपपर पहात नाहीं, एखादा मनुष्य बुडत असतां तो अंत्यज आहे किंवा ब्राह्मण आहे याचा जसा कोणी विचार करीत नाहीं, एखाद्या माउलीस पापी पुरुषानें उघडी केली असतां तिला नेसविल्यावांचून जसा कोणी राहत नाहीं, त्याप्रमाणें असा

मनुष्य कारुण्यपूर्ण दृष्टीनें सर्वत्र पाहतो. एकंदरींत दुःखितांच्या दुःखाचा वांटेकरी होण्याविषयींच याचा जन्म असतो. सूर्याच्या मागोमाग कमळ उमललें असतां तो जसा त्याच्या सौरभ्यास शिवत नाहीं, त्याप्रमाणें आपल्यास अनुसरणाऱ्या लोकांकडे हा विषयदृष्टीनें पहात नाहीं. देहपणानें जिवंत राहणें हें त्यास एखाद्या रूपवान् मनुष्यास कुष्ठ लागल्याप्रमाणें प्राणसंकट वाटते. गंगेचें उदक ज्याप्रमाणें सभोंवतालचें तापताप फेडीत व तीरींचे पादप पोषीत समुद्रास जातें, अगर सूर्य जसा जगाचें आंध्य फेडीत व तेजाचीं भवनें उघडीत विश्वाच्या प्रदक्षिणेस निघतो, त्याप्रमाणें हाही पुढिलांचें सुख उन्नतीस आणण्याकरितां रात्रंदिवस झटत असतो ( क्र. ८० ). याच्या उलट आसुरीसंपत्तीच्या मनुष्यास मांदुरी लोकांच्या घोडयांस ज्याप्रमाणें ऐरावतही तुच्छ वाटावा त्याप्रमाणें सर्व जग तुच्छ वाटतें. अभिमानाच्या मोहानें ईश्वराचें नामही यास सहन होत नाहीं. पुढिलांची विद्या, वैभव, व संपत्ति पाहून याचा क्रोध दुणावतो. त्याचें मन जणूं कांहीं सर्पाचें वारूळच असतें. त्याची दृष्टि म्हणजे जणूं कांहीं बाणांची सुटीच होय. त्याचे बोल हे इंगळांच्या वृष्टिप्रमाणें तीक्ष्ण असतात. ज्याप्रमाणें एकाच राशीला एकावेळीं सर्व क्रूर ग्रहांची मांदी मिळावी, अगर एखाद्या मरणाऱ्या मनुष्याच्या अंगांत सर्व रोगांनी एकदम प्रवेश करावा, अगर एखाद्या प्राण सोडीत असलेल्या शेळीस एकदम सात नांग्यांच्या इंगळीनें दंश करावा, त्याप्रमाणें अशा आसुरी संपत्तीच्या मनुष्यांत सर्व दोष एकदम अवतरतात. मोक्षमार्गाच्या बाजूस यांस आवरण पडल्यानें हा उत्तरोत्तर अधमाधम योनींप्रत जातो ( क्र. ८१ ).

१८. गीतेच्या १३ व्या अध्यायांत ज्ञानअज्ञानाचें लक्षण करतांना व तसेंच १६ व्या अध्यायांत दैवासुरसंपत्तीचा विचार करतांना जी नीतिमीमांसा ज्ञानेश्वरांनीं केली आहे, त्यावांचून अन्यत्रही निरनिराळया अध्यायांत थोडीबहुत नीतिमीमांसा सांपडते. ज्ञानेश्वर महाराज सांगतात कीं त्याच बुद्धीस सद्बुद्धि म्हणावें कीं जिची परिसमाप्ति परमात्म्याच्या प्राप्तीत होते (क्र. ८२). ज्यानें आपलें अंतःकरण जिंकलें, व ज्याचें सकळ

काम शांत झाले, त्यास परमात्मा दूर नाहीं (क्र. ८४). साधकानें आपल्या सर्व कृतींमध्यें परिमितता बाळगली पाहिजे (क्र. ८५). जो आपल्या मुळाशीं पाणी घालतो, अगर जो तोडण्यास धाव घालतो, त्या दोघांसही वृक्ष जशी सारखीच साउली देतो; अगर इक्षुदंड ज्याप्रमाणें पाळणाऱ्यास गोड व गाळणाऱ्यास कडू असा होत नाहीं; त्याप्रमाणेंच साधकानें रिपुमात्रांमध्यें सारखाच भाव धरावा (क्र. ८६). साधकानें सर्वतीर्थपेक्षां श्रेष्ठ अशीं जीं मातापितरें त्यांची एकभावानें सेवा करावी. फक्त एकदां जन्मतांनांच ढेवढा स्त्रीच्या अंगाचा स्पर्श झाला असेल तो असो, पण तेथून पुढें जन्मभर शरीर सोंवळें राखावें (क्र. ८८). तळहातावर ज्याप्रमाणें रोम उगवत नाहींत, त्याप्रमाणें मनांतही दुष्ट भाव उगवूं न देणें यासच सात्विक क्रिया म्हणावें (क्र. ९०). आपण महत्वाद्रीच्या शृंगावर बसण्याच्या इच्छेनें, व सर्व विश्वाच्या स्तोत्रास आपण पात्र होण्याच्या इच्छेनें केलेलें कर्म राजस कर्म होय (क्र. ९१). डोक्यावर गुग्गुळ जाळणें, अंगावर निखारे ठेवणें, अधोमुखानें धूम्राचे घांस घेणें, अगर जिवंत असतांनाच मांसाचें तुकडे तोडणें, वगैरे सर्व क्रिया तामस होत (क्र. ९२). या रजतमसत्त्वाच्या पलीकडे जाऊन अद्वयत्वानें ईश्वरास शरण रिघणें यासच अभेदसाक्षात्कार म्हणतां येईल (क्र. ९३).

१९. गीतेंतील कर्मयोगाचें तत्त्वज्ञान ज्ञानेश्वरींतही फार उत्तम रीतीनें मांडलें आहे. सूर्य जसा न चालतां उदयास्तामुळें चालत असल्यासारखा दिसतो, त्याप्रमाणें कर्मांमध्यें असूनही मनुष्यानें नैष्कर्मसिद्धि मिळवावी. ज्यांनीं आपल्या जीविताचें ध्येय गांठलें, व जे निष्कामतेपर्यंत पोंचले, त्यांस सुद्धां लोकांकरितां कर्में करावीं लागतात. सर्व अंधांच्या पुढें जसा एक डोळस चालतो, त्याप्रमाणें अज्ञानी लोकांपुढें कर्मयोग्यानें स्वतःच्या आचरणानें धर्माचा कित्ता घालून द्यावा (क्र. ९५). ज्या बालकास अद्याप स्तनांतील दूध सुद्धां पितां येत नाहीं, त्यापुढें पक्वान्नें मांडलीं असतां तें जसें हास्यास्पद होईल, त्याप्रमाणें ज्यास कर्मेंसुद्धां नीट आचरितां येत नाहींत त्यास नैष्कर्म्यतत्त्व सांगणें हेंही हास्यास्पदच होणार आहे

( क्र. ९६ ). एऱ्हवीं, नांव परतीरास गेल्यावांचून ती मध्येंच सोडणें बरें नव्हे, अगर केळ फळल्यावांचून तिचा त्याग करणें हें उचित नाहीं, त्याप्रमाणें आत्मज्ञान जोंपर्यंत प्राप्त झालें नाहीं तोंपर्यंत कर्मादिकांवर उदासीन होणें हेंही अयोग्यच होय. अतिवेगामुळें जशी वेगाभावस्थिति प्राप्त होते त्याप्रमाणें कर्मातिशयानें नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होते ( क्र. ९७ ). आत्मज्ञान प्राप्त करून न घेतां जे दीक्षित यज्ञयागादि कर्मे करतात, ते पुण्याच्या नांवानें पापाचीच जोडणी करतात. हें त्यांचें स्वर्गास नेणारें पुण्यात्मक पाप नरकास नेणाऱ्या पापात्मक पापापेक्षां फारसें निराळें नाहीं. ज्याच्यायोगानें आत्मज्ञान प्राप्त होतें अशा शुद्ध पुण्याचा राजमार्ग सोडून हे लोक स्वर्ग व नरक या आडवाटांनीं जातात ( क्र. ९८ ). कर्मांत नैष्कर्म्यसिद्धि मिळविण्याचे चार उपाय आहेत. (१) आपण जीं कर्में करतों तीं स्वधर्मविहित आहेत म्हणून करावीत; वर्णविशेषवशानें जे स्वधर्म सांगितले आहेत त्यांचें आचरण केलें असतां आपोआप सर्व काम पूर्ण होतात ( क्र ९९ ). (२) सर्व कर्में करणें तीं अहंकाराचा त्याग करून करावींत. जो मनुष्य मोलानें तीर्थास जातो त्यास जसा मी तीर्थयात्रेस जात आहे असा अभिमान उत्पन्न होत नाहीं, अगर जो राजाचा शिक्कामोर्तब चालवितो त्यास जसा राजेपणाचा फुंज चढत नाहीं, अगर पुरोहितास दक्षिणा देत असतां जसा आपण यजमान आहों असा अभिमान उत्पन्न होत नाहीं, त्याप्रमाणें अहंकार सोडून आपण सर्व कर्में करावीं (क्र. १०० ). (३) अहंकारत्यागाप्रमाणेंच फलाशेचाही त्याग केला पाहिजे. खडकावर जसा पाऊस पडावा, अगर अग्नीवर जसें पेरावें, त्याप्रमाणें सर्व कर्मांचा शून्यांत लय होऊं द्यावा. आत्मजेच्या विषयीं जसा जीव निरभिलाष असतो, त्याप्रमाणें आपण निरभिलाष असावें ( क्र १०१ ). (४) आणि जीं कर्में करावीं तीं सर्व ईश्वरप्रीत्यर्थ व ईश्वरार्पणबुद्धीनें करावीं. आपलीं कर्में धुऊन देवाच्या हातांत दिल्यास तीं भाजलेल्या बीजाप्रमाणें अंकुरदशेप्रत मुकतील (क्र. १०२). ज्याप्रमाणें रथ आपण सरळमार्गावर आहों, किंवा आडमार्गावर आहों, हें जाणत नाहीं, त्याप्रमाणें कर्म व अकर्म या दोन्हीकडे स्पृहा न ठेवतां परमात्म्यास तीं अर्पण करावीं ( क्र. १०३ ).

स्वकर्मकुसुमांची पूजा ईश्वरास केल्यास अपारतोषानें ईश्वर आपल्या भक्तांस वैराग्यसिद्धिरूप प्रसाद देतो, व त्यामुळें इतर सर्व फलें त्यांस वमनाप्रमाणें वाटतात (क्र. १०४).

२०. नैष्कर्म्यसिद्धि ही आणखी एका प्रकारें होतें. सत्त्वरजतमांच्या पलीकडे जाऊन निस्त्रैगुण्य मिळविणें हीच नैष्कर्म्यसिद्धि. सत्त्वगुण सुद्धां पारध्याप्रमाणें सुख व ज्ञान यांचे पाश टाकून एखाद्या मृगाप्रमाणें सात्त्विक कर्त्यास जाळ्यांत गोंवितो. रजोगुण तर ग्रीष्मांतींच्या वाऱ्याप्रमाणें, अगर कामिनीकटाक्षाप्रमाणें, अगर विजेच्या तेजाप्रमाणें अत्यंत चंचल असून क्षणभरही विसांवा घेऊं देत नाहीं. तमोगुण हा जीवांचें मोहनास्त्रच होय. तमोगुणी मनुष्य जांभयांच्या परवडीत निमग्न असतो. त्याचें डोळे उघडे असूनहीं त्यास दिसत नाहीं. व हांक मारतांच तो ओ म्हणून उठतो. एखाद्या धोंड्याप्रमाणें तो मुरकुंडी मारून सर्वदा पडलेला असतो; पृथ्वी पाताळास जावो, अगर आकाश वर यवो, उठणें हा भाव त्याच्या चित्तांत उत्पन्न होत नाहीं. जेथल्या तेथें लोळावें एवढेंच त्यास वाटत असतें. झोंपेच्या सुखापुढें त्यास स्वर्गसुखही तुच्छ वाटतें; वाटेंत जात असतांही त्यास डोळा लागतो; व अमृतापेक्षांही तो निद्रेस श्रेष्ठ समजतो. या रजतमसत्त्वाच्या पलीकडे जाणें म्हणजेच निस्त्रैगुण्य मिळविणें. वसंत जसा वनलक्ष्मीस शिवत नाहीं, सूर्य जसा तारांगणांनीं लोपावें व कमळांनीं विकासावें हें जाणत नाहीं, त्याप्रमाणें त्रिगुणातीत हा कर्माकर्मापासून अलिप्त राहतो. एकदां अंगाची त्वचा टाकून सर्प पाताळीं रिघाल्यावर त्या त्वचेची तो जशी काळजी करीत नाहीं, त्याप्रमाणें गुणातीतता प्राप्त झाल्यावर कर्माकर्माचा मोह त्यास उत्पन्न होत नाहीं (क्र. १०६). या निस्त्रैगुण्यावस्थेंतच विश्वाश्वत्थाचें छेदन होतें, देहाहंतारूप म्यानांतून आत्मज्ञानरूपी तलवार बाहेर काढून ती प्रत्यग्बुद्धीच्या मुठींत धरावी; विवेकरूप सहाणेवर ती परजून निश्चयाचें एकदोन वेळ मुष्टिबळ पहावें; व निदिध्यासानें हत्यार व आपण एक झाल्यावर खांडावयास घाव घालण्याजोगें दुसरें कांहींच न उरल्यामुळें अश्वत्थ वृक्षही आपोआप नाहींसा होईल (क्र. १०७). कामक्रोधलोभांच्या

पलीकडे जाणें हेंही एक प्रकारचें निस्त्रैगुण्यच होय. त्रिदोषांनीं ज्याप्रमाणें शरीर सांडावें, अगर नगरांतून जसें त्रिकूट नाहीसें व्हावें, अगर अंतरांतून जसे त्रिदाह शमावे, त्याप्रमाणें हे कामादिक तीन शत्रू निघून गेले असतां मोक्षमार्गास उपयोगी असा सज्जनांचा संग लाभतो; जेथें आत्मानंद सदा वसत आहे अशा प्रकारचें गुरुकृपेचें भवन आतां प्राप्त होतें; प्रियाची अत्यंत सीमा जो माउली परमात्मा त्याचें दर्शन होतें; व त्याच्या संयोगानें संसाराचा गलबला आपोआप नाहींसा होतो. जो कामक्रोधलोभांस झाडून टाकील त्यासच अशा प्रकारचा मोठा लाभ प्राप्त होईल असें ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात ( क. १०८ ).

## साक्षात्कार.



२१. येथपर्यंत आपण ज्ञानेश्वरींतील नीतिमीमांसा पाहिली. आतां नीतिमीमांसेचें ध्येय जो आत्मसाक्षात्कार त्याचा ज्ञानेश्वरांनीं कसा मार्ग आंखला आहे तें आपण पाहूं. ज्ञानेश्वरांनीं मुख्य पंथराज एकच कल्पिला आहे. या पंथराजास मिळणाऱ्या चार वाटांचें म्हणजे ज्ञान, ध्यान, कर्म आणि भक्ति, यांचें त्यांनीं क. ११० मध्यें थोडेंबहुत दिग्दर्शन केलें आहे. या सर्व वाटा ज्या पंथराजास मिळतात त्या मार्गावर अद्यापही महेश कापडीच होऊन राहिला आहे. यात्र मार्गानें मागचे महर्षि, साधक, सिद्ध व आत्मविद चालत गेले. हा मार्ग पाहिला असतां तहानभूक विसरून रात्र व दिवस यांमधील भेद नाहींसा होतो. या मार्गावर जेथें जेथें पाऊल पडतें त्या त्या ठिकाणीं मोक्षाची खाणच उघडते ( क. १०९ ). परंतु अशा प्रकारचा मार्ग सर्वांसच साधत नाहीं. पुष्कळ लोक संसारांतच गुरफटून जातात. या शतधा भोंकें असणाऱ्या नावेंत रिघून ते निश्चिती कशी मानतात याचेंच आश्चर्य वाटतें. या चहूंकडे जळत असलेल्या वणव्यांतून बाहेर निघण्यास देवाच्या भक्तीवांचून दुसरें साधनच नाहीं. ( क. १११ ). या मृत्यूलोकांत कधीं सुखाची गोष्ट ऐकूं आली आहे काय ? इंगळांच्या अंथरुणावर सुखानें निद्रा लागणें केवळ अशक्य आहे. ज्या लोकांतील चंद्रही

क्षयरोगी आहे, जेथें उदयाचा अर्थ अस्त असाच होतो, जेथें पुढें गेलेल्यांचें पाऊल परत आलेलें दिसतच नाहीं, जेथील पुराणें म्हणजे मृत लोकांची एक मोठी कहाणीच होय, त्या लोकांत निश्चितीनें वागणें हें मोठें चमत्कारिकच नव्हे काय ? जंव जंव बाळ वाढतें तंव तंव तें मृत्यूच्या संनिधच जातें. आणि असें असूनही लोक येथें गुड्या उभारतात. मरणें हा शब्द त्यांच्या कानांस कसासाच लागतो. एखादा मासे खात असलेला बेडूक त्याच क्षणीं जसा सापाच्या जबड्यांत सांपडत असावा त्याप्रमाणें या लोकांची स्थिती आहे. येथून झडझडून बाहेर निघाल्यावांचून ईश्वराचें अव्यंग धाम मिळावयाचें नाहीं ( क्र. ११२ ). ईश्वरप्राप्त्यर्थ कोणतीही दृढभावना असली तरी चालेल. मग ती नारदअक्रूरांची भक्ति असो, वसुदेवादिकांचें ममत्व असो, कंसाचें भय असो, अगर शिशुपालादिकांचा घातकधर्म असो ( क्र ११३ ). या जगांत दुराचारी मनुष्यासही साधु बनतां येतें. असा दुष्कृती मनुष्य एकदां अनुतापतीर्थांत न्हाऊन देवाच्या राउळांत रिघाला म्हणजे त्याचें सर्व कुळ पवित्र होतें ( क्र. ११४ ). अंत्यज असो, स्त्रिया असोत, शूद्र असो, अगर पशूही असो, ज्यास माझी भक्ति त्यास माझा साक्षात्कार ठरलेलाच आहे. नक्रानें हत्तीचा पाय पकडला असतां त्यानें काकुळतीनें माझें स्मरण केल्याबरोबर त्याचें पशुत्वच नाहींसें झालें. खैराचीं लांकडें अगर चंदनाचीं लांकडें यांचा भेद अग्नीमध्यें राहत नाहीं; म्हणून कुळजातिवर्ण ही सर्व भक्तींत निष्कारण होत ( क्र. ११५ ). रूपानें, वयानें, अगर ज्ञानानें गजबजून जाऊन माझ्या भक्तीवांचून मनुष्य जिवंत राहील, तर निंबोण्यानें युक्त निंबाचें झाड जसें कावळ्यांच्याच उपयोगीं पडावें तशी त्यांची स्थिति होईल ( क्र. ११६ ). खऱ्या भक्तीचें स्वरूप म्हणजे पर्जन्याची जसी संतत धार भूमीवर लागावी, अगर नदीनें ज्याप्रमाणें आपली सकळ जलसंपत्ति घेऊन समुद्राप्रति गिंवसीत जावें, त्याप्रमाणें सर्वभावानें प्रेम धरवेंनासें होऊन ईश्वराच्या आंत मिळून जाणें हेंच होय ( क्र. ११७ ).

२२. अशाप्रकारची भक्ति मनुष्यांत प्रारंभी नसते. प्रत्यक्ष श्रीकृष्णाचा

प्रेमभक्त जो अर्जुन त्यानें याविषयीं जो आपला कबुलीजबाब दिला आहे तो ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. " पूर्वी ऋषीश्वरांनी जरी देवाचें रूप वर्णिलें होतें, तथापि तें मला खरें वाटत नव्हतें. नारद नेहमीं जवळ येऊन भगवंताचे गुण गात असे, तथापि त्याचा अर्थ न समजून आम्हीं गीतसुखच ऐकत होतों. आंधळ्याच्या गांवांत रवि उगवला असतां त्याचा प्रकाश त्यांस न दिसून केवळ आतपाचाच मात्र त्यांस अनुभव येतो. असित-देवल हे जरी तुझें रूप वर्णीत असत, तथापि माझी बुद्धि त्यावेळीं विषयविषानें माखिली होती. आतां मात्र तुझी कृपा झाल्यानें मला सर्व रहस्य कळून आलें. माळ्याने झाडांस कितीही पाणी घातलें, तथापि वसंत येईपर्यंत त्यांस फुलें फळें येत नाहींत " (क्र. ११९). अर्जुनाची जी स्थिति तीच सर्व साधकांची स्थिति असते. तनुमनजीवानें ते संतांच्या चरणांस लागल्यास पुण्योदय होऊन त्यांस श्रीगुरु भेटेल (क्र. १२०). गुरुकृपालब्धी-वांचून आत्मसिद्धि होत नाहीं (क्र. १२१) कीर्तनांत मग्न झालेल्या संतांचें माहात्म्य वर्णन करतां येणें शक्य नाहीं. ईश्वराच्या नामघोषानें सर्व विश्वाचें दुःख लयास नेऊन सगळें जगच ते आनंदानें भरून टाकतात. कृष्ण विष्णु हरि गोविंद या नामांच्या संकीर्तनानें ते देश व काल यांस विसरून जातात (क्र. १२२). उपाय केला असतां ज्याप्रमाणें एखादा पांगळाही पाहडावर चढूं शकतो, त्याप्रमाणें सदभ्यास करून परमपुरुषाकडे लक्ष ठेविलें असतां त्याची प्राप्ति होऊं शकते. चित्तानें एकदां आत्म्यास वरिलें म्हणजे मग देह असो वा जावो त्याची किंमत रहात नाहीं ( क्र. १२३ ). ज्या ज्या क्षणी म्हणून देवाचें सुख प्राप्त होईल त्या त्या क्षणीं तरी निदान विषयाबद्दल अप्रीति उपजेल. अभ्यासानें विष पचवितां येतें, आणि व्याघ्र व सर्प हेही ताब्यांत घेतां येतात. म्हणून अभ्यासास कोणतीच गोष्ट दुष्कर नाहीं ( क्र. १२४ ). अभ्यासाचें स्थानही मोठें मनोहर असून तेथें अमृता-प्रमाणें सदा फळणारीं झाडें असावीं. फारसें ऊन अगर फारसा वाराही तेथें नसावा. निःशब्द असलें म्हणून तेथें श्वापद नसावें. पोपट अथवा भ्रमर तेथें नसावा. एखादे वेळेस हंस, अगर कोकीळ, अगर मयूर आला असतां आमची हरकत नाही ( क्र. १२५ ). अशा ठिकाणीं अभ्यास करून

कुंडलिनीचें उत्थान झाल्यावर अनाहताची बोली चाळवूं लागते, जणूं कांहीं आकाशासच वाचा फुटली आहे असें वाटतें ! ( क्र. १२६ ). देवाचें रूप सर्वत्र दिसावयास लागणें हीच ध्यानाची परिसमाप्ति होय. पुढें मागें, खालीं वर, सन्मुख विन्मुख ज्याप्रमाणें अर्जुनास देवाचें रूप दिसलें (क्र. १२९), त्याप्रमाणेंच सर्व साधकांस दिसावयास पाहिजे. जणूं कांहीं देव हातांत दिवटी घेऊन पुढें चालल्याप्रमाणें सर्वत्र लखलखाट होतो ! (क्र. १३१). कल्पांतीं ज्याप्रमाणें द्वादशादित्यांचें तेज एकवटावें, त्याप्रमाणें देवाच्या अंगप्रभेचा चमत्कार काय म्हणून सांगावा ( क्र. १३२ )? बाहेर दृष्टि उघडून पाहिलें असतां ज्याप्रमाणें देवाचें रूप दिसतें त्याप्रमाणें आंतही तसेंच दिसतें. पहात असतांना देवाचें रूप दिसावें यांत नवल काय ? न पाहतांही तें दिसतें हेंच आश्चर्य होय ( क्र. १३३ ). दर्पणाच्या आधारें आपलें रूप मूर्ख लोक आपण पाहतात तशांतला हा भाग नाहीं. ज्याप्रमाणें झरा आपल्या उगमामध्येंच सांचून रहावा, अगर पाणी आटलें असतां प्रतिबिंब ज्याप्रमाणें बिंबांतच मिसळून जावें, त्याप्रमाणें स्वरूपदर्शन आहे. ज्यांनीं आपण आपल्यास पाहिलें, त्यांनी आपल्या मूळच्या स्थानाचें जयपत्र घेतलें असें म्हणण्यास हरकत नाहीं ( क्र. १३५ ).

२३. ज्यांस असा आत्मसाक्षात्कार झाला त्यांचीं चिन्हे ज्ञानेश्वरीमध्यें निरनिराळ्या ठिकाणीं फार उत्तम रीतीनें वर्णिली आहेत. ज्यास आत्मसुख प्राप्त झालें त्यांस सहजच विषय सांडवतात हें सांगण्याचें कारण नाहीं. कुमुददळाच्या ताटावर चंद्रकिरणें जेवणारा चकोर वाळुवंट चुंबील काय ( क्र. १३६ ) ? अशा मनुष्यापुढें ऋद्धिसिद्धी आल्या गेल्या तरी तो महासुखांत निमग्न असल्यामुळें त्यांची त्यास किंमत रहात नाहीं ( क्र. १३८ ) क्षीरसागर मंदराचलानें न घुसळतां आयतें प्राप्त झालेलें जें हें परमामृत त्याची केवळ भाषा ऐकूनही संसार वाव होईल; मग त्याचें सेवन केलें असतां काय होईल हें सांगण्यासच नको ( क्र. १३९ ) एकासनावर बसून आदरानें सद्‌गुरुस्मरण अनुभवित असतां अंतर्बाह्य सात्विक गुणानें भरून जाऊन अहंभावाचें काठिन्य नाहींसें होतें व इंद्रियांची कसमस मोडते.

मनाची घडी आंतल्या आंत बसते, व बसतांक्षणींच अभ्यासाचें फल प्राप्त होतें (क्र. १४१). चित्त परतून ज्यावेळीं आपण आपल्यास पाहतें, व तें तत्व मी अशी ज्यावेळेस त्याची खात्री पटते त्यावेळेस सुखाचें साम्राज्य उत्पन्न होते (क्र. १४२). अशा पुरुषास पृथ्वीच्या मोलाचें अनर्घ्य रत्न एखाद्या गारगोटीसारखें वाटावें हें नवल नव्हें ( क्र. १४२ ). पिकलेलीं केळीं ज्याप्रमाणें उन्मळून पडतात, त्याप्रमाणें आत्मलाभानें अशा पुरुषाच्या क्रिया हळूंहळू गळून पडतात. एखाद्या वृक्षास आग लागली असतां ज्याप्रमाणें त्यावरील पक्षी उडून जातात, त्याप्रमाणें अशा मनुष्याच्या मनांतील संशय नाहींसे होतात ( क्र. १४६ ). जिंकणारा व हरणारा या दोघांसही युद्धभूमि ज्याप्रमाणें सारखीच लेखते, त्याप्रमाणें मित्र अगर शत्रु हे दोघेही यास सारखेच वाटतात. खांबास रात्र काय किंवा उजेड काय, निद्रिस्तास अंगाशीं लगटणारा सर्प असो अगर उर्वशी असो, त्याप्रमाणेंच अशा पुरुषास कोणी ईश्वर म्हणून पूज्य म्हणो अगर चोर म्हणून गांजो, हा दोघांस सारखेच लेखतो (क्र. १४७). ध्यानाचे वेळीं अष्टसात्विक भाव उत्पन्न झाल्यानें तो आनंदाच्या परमावधीस पोंचतो; आंतबाहेर गात्रांचें बळ हारपून जातें; वर्षाऋतूंत ज्याप्रमाणें शैलाच्या अंगावर सर्वत्र कोमल अंकुर फुटावेत त्याप्रमाणें त्याच्या अंगावर स्वेदकणिका उत्पन्न होतात आंत सांपडलेल्या अलिकुळामुळें ज्याप्रमाणें कमलकलिका आंदोळते, त्याप्रमाणें आंतल्या सुखोर्मींच्या बळानें हा बाहेर कांपतो; कपूरकर्दळीचीं गर्भपुटें उकललीं असतां ज्याप्रमाणें आंतून थेंब पडावेत त्याप्रमाणें याच्या नेत्रांतून थेंब पडतात; आणि समुद्रास वेळोवेळीं ज्याप्रमाणें भरती यावी त्याप्रमाणें हाही वेळोंवेळीं सुखोर्मीनें उचंबळून येतो ( क्र. १४८ ). स्वरूपाच्या आलिंगनवेळीं ‘ दोन ’ ही भाषा नाहीशी होऊन सुखरूपानेंच केवळ हा तेथें राहतो ( क्र. १५० ). परंतु ही स्थिति प्राप्त होण्याचें भाग्य लक्षावधि लोकांमध्यें एखाद्यासच लाभतें; असंख्य सैनिकांतून ज्यावेळीं शस्त्रें शरीरांत घुसतात त्यावेळीं विजयश्रियेच्या पाटावर बसणारा मनुष्य विरळाच ( क्र. १५१ )! औषध घेतल्याबरोबर ज्याप्रमाणें एकदम

आरोग्य होत नाहीं अगर सूर्य उगवल्याबरोबर ज्याप्रमाणें माध्यान्ह होत नाहीं, त्याप्रमाणें ही स्थितीही एकदम प्राप्त होत नाहीं. ओल्या जमिनींत उत्तम बीज पेरिलें तरी अलोट फळ येण्यास वेळच लागतो; भुकेल्यामुळें षड्रस पक्वान्नें वाढिलीं तरी त्याची तृप्ति ग्रासोग्रासींच होत जातें; त्याप्रमाणें वैराग्यलाभ झाला, सद्गुरूची भेट झाली, उत्तम मार्गही प्राप्त झाला, तरी आत्मसाक्षात्कार होण्यास वेळ लागतोच. एकदां आत्मसाक्षात्कार झाल्यावर त्यास साधन करण्याची फारशी जरूरी रहात नाहीं, असें ज्ञानेश्वरांचें मत आहे. एकदां योगतुरंग स्थिर झाला म्हणजे हा वैराग्याचें अंगत्राण किंचित् ढिलें करतो, व दुजा भावच नाहींसा झाल्यानें ध्यानाची तलवार आवरती घेतो; महोदधीस गंगा मिळाली असतां ती जसा आपला वेग सांडते, अगर कामिनी कांतापाशीं जशी स्थिर होते, तसा हा आत्मसाक्षात्कार झाल्यावर साधनहत्यार हळूंच ठेवतो तथापि पौर्णिमेपेक्षां चतुर्दशीदिवशीं ज्याप्रमाणें चंद्राचें बिंब किंचित् न्यून असतें, अगर सोळाकशी सुवर्णापेक्षां पंधराकशी सुवर्ण जसें थोडेंसें कमी पडतें, त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें आणि ब्रह्म होणाऱ्यामध्यें किंचित् तरी फरक राहतोच (क्र. १५३).

२४. देव आणि भक्त यांच्या संबंधाविषयींचें ज्ञानेश्वरांचें वर्णन आत्मसाक्षात्काराच्या इतकेंच बहारीचें आहे. भक्तानें वाट पाहिली कीं देव त्यापुढें उभा राहिलाच असें समजावें (क्र. १५४). देवसुखांत निमग्न झालेल्या भक्तांचा परस्पर सुखसंवाद अनिर्वर्णनीय आहे. दोन भरलेलीं सरोवरें जवळ जवळ असावींत आणि एकांतील तरंग दुसऱ्यांत, व दुसऱ्यांतील तरंग पहिल्यांत, असें व्हावें त्याप्रमाणें याचा अनुभव त्यास व त्याचा अनुभव यास मिळून दोघांचाही आनंद वाढतो. जणूं कांहीं त्यांच्या आनंदकल्लोळांची वेणीच पडते असें म्हटलें तरी चालेल! सूर्यानें सूर्यास ओवाळावें, अगर चंद्रानें चंद्रम्यास क्षेम द्यावें, त्याप्रमाणें त्यांच्या ऐक्यरसाचें प्रयाग बनतें. गुरुशिष्यांतील एकांतांत ज्या एका अक्षराचा उच्चार सांगितला जातो, तो आतां ते त्रिभुवनास मेघाप्रमाणें गर्जून

सांगतात. कमळकळिका उमलल्यावर ज्याप्रमाणें आंतला मकरंद बाहेर पडतो, त्याप्रमाणें त्यांच्या आंतील आनंद विश्वामध्यें पसरतो, आणि त्यांतच तेही लीन होतात ( क्र. १५५ ). जें कृष्णानें आपल्या पित्या वसुदेवास सांगितलें नाहीं, अगर माते देवकीस सांगितलें नाहीं; अगर बंधु बळिभद्रास सांगितलें नाहीं, तें गुह्य तो अशाच आपल्या भक्तास सांगतो ( क्र. १५६ ). अशा भक्तांच्या अंत:करणांत जीव व परमात्मा दोन्ही एकाच आसनावर बसून शोभायमान होतात अशा प्रकारचा भक्त म्हणजे वल्लभा, व मी म्हणजे कांत, अशी सख्यभक्ति त्यांत उत्पन्न होते. आपल्या प्रेमास्पद मनुष्याबद्दल बोलूं लागलें असतां भूलच पडते असें म्हणून श्रीकृष्ण या वेळीं डोलूं लागला ( क्र. १५७ ). भक्तांच्या योगक्षेमांची काळजी देवास नेहमींच असते जो जो भाव भक्त मनीं धरील तो तो त्यास देव देतो, व दिलेल्याचें रक्षणही करतो ( क्र. १५८ ). समर्थाच्या कांतेस ज्याप्रमाणें कोरान्न मागण्याचा प्रसंग येत नाहीं, त्याप्रमाणें देवाच्या एकांतिक भक्तांस कोणतीच चिंता पडत नाही ( क्र १५९ ). आणि ज्या प्रकारें हें त्याचें सुख वाढेल व काळाची दृष्टी त्यावर पडणार नाहीं त्या प्रकारें करणें हें देवाचें कर्तव्य बनतें. लहान मूल जो जो खेळ दाखवील, तो तो त्याची माता ज्याप्रमाणें सोन्याचा करून त्याच्यापुढें ठेविते, त्याप्रमाणें भक्तांच्या मनांतील भाव देव जास्त करून पुरवितो ( क्र. १६० ) एखादें फळ भक्तानें देवाकडे दाखविलें असतां देव दोन्हीं हात पुढें करून तें घेतो; फूल दिलें असतां त्याचा वास घ्यावा, पण तें तो तोंडातच घालतो; वाळलेलें पान दिलें असतांही देवास तें सर्वभावानें माखलेलें दिसून तो तें खाऊं लागतो; भक्तानें देवास उदक जरी अर्पण केलें तरी वैकुंठींच्या भवनापेक्षांही त्यास तें जास्त प्रिय वाटतें. ( क्र. १६१ ) भक्तास देव आपल्या डोक्यावरील मुकट करतो, अगर त्याची टांच हृदयांत बाळगतो. ( क्र. १३२ ). सहस्रावधि नामांच्या नावा करून भक्तांस संसारसागरांतून हा पार पाडतो. सड्यांस ध्यानकांसेस लावून, परिग्रही लोकांस प्रेमाच्या तरियांवर घालून, तो सर्वांसच पार उतरतो. चतुष्पादादि प्राण्यांस देखील

वैकुंठींचें साम्राज्यभाक् करतो ( क १६३ ). देहांतींच्या दुःखानेंहीं सर्व प्रकारें देव निवारण करतो. इंद्रियांचें बळ पार हारपल्यावर, आंत बाहेर मृत्युचिन्हें उमटल्यावर, भक्तांस समाधानास जरी बसतां आलें नाहीं, तथापि भक्तानें देवाची नित्य सेवा केली असल्यानें देव शेवटीं भक्ताची परिचर्या करतो. अशी गोष्ट न होईल तर जन्मभर केलेल्या उपासनेचा उपयोग काय असें ज्ञानेश्वर विचारतात ? ( क. १६४ ) ज्याप्रमाणें घंटानादाचा लय घंटेंतच होतो, अगर झांकलेल्या घटांतील दिवा कोणास न कळतां त्यांतच निमून जातो, त्याप्रमाणें असा पुरुष आपला देह ठेवितो. असें भक्त शरीर गेल्यावर देव होतात यांत नवल तें काय ? मरणाऐलीकडेच ते मला मिळून मुक्त झालेले असतात. ( क. १६९ ) जीवन्मुक्ति अनुभवीत असतां या भरलेल्या जगांत तिसऱ्याची मात नाहीशी होऊन देवाचा व भक्तांचा एकांत झालेला असतो ( क १७० ); आणि माझ्या स्वरूपास पोंचूनही ते माझी भक्ति करतात हा किती मोठा चमत्कार म्हणून सांगावा (क. १७१) ते जें बोलतात तें माझें स्तवन, ते जें पाहतात तें माझें दर्शन, ते कल्पितात तो माझा जप; उदकांशी कल्लोळांचा, कापरांशीं परिमळाचा, अगर रत्नांशीं तेजाचा जसा एकवट संयोग असतो, तसाच देवाचा व भक्ताचा जीवन्मुक्त्य-वस्थेंत एकवट संयोग होतो, ( क. १७२ ) ? जीवन्मुक्त्यवस्थेंत खरी स्वराज्य प्राप्ति कशी होते याचे ज्ञानेश्वरांनीं फार उत्तम वर्णन केलें आहे. वैराग्याचें चिलखत अंगांत चढवून राजयोगतुरंगावर आरोहण करून हातांत ध्यानाचें खड्ग धरून मोक्षविजयश्रीला वरण्याकरितां ज्या वेळेस हा स्वार होऊन निघतो, त्यावेळेस प्रथम आडवावयास आलेले जे सहा वैरी, अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध, व परिग्रह, या सर्वांचा तो फन्ना उडवितो, व नंतर अमानित्वादि गुणरूप जे कैवल्यदेशीचे राजे ते यास सामोरे येतात; त्यांच्याशीं मिसळून अवस्थाभेदरूपी प्रमदा सुखाचें लोण उतरीत असतां, योगभूमिका आरती करीत असतां, ऋद्धिसिद्धि वगैरे देवता अंगावर पुष्पांचा वर्षाव करीत असतां, तो जसा स्वराज्याच्या जवळ येतो तसे तीन्ही लोक आनंदानें उचंबळून जातात ( क. १७४ ). त्यावेळीं " जैत रे

जेंत " म्हणून ध्यानाची नौबत वाजते, व तन्मयाचें एकछत्र डोक्यावर तळपूं लागतें; अशाच वेळीं तो समाधिश्रियेसकट आत्मसुखाच्या राज्यावर आपल्यास पट्टाभिषेक करवितो ( क्र. १७५ ). आतां देव व भक्त हा भेद कोठें राहिला ? दोन उठलेले सारखे आरसे एकमेकांपुढें ठेविले असतां कोण कोणास प्रतिबिंबितो असें म्हणावें ? अर्जुनानें आपल्यास श्रीकृष्णासकट यावेळीं कृष्णामधें पाहिलें, व श्रीकृष्णानें आपणांस अर्जुनासकट अर्जुनामध्यें पाहिलें, संजयही हा प्रसंग सांगत असतां इतका तन्मय होऊन गेला कीं तोही त्या दोघांमध्यें लुप्त होऊन गेला ( क्र १७६ ).

२५. अशा प्रकारचे देव व भक्त जेथें आहेत तेथें कोणत्याही कार्यांत यश यावयाचेंच. जेथें चंद्र तेथें चंद्रिका; जेथें वन्हि तेथें दहनसामर्थ्य, जेथें सूर्य तेथें प्रकाश हा असावयाचाच, कृष्ण हा प्रत्यक्ष विजयरूप असल्यानें व अर्जून हा विजयी असल्यानें कार्यांत यश हें ठरलेलेंच आहे. येवढी मायबापें जेथें आहेत त्या देशींचीं झाडें कल्पतरू बनतील; पाषाण चिंतामणी होतील; त्या गांवच्या नद्या अमृतानें वाहतील. त्यांचें बिसाट शब्द वेदांइतके प्रमाणभूत होतील, व ते प्रत्यक्ष सदेह सच्चिदानंदरूप बनतील. व्यासाच्या शब्दांवर तुमचा विश्वास असेल तर हें खरें माना; जेथें श्रीवल्लभ, व जेथें भक्तकदंब आहे तेथें सुख व मंगळाचा लाभ झालाच पाहिजे ही गोष्ट खोटी होईल तर मी व्यासाचा शिष्यच नव्हे, असें म्हणून संजयानें या वेळीं आपला बाहु उभारला ( क्र. १७७ ). ज्ञानेश्वरमहाराज यांचें वर्णन करून देवाजवळ एकच प्रसाददान मागतात. तें हें कीं या जगांत सर्व दुष्टांचा व्यंकटभाव नाहींसा व्हावा; सर्व जीवांचें एकमेकांशी अपरिमित प्रेम जडावें, स्वधर्मसूर्याचा सर्व विश्वांत प्रकाश व्हावा; ज्यांस जें पाहिजे असेल ते त्यांस मिळावें; प्रत्यक्ष चालते कल्पतरू, अगर सजीव चिंतामणीच्या खाणीं, अगर बोलते अमृताचें सागर असे ईश्वरनिष्ठ भक्त सर्व भूतांस भेटावें. या ज्ञानेश्वरांच्या मागण्यानें विश्वेशरांस मोठा संतोष झाला. व त्यानें " हा प्रसाद होईल " असा ज्ञानेश्वरांनीं वर दिला ( क्र. १७८ ).

२६. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ फार गहन आहे हें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. ज्ञानेश्वरीची भाषा जुनी असल्यानें कांहीं ठिकाणीं ती दुर्गम वाटून ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाकडे लोक जसे प्रवृत्त व्हावेत तसे ते होत नाहींत. या प्रस्तुतच्या ग्रंथामुळें मूळ ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाकडे लोकांचें लक्ष जाईल तर प्रस्तुत लेखकास धन्यता वाटेल. या ग्रंथाचे कामीं प्रो. शंकर वामन दांडेकर, रा. सा. वासुदेवराव दामले, रा. गणेश गोविंद कारखानीस, रा. शंकर केशव धर्माधिकारी, व जगन्नाथ रघुनाथ लेले या सर्वांची जी निरनिराळ्या प्रकारची मदत झाली आहे तिजबद्दल प्रस्तुत लेखक त्या सर्वांचा फार आभारी आहे. ज्ञानेश्वरवचनामृत ग्रंथ छापण्याचे कामीं जगद्धितेच्छु प्रेसच्या मालकांनी, व प्रस्तावना छापण्याचें कामीं आर्यभूषणप्रेसच्या मालकांनीं, जी दक्षता व कार्यक्षमता दाखविली त्याबद्दल मी त्यांचाही फार आभारी आहे.

रा. द. रानडे



# ज्ञानेश्वरवचनामृत

## अनुक्रमणिका


विषय पृष्ठ

### १. प्रास्ताविक

१ ज्ञानेश्वरीरचनेचा स्थलकालनिर्देश ... ... १
२ ज्ञानेश्वरांची गुरुपरंपरा २
३ ज्ञानेश्वरांचा आपल्या गुरुविषयीं आदर ... ३
४ सद्गुरुकृपेस काय अशक्य आहे ? ... ... ३
५ गुरुकृपेचें वर्णन करणें शक्य नाहीं ... ... ४
६ गुरुकृपेचें आवाहन ५
७ गुरुकृपेचें महत्त्व ... ६
८ गुरूचें अनिर्वर्णनीयत्व ६
९ श्रीगुरुपादपूजन ७
१० निवृत्तिनाथ म्हणजे चित्सूर्यच होय ... ... ८
११ श्रीनिवृत्तींच्या कृपेचें महत्व ९
१२ ज्ञानेश्वरांची संतांपुढें नम्रता ... ... ... १०
१३ ज्ञानेश्वरांची स्वाभिमानपूर्ण नम्रता ... ... ११

विषय पृष्ठ

### २. तत्त्वज्ञान

१४ आत्मा द्रष्टा व प्रकृति कर्त्री ... ... ... १३
१५ प्रकृतिपुरुषसंबंध १४
१६ प्रकृतिपुरुषविवेक १५
१७ प्रकृति व पुरुष १८
१८ क्षर, अक्षर व पुरुष १९
१९ क्षरविचार ... ... २०
२० अक्षरविचार ... २१
२१ उत्तमपुरुष ... २२
२२ क्षेत्रविचार ... २४
२३ अनित्य देह, नित्य आत्मा २५
२४ सत्त्वरजतमवृत्तींचा मृत्यूवर परिणाम ... ... २६
२५ जीवांची मृत्यूनंतर परमात्म्याशी भेदाभेदस्थिति ... ३०
२६ आत्मा येत नाहीं व जात नाहीं ... ... ३२
२७ विश्वाश्वत्थाचें वर्णन ३३
२८ ऊर्ध्वमूळ म्हणजे काय ? ३४
२९ मुळाचा बीजांकुरफळभाव ३५

| विषय | पृष्ठ |
|---|---|
| ३० न श्वोऽपि तिष्ठतीति अश्वत्थः। ... ... ... | ३६ |
| ३१ अश्वत्थाचें उन्मूलन म्हणजे काय ? ... ... | ३८ |
| ३२ अश्वत्थास आदि, अंत व स्थिति मुळींच नाहीत | ३९ |
| ३३ सर्वभावानें ईश्वराचें भजन करणारें लोकच मायासागर तरून जातात ... | ४१ |
| ३४ ईश्वर नाहीं म्हणणरें लोक केवळ दैवहीन होत ... | ४२ |
| ३५ विश्वांतील सर्व सत्ता ईश्वराकडे आहे ... ... | ४२ |
| ३६ देवाचा जगताशी संबंध | ४३ |
| ३७ ईश्वर सर्वकर्ता असून मनुष्य हा निमित्तमात्र आहे. ... | ४४ |
| ३८ ईश्वरास स्थूलदृष्टीनें पाहणें हें पाहणें नव्हे ... | ४४ |
| ३९ ईश्वरास मानुषधर्म लावणें हें चुकीचें होय ... | ४५ |
| ४० देवाची ईश्वराविषयीं तळमळ ... ... ... | ४६ |
| ४१ ईश्वर हाच सर्व विश्वाचें मूळ आहे ... ... | ४७ |
| ४२ विषमभूतग्रामामध्यें एकाच्च समवस्तूचें दर्शन ... | ४८ |
| ४३ जगास परतें सारून ईश्वरास पाहूतां येणें शक्य नाहीं | ४९ |
| ४४ ईश्वराच्या रूपाचें याथातथ्यरीतीनें अज्ञेयत्व ... | ४९ |
| ४५ ज्ञान हें ईश्वरापुढें अज्ञान होय ... ... | ५० |
| ४६ तूं गुणत्रयाचा अव्हेर करून आत्मसुखाचा उपभोग घे | ५१ |
| ४७ साधु हाच महाभूतांच्या माथ्यावर चढूं शकतो | ५१ |
| ४८ ईश्वरस्वरूपाचें ज्ञान म्हणजेंच ईश्वराच्या सर्व विभूतींचें ज्ञान होय ... ... | ५२ |
| ४९ अर्जुनाची विश्वरूपदर्शनाबद्दल उत्कठा ... ... | ५३ |
| ५० ईश्वराचें मृद्दलरूप | ५४ |
| ५१ ईश्वराचें अतींद्रियस्वरूप चर्मदृष्टीनें पाहणें शक्य नाहीं | ५५ |
| ५२ दिव्यदृष्टीनें ईश्वराचें स्वरूपदर्शन ... ... | ५५ |
| ५३ अर्जुनाचें अपराधक्षमापनस्तोत्र ... ... | ५६ |
| ५४ अर्जुनाचें घसाळपण | ५६ |
| ५५ विश्वरूपाचें पुनः कृष्णरूप | ५८ |
| ५६ भक्त हेच योगयुक्त होत | ५९ |
| ५७ अव्यक्तोपासक हेही मलाच मिळतात ... | ६० |
| ५८ ब्रह्मस्वरूपाची अखंडस्थिति | ६० |

विषय पृष्ठ
५९ ब्रह्मस्वरूपाचें अनिर्वर्णनीयत्व ... ... ... ६१
६० चित्सूर्याचें अप्रतिम वर्णन ६३

३ नीतिविचार

६१ इंद्रियांचें बळकटपण ६४
६२ अमानित्व ... ... ६४
६३ अखंड अगर्वता ... ६६
६४ अदंभित्व ... ... ६७
६५ अहिंसा ... ... ६८
६६ क्षांति ... ... ७३
६७ आर्जव ... ... ७४
६८ आचार्योपासन ... ७४
६९ शुचित्व ... ७९
७० स्थैर्य ... ... ८०
७१ आत्मविनिग्रह ... ८१
७२ वैराग्य ... ... ८२
७३ अनहंकार ... ८३
७४ दोषदर्शन ... ८४
७५ अनासक्ति ... ८७
७६ एकांतप्रियता ... ८७
७७ अनन्यभक्ति ... ८८
७८ अध्यात्मज्ञान ... ८८
७९ अज्ञानलक्षण ... ८९
८० दैवी संपत्तीचें वर्णन ९७
८१ आसुरी संपत्तीचें वर्णन १०६
८२ परमात्मा हाच बुद्धीची अवधि होय ... ... १०९

विषय पृष्ठ
८३ कर्म हाच संन्यास १०९
८४ संकल्पनाशानें परमात्म्याचें सांनिध्य ... ... ११०
८५ परिमितता ... ११०
८६ साधूची आत्यंतिक समता १११
८७ सात्त्विक यज्ञ ... ११२
८८ शारीर तप ... ११३
८९ वाङ्मय तप ... ११४
९० मानसिक तप ... ११५
९१ राजस तप ... ... ११६
९२ तामस तप ... ... ११७
९३ ईश्वराचा अभेदसाक्षात्कार म्हणजेच ईश्वरास शरण जाणें ... ... ११७
९४ कर्मांत नैष्कर्म्यसिद्धि ११९
९५ संतांस कर्माचरणाविषयीं आग्रह ... ... ११९
९६ नैष्कर्म्यतत्त्व कोणास सांगावें ? ... ... ... १२०
९७ कर्मानें सत्त्वशुद्धि व सत्त्वशुद्धीनें मोक्ष ... १२१
९८ ईश्वरावांचून त्रयीधर्म निष्कारण होत ... ... १२२
९९ स्वधर्म हाच कामधेनु होय १२३
१०० अहंकारविरहित कर्मयोग ... ... ... १२४

| विषय | पृष्ठ |
|---|---|
| १०१ फलाशेचा त्याग ... | १२५ |
| १०२ कर्माचें ईश्वरार्पणत्व | १२६ |
| १०३ कर्में ईश्वरार्पण केल्यानें ईश्वरप्राप्ति ... | १२७ |
| १०४ स्वकर्मकुसुमांनीं विश्वात्मक ईश्वराची पूजा. | १२८ |
| १०५ प्रकृतिपासून सत्त्वरजतमांची उत्पत्ति ... | १२८ |
| १०६ निस्त्रैगुण्यानें स्वरूपदर्शन ... ... ... | १३१ |
| १०७ वैराग्यानें अश्वत्थवृक्षाचें छेदन ... ... | १३३ |
| १०८ कामक्रोधलोभांच्या निर्मूलनानें आत्मसाक्षात्कार ... ... ... | १३४ |

## ४. साक्षात्कार

| विषय | पृष्ठ |
|---|---|
| १०९ पंथराज ... ... | १३६ |
| ११० चार मार्गांचें दिग्दर्शन ... ... ... | १३७ |
| १११ ईश्वरास भजल्यावांचून गत्यंतरच नाही ... | १३८ |
| ११२ ईश्वरप्राप्तीनेंच दुःखनिवृत्ति ... ... ... | १३८ |
| ११३ ईश्वराबद्दल कोणतीही एक दृढभावना पाहिजे | १४० |
| ११४ दुराचारी सुद्धां साधु होऊं शकतो ... ... | १४१ |
| ११५ ईश्वरभक्तीविषयीं कुळजातिवर्णांचें निष्कारणत्व | १४२ |
| ११६ “ माझिये भक्तीविण । जळों तें जियालेंपण ” | १४३ |
| ११७ भक्तीचें स्वरूप | १४४ |
| ११८ भक्ति म्हणजे अभेदज्ञान ... ... ... | १४४ |
| ११९ प्रथम भक्तीकडे प्रवृत्ति नसते. ... ... | १४५ |
| १२० संतांस भजल्यानें रहस्यप्राप्ति ... ... | १४७ |
| १२१ गुरुकृपेनें आत्मसिद्धि | १४८ |
| १२२ नामघोषगौरवानें विश्व धवळित होतें ... | १४९ |
| १२३ “ पंगुं लंघयते गिरिं ” | १५१ |
| १२४ अभ्यासास कोणतीच गोष्ट दुष्कर नाहीं ... | १५१ |
| १२५ अभ्यासास उपयोगी स्थान कसें असावें ? | १५२ |
| १२६ कुंडलिनीचें उत्थान व अनाहतनादश्रवण | १३३ |
| १२७ योग हा अग्निप्रवेशाइतकाच कठीण आहे ... | १५४ |
| १२८ ईश्वराचें सर्वगत ध्यान | १५५ |
| १२९ देव सन्मुख विन्मुख दोहींकडे आहे | १५५ |

विषय पृष्ठ

१३० ईश्वराचा ज्ञानियांस उदय ... ... ... १५६
१३१ ' और वो एक शिपाई " ... ... ... १५७
१३२ ईश्वराचें अप्रतिम तेज ... ... ... १५७
१३३ ईश्वराचा सबाह्याभ्यंतर साक्षात्कार ... १५८
१३४ ईश्वराचें अमेयत्व १५८
१३५ आत्मसाक्षात्कार १५९
१३६ आत्मसुखानें विषयध्यानाचा नाश ... ... १६०
१३७ साधूंचीं चिन्हें ... १६१
१३८ ज्यास परमानंदाची प्राप्ति झाली तोच स्थितप्रज्ञ १६१
१३९ परमामृतप्राप्तीसाठीं क्षीराब्धिमंथनाचें कारण नाहीं. ... ... ... १६२
१४० साक्षात्कारी पुरुषाचें देहाविषयीं औदासीन्य १६३
१४१ ईश्वरध्यानाचा शारीरिक परिणाम ... १६४
१४२ ईश्वरध्यानाचा आध्यात्मिक परिणाम ... १६४
१४३ साधूची पद्मपत्राप्रमाणें अलिप्तता ... १६५

विषय पृष्ठ

१४४ ' शरीरीचि परी कौतुकें । परब्रह्माचेंनि पाडें तुके ' १६६
१४५ स्थितप्रज्ञस्थिति ... १६७
१४६ साधूंची नीतिलक्षणें १६७
१४७ त्रिगुणातीताचा अभेदभक्तियोग ... ... १६८
१४८ अष्टसात्त्विकभाव ... १७३
१४९ ' अंतरात्मयाही निश्चळा । आली शियारी. ' १७४
१५० स्वरूपानंदांत द्वंद्वभाषेचा आत्यंतिक लोप ... १७४
१५१ ' प्राप्तीचिया पैलतीरीं । विपाइला निघे. ' १७५
१५२ ईश्वराचा क्रमाक्रमानें साक्षात्कार, ... १७५
१५३ ' साधन हतियेरु । हळूंच ठेवी. ' ... ... ... १७७
१५४ भक्तांची ईश्वरस्वरूपांत निमग्नता ... ... १७८
१५५ भक्तांचें संवादसुख १७९
१५६ ईश्वरास प्रियतम कोण ? ... ... ... १८०
१५७ " तो वल्लभा मी कांता। ऐसा पढिये. " १८०
१५८ भक्तांच्या योगक्षेमाची काळजी देवास आहे. १८१

| विषय | पृष्ठ |
|---|---|
| १५९ " काय समर्थाची कांता । कोरान्न ? मागे " | १८२ |
| १६० " आणि काळाची दृष्टि न पडे । हें आम्हां करणें " ... ... ... | १८३ |
| १६१ " आम्हीं भावाचे पाहुणे । भलतेया " ... | १८४ |
| १६२ " तयांतें आम्हीं माया । मुकुट करूं " | १८५ |
| १६३ भक्तांच्या उद्धाराची काळजी ईश्वरास आहे | १८६ |
| १६४ देहांतील दुःखाचें ईश्वर निवारण करितो | १८७ |
| १६५ साधु देह कसा ठेवतो ? ... ... ... | १८८ |
| १६६ ईश्वरास मिळाल्यावर पुनरावृत्ति नाहीं | १८८ |
| १६७ देवभक्तांची अभिन्नता ... ... ... | १८९ |
| १६८ जीवन्मुक्तावस्था | १९० |
| १६९ 'ते मरणा ऐलीकडे । मज मिळोनि गेले फुडें.' ... ... ... | १९० |
| १७० देवाशीं ऐक्यतेची साधनें. ... ... ... | १९२ |
| १७१ ऐक्यभक्ति ... | १९३ |
| १७२ अनन्यसाक्षात्कार. | १९४ |
| १७३ अद्वैतजागृति. ... | १९४ |
| १७४ स्वराज्यप्राप्तीचा आनंद. ... ... ... | १९५ |
| १७५ आत्मानुभवाचा पट्टाभिषेक. ... ... ... | १९७ |
| १७६ देवभक्तांचा आत्यंतिक संयोग. ... ... | १९७ |
| **५. उपसंहार** | |
| १७७ जेथें देवभक्तांचा संयोग आहे तेथें विजय ठेवलेलाच आहे. ... ... | १९९ |
| १७८ ईश्वराचें प्रसाददान. | २०१ |
| १७९ एकनाथसंशोधन. | २०२ |


---

## पुरवणी अनुक्रमणिका.


| विषय | पृष्ठ |
|---|---|
| १८० अमृतानुभवांतील वेचे. | १ |
| १८१ चांगदेवपासष्टींतील वेचे. | ९ |

भक्तालयांत गीतारत्नेश्वराची स्थापना.

म्हणौनि तपाचा धनुर्धरा। तळीं दाटोनि गाडोरा।
वरि गुरुभक्तीचा पुरा। प्रासाद जो जाहला॥
आणि श्रवणेच्छेचा पुढां। दारवंटा सदा उघडा।
वरि कलश चोखडा। अनिंदारत्नांचा॥
ऐशा भक्तालयीं चोखटीं। गीतारत्नेश्वर हा प्रतिष्ठी।
मग माझिया संवसाटीं। तुकसी जगीं॥"

ज्ञा. १८. १५०७–१५०९.

# ज्ञानेश्वरवचनामृत



## १ प्रास्ताविक

### १. ज्ञानेश्वरीरचनेचा स्थलकालनिर्देश.

ऐसें युगीं परि कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं ।
श्रीगोदावरीच्या कूळीं । दक्षिणिलीं ॥
त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोश क्षेत्र ।
जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥
तेथ यदुवंशविलास । जो सकळकळानिवास ।
न्यायातें पोषी क्षितीश । श्रीरामचंद्र ।
तेथ महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें ।
केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें ॥
एवं भारताच्या गांवीं । भीष्मनाम प्रसिद्ध पर्वीं ।
श्रीकृष्णार्जुनीं बरवी । गोठी जे केली ॥
जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर ।
परमहंसीं सरोवर । सेविजे जें ॥
तिये गीतेचा कलश । संपूर्ण हा अष्टादश ।
ह्मणे निवृत्तिदास । ज्ञानदेव ॥
पुढती पुढती पुढती । इया ग्रंथपुण्यसंपत्ती ।
सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होइजे ॥
शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें ।
सच्चिदानंदबावा आदरें । लेखकु जाहला ॥

ज्ञा. १८. १८०३--१८११.

---

१ दक्षिणभागाच्या तीरावर. २ आदिनाथांच्या परंपरेंतील.

## २. ज्ञानेश्वरांची गुरुपरंपरा.

ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव आहे जी साचें ।
ग्रंथ नोहे हें कृपेचें । वैभव तिये ॥
क्षीरसिंधुपरिसरीं । शक्तीच्या कर्णकुहरीं ।
नेणों कें श्रीत्रिपुरारीं । सांगितलें जें ॥
तें क्षीरकल्लोळा आंत । मकरोदरीं गुप्त ॥
होता तयाचा हात । पैठें[१] जालें ॥
तो मत्स्येंद्र सप्तश्रृंगीं । भग्नावयवा चौरंगीं ।
भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ॥
मग समाधी अव्यत्यया । भोगावी वासना या ।
ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली मीनीं[३] ॥
तेणें योगाब्जिनीसरोवर । विषयविध्वंसैकवीर ।
तिये पदीं कां सर्वेश्वर । अभिषेकिले ॥
मग तिहीं तें शांभव । अद्वयानंदवैभव ।
संपादिलें सप्रभव । श्रीगैनीनाथा ॥
तेणें कळिकळितभूतां । आला देखोनि निरुता ।
ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ॥
ना आदिगुरु शंकरा । लागोनि शिष्यपरंपरा ।
बोधाचा हा संसरा । जाला तो आमुतें ॥
तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितया जीवा ।
सर्व प्रकारीं धांवा । करीं पां वेगीं ॥
आधींच तंव तो कृपाळु । वरि गुरुआज्ञेचा बोलु ।
जाला जैसा वर्षाकाळु । खवळणें मेघां ॥
मग आर्ताचेनि वोरसें । गीतार्थग्रंथनमिसें ।
वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथ ॥

---

१ सन्निध. २ स्वाधीन ३ मत्स्येंद्रनाथांनी. ४ ओघ, विस्तार. ५ धांवून रक्षण करणें. ६ पान्हा.

तेथ पुढां मी बापियों । मांडला आर्ती आपुलिया ।
कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥

ज्ञा. १८. १७५१–१७६३.

---

## ३. ज्ञानेश्वरांचा आपल्या गुरूविषयीं आदर.

मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु ।
म्हणऊनि विशेष मनीं आदरु । विवेकावरी ॥
जैसें डोळेयां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे ।
मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी ॥
कां चिंतामणी आलिया हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं ।
तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेव म्हणे ॥
म्हणोनि जाणतेनि गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होइजे ।
जैसें मूळसिंचनें सहजे । शाखापल्लव संतोषती ॥
कां तीर्थें जियें त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनीं ।
नातरी अमृतरसस्वादनीं । रस सकळ ॥
तैसा पुढतपुढतीं तोचि । मियां अभिवंदिला श्रीगुरुचि ।
अभिलषित मनोरुचि । पुरविता तो ॥

ज्ञा. १. २२–२७.

---

## ४. सद्गुरुकृपेस काय अशक्य आहे ?

तें बुद्धीहीं आकळितां सांकडें । म्हणऊनि बोलीं विपायें सांपडे ।
परि श्रीनिवृत्तीकृपादीपउजियेडें । देखेन मी ॥
जें दिठीहीं न पविजे । तें दिठीवीण देखिजे ।

१ चातक. २ फांटे फुटणें, [illegible]

जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ॥
नातरी जें धातुवादियांहीं[1] न जोडे । तें लोहांचि[2] पंधरें[3] सांपडे ।
जरी दैवयोगें चढे । परिस हाता ॥
तैसी सद्गुरुकृपा होये । तरी करितां काय आपुलें[4] नोहे ।
म्हणऊनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेव म्हणे ॥

ज्ञा. ६. ३२–३५.

---

## ५. गुरुकृपेचें वर्णन करणें शक्य नाहीं.

हें असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्मकर माथां पारुखे ।
तो जीवचि परि तुके । महेशेंसी ॥
एवढें जियें महिमेचें करणें । तें वाचाबळें वानूं मी कवणें ।
कां सूर्याचिया आंगा उटणें । लागत असे ॥
केउता कल्पतरूवरी फुलौरा । कायसेनि पाहुणेर क्षीरसागरा ।
कवणें वासीं कापुरा । सुवास देवों ॥
चंदनातें कायसेनि चर्चावें । अमृतातें कउतें रांधावें ।
गगनावरी उभवावे । घडे केवीं ॥
तैसें श्रीगुरूचें महिमान । आकळितें कें असे साधन ।
हें जाणोनियां नमन । निवांत केलें ॥
जरी प्रज्ञेचेनि आथिलपणें । श्रीगुरुसामर्थ्या रूप करूं म्हणें ।
तरि तें मोतियां भिंगें[11] देणें । तैसें होईल ॥
कां साडेपंधरयां[12] रजतें[13]वणी । तैशीं स्तुतीचीं बोलणीं ।
उगयांचि माथा ठेविजे चरणीं । हेंचि भलें ॥

ज्ञा. १०. ९–१५.

---

१ किमया करणारे. २ लोखंडांत. ३ सोनें. ४ स्वाधीन. ५ चमकेल, प्रकाश करील. ६ स्पर्श करील. ७ उटी. ८ कोठून. ९ संपन्नता. १० वर्णन करणें. ११ चकाकीकरितां पुट देणें. १२ उत्तम सोनें. १३ रुप्याचें पाणी.

## ६. गुरुकृपेचें आवाहन.

जयजय वो शुद्धे । उदार प्रसिद्धे ।
अनवरत आनंदें । वर्षतिये ॥
विषयव्याळें मिठी । दिधलिया नुठी ताटी ।
न तुझीये कृपादृष्टी । निर्विष होय ॥
तरि कवणातें तापु पोळी । कैसेनि वो शोक जाळी ।
जरि प्रसादरसकल्लोळीं । पुरें येसी तूं ॥
योगसुखाचे सोहळे । सेवकां तुझेनि स्नेहाळे ।
सोहंसिद्धिलळे । पाळिसी तूं ॥
आधारशक्तीचिया अंकीं । वाढविसी कौतुकीं ।
हृदयाकाशपालखीं । परिये देसी निजें ॥
प्रत्यग्ज्योतीची वोवाळणी । करिसी मनपवनाचीं खेळणीं ।
आत्मसुखाचीं बाळलेणीं । लेवविसी ॥
सतराविये स्तन्य देसी । अनाहताचा हल्लर गासी ।
समाधिबोधें निजविसी । बुझाउनी ॥
म्हणोनि साधकां तूं माउली । पिके सारस्वत तुझिया पाउलीं ।
याकारणें मी साउली । न संडीं तुझी ॥...॥
श्रीकृष्णगुणीं मातें । सर्वत्र करीं वो सरतें ।
राणिव बैसवीं श्रोतयांतें । श्रवणाचिये ॥
ये मऱ्हाठियेचियां नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळ करीं ।
घेणें देणें सुखाचिवरि । हों देईं या जगा ॥
तूं आपुलेनि स्नेहपल्लवें । मातें पांघुरविशील सदैवें ।
तरि आतांचि हें आघवें । निर्मीन माय ॥
इये विनवणियेसाठीं । अवलोकिलें गुरुकृपादृष्टीं ।
म्हणे गीतार्थेसी उठीं । न बोलें बहु ॥

---

१ विस्मृति जात नाहीं. २ हट्ट. ३ मूलाधारचक्र. ४ झोके. ५ अमृतकला. ६ गाणें. ७ समजावून देणें ८ विद्या. ९ राज्यपद. १० पदर.

तेथ जी जी महाप्रसाद । म्हणोनि साविया जाहला आनंद ।
आतां निरोपीन प्रबंधं । अवधान दीजे ॥

ज्ञा. १२. १-१९.

---

## ७ गुरुकृपेचें महत्त्व.

जयांचें केलिया स्मरण । होय सकळ विद्यांचें अधिकरण ।
ते वंदूं श्रीचरण । श्रीगुरूचे ॥
जयांचेनि आठवें । शब्दसृष्टी आंगवे ।
सारस्वत आघवें । जिव्हेसि ये ॥
वक्तृत्व गोडपणें । अमृतातें पारुषें म्हणे ।
रस होती वोळगणे । अक्षरांसी ॥
भावांचें अवतरण । अवतरवी निजखूण ।
हातां चढे संपूर्ण । तत्त्वबोध ॥
श्रीगुरूचे पाय । जें हृदय गवसूनि ठाय ।
तें येवढें भाग्य होय । उन्मेषांसी ॥

ज्ञा. १३. १-५.

---

## ८. गुरूंचें अनिर्वर्णनीयत्व.

जयजय आचार्या । समस्तसुरवर्या ।
प्रज्ञाप्रभातसूर्या । सुखोदया ॥
तूं जयांप्रति लपसि । तयां विश्व हें दाविसी ।
प्रकट तैं करिसी । आघवेंचि तूं ॥

---

१ सहज. २ ग्रंथ ३ लक्ष. ४ स्वाधीन होते. ५ फिकें. ६ आश्रित. ७ अभिप्राय. ८ धरून, पोटाळून. ९ ज्ञान.

कीं पुढिलांची दृष्टी चोरिजे । हा दृष्टिबंधें[1] निफजे ।
परि नवल लाघव तुझें । जें आपणपें चोरे ॥...॥
वेद वानूनि तंवचि चांग । जंव न दिसे तुझें आंग ।
मग आम्हां तया मुंग[2] । एकें[3] पांती ॥...॥
कां उदयलियां भास्वत । चंद्र जैसा खद्योत ।
आम्हां श्रुति तुज आंत । तो पाड[4] असे ॥...॥
या लागीं आतां । स्तुति सांडूनि निवांता ।
चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें ॥
तरि तूं जैसा आहासि तैसिया । नमो जी गुरुराया ।
मज ग्रंथोद्यम फळावया । वेव्हारा होईं ॥

ज्ञा. १४. १-१६.

---

## ९. श्रीगुरुपादपूजन.

आतां हृदय हें आपुलें । चोफाळूनिया[6] भलें ।
वरी बैसऊं पाउलें । श्रीगुरूचीं ॥
ऐक्यभावाची अंजुळी । सर्वेंद्रियकुड्मळीं[7] ।
भरूनियां पुष्पांजुळी । अर्घ्य देवों ॥
अनन्योदकें धुवट । वासना जे तान्हेष्ट ।
ते लाविलेसें बोट । चंदनाचें ॥
प्रेमाचेनि भांगारें[8] । निर्वाळूनि नेपुरें ।
लेववूं सुकुमारें । पदें तियें ॥
घणावली[9] आवडी । अव्यभिचारें चोखडी ।
तियें घालूं जोडी । आंगुळियां ॥
आनंदामोद[10] बहुळ[11] । सात्विकाचें मुकुळ[12] ।

---

१ नजरबंदी. २ मौन. ३ अंकित. ४ योग्यता. ५ मानकार. ६ चौरंग करून. ७ कळ्या. ८ सोनें. ९ दृढ झालेली. १० सुवास. ११ पुष्कळ. १२ कमळ.

तें उमललें अष्टदळ । ठेऊं वरी ॥
तेथें अहं हा धूप जाळूं । नाहंतेजें वोवाळूं ।
सामरस्यें पोटाळूं । निरंतर ॥
माझी तनु आणि प्राण । इया दोन्ही पाउवां लेवनूं श्रीचरण ।
करूं भोग मोक्ष निंबलोण । पायां तयां ॥

ज्ञा. १५. १-८.

---

## १०. निवृत्तिनाथ म्हणजे चित्सूर्यच होय.

तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती । आतां नमोचि म्हणों पुढतपुढती ।
जे बाधका येइजतसे स्तुति । बोलाचिया ॥...॥
जो सर्वभेणिवां जाणिजे । मौनाचिया मिठिया बानिजे ।
कांहींच न होनि आणिजे । आपणपयां जो ॥...॥
तया तूंतें मी सेवकपणें । लेववीं बोलकेया स्तोत्राचें लेणें ।
हें उपसाहावें ही म्हणतां उणें । अद्वयानंदा ॥
पारि रंकें अमृताचा सागर । देखिलिया पडे उचिताचा विसर ।
मग करूं धांवे पाहुणेर । शाकांचा तया ॥
तेथ शाकही कीर बहुत म्हणावा । तयाचा हर्षवेगचि तो घ्यावा ।
उजळोनि दिव्यतेजा हातिवा । ते भक्तीचि पाहावी ॥
बाळा उचित जाणणें होये । तरि बाळपणचि कें आहे ।
परि साचचि येरी माये । म्हणोनि तोषे ॥
हां गा गांवरसें भरलें । पाणी पाठीं पाय देत आलें ।
तें गंगा काय म्हणितलें । परतें सर ॥...॥
जर्‍हीं ध्यानाचा डोळां पाहिलासी । वेदादि वाचे वानिलासी ।
जें उपसाहिलें तयासी । तें आम्हांही करीं ॥

---

१ पादुका. २ शद्बांच्या. ३ सहन करणें. ४ दरिद्री. ५ आदरातिथ्य. ६ भाजी ७ सूर्य. ८ काडवात. ९ खरोखर.

परि मी आजि तुझ्या गुणीं । लांचावलों अपराध न गणीं ।
भलतें करीं परी अर्धभ्रंणीं । नुठीं कदा ॥

ज्ञा. १६. १७-३०.

---

## ११. श्रीनिवृत्तींच्या कृपेचें महत्त्व.

तरि बहु बोलूं काई । आजि तें आन ठाईं ॥
मातेवांचूनि नाहीं । ज्ञानदेव म्हणे ॥
जे तान्हेनि मियां अपत्यें । आणि माझे गुरूसी एकुलतें ।
म्हणोनि कृपेसी एकहातें । जालें तिये ॥
पाहा पां भरोवरी आघवी । मेघ चातकासी रिचवी ।
मजलागीं गोसावीं । तैसें केलें ॥
म्हणोनि रिकामें तोंड । करूं गेलें वडबड ।
कीं गीता ऐसें गोड । आतुडलें ॥
होय अदृष्ट आपैतें । तैं वाळूचि रत्नें परते ।
उजूं आयुष्य तैं मारितें । लोभ करी ॥
आधणीं घातलिया हरळ । होती अमृताचे तांदुळ ।
जरी भुकेची राखे वेळ । श्रीजगन्नाथ ॥
तयापरी श्रीगुरु । करिती जैं अंगिकारु ।
तैं होऊनि ठाके संसारु । मोक्षमय आघवा ॥
पाहा पां काई श्रीनारायणें । तया पांडवांचें उणें ।
कीजेचि ना पुराणें । विश्ववंद्यें ॥
तैसें श्रीनिवृत्तिराजें । अज्ञानपण हें माझें ।
आणिलें वोजे । ज्ञानाचिये ॥
परि हें असो आतां । प्रेम रुळतसें बोलतां ।
कें गुरुगौरव वर्णितां । उन्मेषें असे ॥

---

१ सवकलों. २ अतृप्त. ३ एकुलतें एक. ४ सामुग्री. ५ ओतणे. ६ सांपडलें. ७ सरळ. ८ खडे. ९ योग्यता. १० गळणें. ११ बुद्धि.

आतां तेणेंचि पसायें । तुम्हां संतांचे मी पायें ।
बोळगेन अभिप्रायें । श्रीगीतेचेनी ॥

ज्ञा. १५. १८-२८.

---

## १२. ज्ञानेश्वरांची संतांपुढें नम्रता.

अहो पुंसा आपणचि पढविजे । मग पढे तरी माथा तुकिजे ।
कां करविलेनि चोजें न रिझे । बाळका माय ॥
तेवि मी जें जें बोलें । तें प्रभु तुमचेंचि शिकविलें ।
म्हणोनि अवधारिजो आपुलें । आपण देवा ॥
हें सारस्वताचें गोड । तुम्हींचि लाविलें जी झाड ।
तरी आतां अवधानामृतें वाड । सिंपोनि कीजे ॥
मग हें रसभावफुलीं फुलेल । नानार्थफळभारें फळा येईल ।
तुमचेनि धर्में होईल । सुरवाड जगा ॥
या बोला संत रिझले । म्हणती तोषलों गा भलें केलें ॥
आतां सांगे जें बोलिलें । अर्जुनें तेथें ॥
तंव निवृत्तिदास म्हणे । जी कृष्णार्जुनाचें बोलणें ।
मी प्राकृत काय सांगों जाणें । परि सांगवा तुम्ही ॥
अहो रानींचिया पालेखाइरां । नेवाणें करविलें लंकेश्वरा ।
एकला अर्जुन परी अक्षौहिणी अकरा । न जिणेचि काई ॥
म्हणोनि समर्थ जें जें करी । तें न हों न ये चराचरीं ।
तुम्हीं संत तयापरी । बोलवा मातें ॥

ज्ञा. ११. १७-२४.

---

१ प्रसाद. २ सेवीन. ३ पोपट. ४ डोलवणें. ५ कौतुक. ६ संतुष्ट होणें. ७ मोठें. ८ सुख. ९ नाश.

## १३. ज्ञानेश्वरांची स्वाभिमानपूर्ण नम्रता.

म्हणोनि श्रीव्यासाचा हा थोर । विश्वासि जाला उपकार ।
जे श्रीकृष्णउक्ति आकार । ग्रंथाचा केला ॥
आणि तोचि हा मी आतां । श्रीव्यासाचीं पदें पाहातां ।
आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥
व्यासादिकांचे उन्मेख[1] । राहाटती जेथ साशंक ।
तेथ मीही रंक येक । वाचाळी[2] करीं ॥
परि गीताईश्वर भोळा । ले[3] व्यासोक्तिकुसुममाळा ।
तरि माझिया दूर्वादळा । ना न म्हणे कीं ॥
आणि क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येती गजघंटा[4] ।
तेथ काय मुरकुटा । वारिजत असे ॥
पांखफुटें[5] पाखिरूं । नुडे तरी नभींच स्थिरू ।
गगन आक्रमी सत्वरू । तो गरुडही तेथ ॥
राजहंसाचें चालणें । भूतळीं जालिया शहाणें ।
आणिकें काय कोणें । चालावेंचि ना ॥
जी आपुलेनि अवकाशें । अगाध जळ घेपे कलशें ।
चुळीं चूळपणा ऐसें । भरूनि न निघे ॥
दिवटीच्या आंगीं थोरी । तरि ते बहु तेज धरी ।
वाती आपुलिया परि । आणीच कीं ना ॥
जी समुद्राचेनि पैसें[6] । समुद्रीं आकाश आभासे ।
थिलुंरीं[7] थिल्लराऐसें । बिंबेचि पैं ॥
तेविं व्यासादिक महामती । वावरों[8] येती इये ग्रंथीं ।
मा आह्मीं ठाकों[9] हे युक्ति । न मिळे कीर ॥
जिये सागरीं जळचरें । संचरती मंदराकारें[10] ।

---

१ ज्ञान. २ बडबड. ३ धारण करतो. ४ गजसमुदाय. ५ पंख फुटतात न फुटतात असें. ६ विस्तार. ७ डबकें. ८ राहाटणें. ९ स्तब्ध बसणें. १० मंदार पर्वताच्या आकाराचीं.

तेथ देखोनि शफरें[1] येरें । पोहों[2] न लाहती ॥
अरुण आंगाजवळिके । म्हणोनि सूर्यातें देखे ।
मा भूतळींचि न देखे । मुंगी काई ॥
या लागीं आम्हां प्राकृतां । देशिकारें बंधें गीता ।
म्हणणें हें अनुचितां[3] । कारण नाहे ॥
आणि वाप पुढां जाये । ते घेत पाउलाची सोये[4] ।
बाळ ये तरी न लोहे[5] । पावों काई ॥
तैसा व्यासाचा मागोवा[6] घेत । भाष्यकारांतें वाट पुसत ।
अयोग्यही मी न पवत[7] । कें जाईन ॥
आणि पृथ्वी जयाचिया क्षमा । नुवगे[7] स्थावरजंगमा ।
जयाचेनि अमृतें चंद्रमा । निववी जग ॥
जयाचें आंगिक असिकें[8] । तेज लाहोनि अर्के ।
अंधाराचें सावाइकें[9] । लोटिजत आहे ॥
समुद्रा जयाचें तोय । तोया जयाचें माधुर्य ।
माधुर्या सौंदर्य । जयाचेनि ॥
पवना जयाचें वळ । आकाश जेणें पघळें[10] ।
ज्ञान जेणें उज्ज्वळ । चक्रवर्ती ॥
वेद जेणें सुभास । सुख जेणें सोल्लास ।
हें असो रूपस । विश्व जेणें ॥
तो सर्वोपकारी समर्थ । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथ ।
राहाटत असे मजही आंत । रिघोनियां ॥
आतां आयती गीता जगीं । मी सांगे मऱ्हाठिया [11]भंगीं ।
येथ कें विस्मयालागीं । ठाव आहे ॥
श्रीगुरूचेनि नांवें माती । डोंगरीं जयापासीं होती ।
तेणें कोळियें त्रिजगतीं । येकवंद[12] केली ॥

---

१ लहान मासे. २ मग. ३ अयोग्य. ४ मार्ग. ५ लाभणें. ६ पत्ता, मार्ग. ७ कंटाळत नाहीं. ८ समग्र. ९ साहाय्यक. १० विस्तृत. ११ रीत १२ एकवट.

चंदनें वेधलीं झाडें । जालीं चंदनाचेनि पाडें ।
वसिष्ठें मांडली कीं भांडें । भानुसीं शांटी ॥
मा मी तंव चित्तौथिला । आणि श्रीगुरु ऐसा दाटुला ।
जो दिठीवेनि आपुला । वैसवी पदीं ॥
आधींचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी ।
तें न दिसे ऐसी गोठी । केंही आहे ॥
म्हणोनि माझें नित्य नवें । श्वासोछ्वासही प्रबंध हों आवें ।
श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेव म्हणे ॥

ज्ञा. १८. १७०८-३५.

---

# २. तत्वज्ञान.

## १४. आत्मा द्रष्टा व प्रकृति कर्त्री.

अगा नगर हें रायें केलें । या म्हणण्या साचपण कीर आलें ।
परि निरुतें पाहतां काय सिणलें । रायाचे हात ॥...॥
जैसी रायें अधिष्ठिली प्रजा । व्यापारे आपुलालिया काजा ।
तैसा प्रकृतिसंग माझा । येर करणें तें इयेचें ॥
पाहें पां पूर्णचंद्राचिये भेटी । समुद्रीं अपार भरतें दाटी ।
तेथ चंद्रासि काय किरीटी । उपखा पडे ॥
जड परि जवळिका । लोह चळे तरि चळो कां ।
तरि कवण शीण भ्रामका । सन्निधानाचा ॥
किंबहुना यापरी । मी निजप्रकृति अंगिकारी ।
आणि भूतसृष्टि एकसरी । प्रसवोंचि लागे॥...॥

---

१ छाटी २ चित्तयुक्त. ३ समर्थ. ४ पाहणारी. ५ ग्रंथ. ६ खरेपणा. ७ खरोखर. ८ खरोखर. ९ श्रम. १० लोहचुंबक.

जैसा दीप ठेविला परिवरीं[1] । कवणातें नियमी ना निवारी ।
आणि कवण कवणिये व्यापारीं । राहाटे तेंहि नेणे ॥
तो जैसा कां साक्षिभूतु । गृहव्यापारप्रवृत्तिहेतु ।
तैसा भूतकर्मीं अनासक्तु । मी भूतीं असे ॥

ज्ञा. ९. ११०-१२९.

---

## १५. प्रकृतिपुरुषसंबंध.

आतां असंगा साक्षिभूता । देहीं चैतन्याची जे सत्ता ।
तिये नाम पांडुसुता । चेतना येथ ॥
जे नखौनि केशवरी । उभी जागे शरीरीं ।
जे तिहीं अवस्थांतरीं । पालटेना ॥
मनबुद्ध्यादि आघवीं । जियेचेनि टवटवीं ।
प्रकृति वनमाधवी । सदाचि जे ॥
जडाजडीं अंशीं । राहाटे जे सरिसी[2] ।
ते चेतना गा तुजसी । लटिके नाहीं ॥
पैं रावो परिवार[3] नेणे । आज्ञाचि परचक्र जिणे ।
कां चंद्राचेनि पूर्णपणें । सिंधु भरती ॥
ना ना भ्रामकाचें सान्निधान । लोहा करी सचेतन ।
कां सूर्यसंग जन । चेष्टवी गा ॥
अगा मुखमेळेंविण । पिलियाचें पोषण ।
करी निरीक्षण । कूर्मी[4] जेवीं ॥
पार्था तयापरी । आत्मसंगती इये शरीरीं ।
सजीवत्वाचा करी । उपयोग जडा ॥

ज्ञा. १३. १३४--१४१.

---

१ घरांत. २ सारखी. ३ लवाजमा. ४ कासवी.

## १६. प्रकृतिपुरुषविवेक.

जया मार्गातें जगीं । सांख्य म्हणती योगी ।
जयाचिये भाटिवे[1]लागीं । मी कपिल जाहालों ॥
तो आईक निर्दोख । प्रकृतिपुरुषविवेक ।
म्हणे आदिपुरुख । अर्जुनातें ॥
तरी पुरुष अनादि आथी । आणि तोंचि[2] लागोनि प्रकृति ।
सवें[3] सरिसी[4] दिवोराती । जयापरी ॥...॥
तैसीं जाण जवळें[5] । दोन्ही इयें एकवटें ।
प्रकृतिपुरुषें प्रकटें । अनादिसिद्धें ॥...॥
तरी केवळ जे सत्ता । तो पुरुष गा पंडुसुता ।
प्रकृती तें समस्तां । क्रियां नाम ॥...॥
ऐसेनि संतासंतें । कर्म प्रकृतिस्तव होतें ।
तयापासोनि निर्वाळते । सुखदुःख गा ॥
असतीं दुःख उपजे । सत्कर्मी सुख निपजे ।
तया दोहींचा बोलिजे । भोग पुरुषा ॥...॥
प्रकृतिपुरुषांची कुळवाडी[7] । सांगतां असंगडी[8] ।
जे आंबुली[9] जोडी । आंबुला[10] खाय ॥
आंबुलिया आंबुलिये । संगती ना सोये[11] ।
कीं आंबुली जग विये । चोज[12] ऐका ॥
जे अनंग[13] तो पेंधा[14] । निकेवडा[15] नुसधा[16] ।
जीर्ण अतिवृद्धा-। पासूनि वृद्ध ॥
तया आडनांव पुरुष । येऱ्हवीं स्त्री ना नपुंसक ।
किंबहुना एक । निश्चयो नाहीं ॥
तो अचक्षु अश्रवण । अहस्त अचरण ।

---

१ वर्णनासाठीं २ तेव्हांपासून. ३ बरोबर. ४ सारखी. ५ जुळी ६ उत्पन्न होतें. ७ व्यापार, शेतकी. ८ अघटित. ९ स्त्री. १० पति. ११ संबंध. १२ नवल. १३ निराकार. १४ पांगळा. १५ दरिद्री. १६ एकटा.

रूप ना वर्ण । नाम आथी ॥...॥
हे प्रतिक्षणीं नित्य नवी । रूपागुणांचीच आघवी ।
जडातेंही माजवी । इयेचा माज ॥...॥
कायि मन हें नपुंसक । कीं तें भोगवी तिन्ही लोक ।
ऐसें ऐसें अलौकिक । करणें इयेचें ॥...॥
कळा येथुनि जालिया । विद्या इयेच्या कलिया ।
इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ॥
हे नादांची टांकसाळ । हें चमत्काराचें वेळाउळ ।
किंबहुना सकळ । खेळ इयेचा ॥
जे उत्पत्ति प्रलय होत । ते इयेचे सायंप्रात ।
हे असो अद्भुत । मोहन हे ॥...॥
तया स्वयंभाची संभूती । तया अमूर्ताची मूर्ति ।
आपण होय स्थिती । ठावो तया ॥...॥
तया निर्गुणाचे गुण । तया अचरणाचे चरण ।
तया अश्रवणाचे श्रवण । अचक्षूचे चक्षु ॥
ऐसेनि इया प्रकृति । आपुलिया सर्वव्याप्ति ।
तया अविकारातें विकृति- । माजीं कीजे ॥
तेथ पुरुषत्व जें असे । तें इये प्रकृतिदशे ।
चंद्रमा अंवसे । हरपला जेंवी ॥...॥
जेंवी पय पशूच्या पोटीं । कां वह्नि जैसा काष्ठीं ।
गुंडूनि घेतला पटीं । रत्नदीप ॥
राजा पराधीन जाहला । कां सिंह रोगें रुंधला ।
तैसा पुरुष प्रकृति आला । स्वतेजा मुके ॥
जागता नर सहसा । निद्रा पाडूनि जैसा ।
स्वप्नींचिया सोसा । वश्य कीजे ॥...॥

---

१ प्रकृति. २ शब्द. ३ घर. ४ उत्पत्ति. ५ विकारवश ६ गुंडाळून
७ व्यापला. ८ खटपट.

दर्पणाचिया जवळिका । दुजेपण जैसें ये मुखा ।
कां कुंकुमें स्फटिका । लोहितत्व[1] ये ॥
तैसा गुणसंगमें । अजन्मा हा जन्में ।
पावत ऐसा गमे । येऱ्हवीं नाहीं ॥...॥
हा प्रकृतीमाजी उभा । परि जुंई[2] जैसा वाथंबा[3] ।
इया प्रकृति पृथ्वी नभा । तेतुला पाड[4] ।
प्रकृतिसरितेच्या तटीं । मेरु होय किरीटी ।
माजि बिंबे परी लोटीं[5] । लोटों[6] नेणे ॥
प्रकृति होय जाये । हा तो असताचि आहे ।
म्हणोनि आब्रह्माचें होये । शासन हा ॥...॥
हा महद्ब्रह्म गोसावी । ब्रह्मगोलकलाधवी ।
अपारपणें मवी[7] । प्रपंचातें ॥
पैं या देहामाझारीं । परमात्मा ऐसी जे परी ।
बोलिजे ते अवधारीं । ययातेंची ॥...॥
जो निखळपणें[8] येणें । पुरुषा यया जाण ।
आणि गुणांचें करणें । प्रकृतीचें तें ॥
हें रूप हे छाया । पैल जळ हे माया[9] ।
ऐसा निवाड धनंजया । जेविं कीजे ॥
तेणें पाडें अर्जुना । प्रकृतिपुरुषविवेचना ।
जयाचिया मना । गोचर[10] जाहाली ॥
तो शरीराचेनि मेळें[11] । करूं कां कर्में सकळें ।
परि आकाश धुंई[12] न मैळे । तैसा असे ॥
आंथिलेनि[13] देहें । जो न घेपे[14] देहमोहें ।
देह गेलिया नोहे । पुनरपि तो ॥
ऐसा तया एक । प्रकृतिपुरुषविवेक ।

---

१ तांबडेपणा  २ जुईचा वेल.  ३ आश्रय, टेका.  ४ योग्यता.
५ प्रवाहानें. ६ लोटला जात नाही. ७ मोजतो. ८ केवळाणानें, शुद्धपणानें.
९ आभास, मृगजळ.  १० अवगत.  ११ संयोगानें.  १२ धुरळयानें.
१३ असलेल्या.  १४ घेतला जात नाहीं.

उपकार अलौकिक । करी पैं गा ॥
पारे हाचि अंतरीं । विवेक भानूचिया परी ।
उदेजे तें अवधारी । उपाय बहुत ॥

ज्ञा. १३. ९५८–१०३६.

---

## १७. प्रकृति व पुरुष.

ये-हवीं तरी महद्ब्रह्म । यालागीं हें ऐसें नाम ।
जे महदादि विश्राम-। शाळिका हे ॥...॥
अव्यक्तवादमतीं । अव्यक्त ऐसी वदंती ।
सांख्याचिया प्रतीतीं । प्रकृति हेचि ॥
वेदांतीं इयेतें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञराया ।
असो किती बोलों वायां । अज्ञान हें ॥
आपला आपणपयां । विसरू जो धनंजया ॥
तेंचि रूप इया । अज्ञानासी ॥...॥
तरी माझी हे गृहिणी । अनादि तरुणी ।
अनिर्वाच्य गुणी । अविद्या हे ॥
इये नाहीं हेंचि रूप । ठाणें हें अति उमप ।
हे निद्रितां समीप । चेतां दुरी ॥
पैं माझेनिची आंगें । पहुडल्या हे जागे ।
आणि सत्तासंभोगें । गुर्विणी होय ॥...॥
ऐसें लेंकरूं एक । प्रसवली हे देख ।
जयाचे तिन्ही लोक । बाळसें गा ॥
चौऱ्यांशीं लक्ष योनी । तिये कांडां पेरां सांदणी ।
वाढे प्रतिदिनीं । बाळक हें ॥
नाना देह अवयवीं । नामाचीं लेणीं लेववी ।

---

१ स्थान. २ नांव, बोलणें. ३ अनुभव. ४ आकृति. ५ अमूप. ६ जागे असलेल्याला. ७ निजल्यावर. ८ गर्भार. ९ कांड्याचे. १० पेऱ्याचे. ११ सांधे. १२ अलंकार.

मोहस्तन्यें वाढवी । नित्य नवें ॥...॥
हें येकोलतें चराचर । अविचारित सुंदर ।
प्रसवोनि थोर । थोरावली ॥
पैं ब्रह्मा प्रातःकाळ । विष्णु तो माध्यान्हवेळ ।
सदाशिव सायंकाळ । बाळा यया ॥
महाप्रलय सेजे । खेळोनि निवांत निजे ।
विषमज्ञानें उमजे । कल्पोदयीं ॥...॥
आतां असो हे बहु बोली । ऐसें विश्व माया व्याली ।
तेथ साह्य जाली । माझी सत्ता ॥
याकारणें मी पिता । महद्ब्रह्म हे माता ।
अपत्य पंडुसुता । जगडंबर ॥

ज्ञा. १४. ९८–११७.

---

## १८. क्षर, अक्षर, व उत्तम पुरुष.

मग तो म्हणे गा सव्यसाची । पैं इये संसारपाटणींची ।
वस्ती सावियां टांची । दुपुरुषी ॥
जैसी आघवांचि गगनीं । नांदत दिवोरात्रि दोन्हीं ।
तैसें संसारराजधानी । दोन्हीचि हे ॥
आणिकही तिजा पुरुष आहे । परी तो या दोहींचें नांव न साहे ।
जो उदेला गांवेसीं खाये । दोहींतें यया ॥
परि ते तंव गोठी असो । आधीं दोन्हींचि हे परियेसों ।
जे संसारग्रामा वसों । आले असती ॥
एक आंधळा वेडा पंगु । येर सर्वांगें पुरता चांगु ।
परि ग्रामगुणें संगु । घडला दोघां ॥
तया एका नाम क्षर । एकातें म्हणती अक्षर ।

---

१ एकटें. २ शय्या. ३ जागें होतें. ४ अर्जुन. ५ शहर. ६ सहजच. ७ थोडकी, लहान.

इहीं दोहींचि परि संसार । कोंदला असे ॥
आतां क्षर तो कवण । अक्षर तो किलक्षण ।
हे अभिप्राय संपूर्ण । विवंचूं गा ॥

ज्ञा १५. ४७१–४७७.

---

## १९. क्षरविचार.

तरि महदहंकारा–। लागुनिया धनुर्धरा ।
तृणांतींचा पांगोरा–। वेरी पैं गा ॥
जें कांहीं साने थोर । चालतें अथवा स्थिर ।
किंबहुना गोचर । मनबुद्धीसि जें ॥
जेतुलें पांचभौतिक घडतें । जें नामरूपा सांपडलें ।
गुणत्रयाच्या पडतें । कोमठां जें ॥
भूताकृतीचें नाणें । घडत भांगारें जेणें ।
काळासि जूं खेळणें । जिहीं कवडां ॥
जाणणेंनिचि विपरीतें । जें जें कांहीं जाणिजतें ।
जें प्रतिक्षणीं निर्मतें । होऊनियां ॥
अगा काढूनि भ्रांतीचें दांगं । उभवी सृष्टीचें आंग ।
हें असो बहु जग । जया नाम ॥
पैं अष्टधा भिन्न ऐसें । जें दाविलें प्रकृतिमिसें ।
जें क्षेत्रद्वारा छत्तीसें । भागीं केलें ॥
हें मागील सांगो किती । अगा आतांचि जें प्रस्तुती ।
वृक्षाकाररूपकरीतीं । निरूपिलें ॥
तें आघवेंचि साकार । कल्पुनी आपणपयां पुर ।
जालें असे तदनुसार । चैतन्यचि ॥
जैसा कुहां आपणचि बिंबे । सिंह प्रतिबिंब पाहतां क्षोभे ।

---

१ पासून. २ अग्रापर्यंत. ३ लहान. ४ उत्पन्न होतें. ५ टांकसाळ. ६ सोनें. ७ जुगार. ८ मरतें. ९ अरण्य. १० विहीरींत.

मग क्षोभला समारंभें । घोली तेथ ॥...॥
अर्जुना गा यापरी । साकार कल्पूनि पुरी ।
आत्मा विस्मृतीची करी । निद्रा तेथ ॥...॥
हा जनक हे माता । हा मी गौर हीन पुरता ।
पुत्र वित्त कांता । माझें हे ना ॥
ऐसिया वळघोनि स्वप्ना । धांवत भवेंस्वर्गांचिया राना ।
तया चैतन्या नाम अर्जुना । क्षर पुरुष गा ॥
आतां एक क्षेत्रज्ञ येणें । नामें जयातें बोलणें ।
मग जीवु कां म्हणे । जिये दशेतें ॥
जो आपुलेनि बिसरें । सर्वभूतत्वें अनुकरे ।
तो आत्मा बोलिजे क्षरें । पुरुष नामें ॥...॥
आणि क्षरपणाचा नाथिला । आळ यया ऐसेनि आला ।
जे उपाधीचि आतला । म्हणोनियां ॥
जैसी खळाळीचिया उदका-। सरसीं उदाळे चंद्रिका ।
तैसा विकारां औपाधिकां । ऐसाचि गमे ॥...॥
ऐसें उपाधीचेचि पाडें । क्षणिकत्व यानें जोडे ।
तेणें खोकरपणें घडे । क्षर हें नाम ॥
एवं जीवचैतन्य आघवें । हें क्षर पुरुष जाणावें ।
आतां रूप करूं बरवें । अक्षरासी ॥

ज्ञा. १५. ४७८–५०१.

---

## २० अक्षरविचार.

तरी अक्षर जो दुसरा । पुरुष पैं धनुर्धरा ।
तो मध्यस्थ गा गिरिवरां । मेरू जैसा ॥...॥

---

१ उडी घालतो. २ आश्रय करून. ३ संसार. ४ शिरतो, संचार करतो. ५ खोटा. ६ आरोप. ७ स्वाधीन झाला. ८ हालणारा ओढा. ९ हालते. १० भासतो. ११ नश्वरत्वानें.

पैं आटोनि गेलिया सागर । मग तरंग ना नीर ।
तया ऐशी अनाकार । जे दशा गा ॥...॥
विश्व आघवेंचि मावळे । आणि आत्मबोध तरी नुजेळे ।
तिये अज्ञान दशे केवळे । अक्षर नाम ॥
सर्वां कळीं सांडिलें जैसें । चंद्रपण उरे अंवसे ।
रूप जाणावें तैसें । अक्षराचें ॥...॥
घन अज्ञान सुषुप्ति । तो बीजभाव म्हणती ।
येर स्वप्न हन जागृति । फळभाव तो ॥
जयासी कां बीजभाव । वेदांतीं केला ऐसा आवं ।
तो तया पुरुषा ठाव । अक्षराचा ॥...॥
येर क्षर पुरुष कां जनीं । देहीं खेळे जागृतीं स्वप्नीं ।
तिया अवस्था जो दोन्ही । वियाला गा ॥
पैं अज्ञान घन सुषुप्ति । ऐसैसी जे कां ख्याती ।
या उणी येकी प्राप्ती । ब्रह्माची जे ॥ ..॥
हें असो अधःशाखा । या संसाररूपा रुखा ।
मूळ तें पुरुखा । अक्षराचें ॥
म्हणोनि यया आपैसें । क्षरणें पां नसे ।
आणिकेंही हा न नाशे । ज्ञानाउणें ॥
या लागीं हा अक्षर । ऐसा वेदांतीं डगर ।
केला देशीं थोर । सिद्धांताचा ॥

ज्ञा. १५. ५०२–५३४.

---

## २१ उत्तमपुरुष.

आतां अन्यथाज्ञानीं । या दोनी अवस्था जया जनीं ।
तया हरपती घनीं । अज्ञानत्वीं ॥

---

१ प्रकाशत नाही. २ डौल. ३ ज्ञानाशिवाय. ४ प्रसिद्धि. ५ विपरीत ज्ञान. ६ नाहींशा होतात.

तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया। ज्ञानें कीर्तिमुखत्वें केलिया।
जैसा वह्नी काष्ठ जाळूनियां। स्वयें जळे॥
तैसें अज्ञान ज्ञानें नेलें। आपणही वस्तु देऊनि गेलें।
ऐसें जाणणेंनिवीण उरलें। जाणतें जें॥
तें तो गा उत्तम पुरुष। जो तृतीय कां निष्कर्ष[2]।
दोहींहून आणिक। मागिला जो॥
सुषुप्ति आणि स्वप्ना-। पासूनि बहुवें अर्जुना।
जागणें जैसें आना[3]। बोधाचेंची॥...॥
पैं ग्रासूनि आपली मर्यादा। एक करीत नदीनदां।
उठी कल्पांतीं उदावादा[4]। एकार्णवाचा॥
तैसें स्वप्न ना सुषुप्ति। ना जागराची गोठी आथी।
जैसी गिळली दिवोराती। प्रळयतेजें॥
मग एकपण ना दुजें। असे नाहीं हें नेणिजे।
अनुभव निबुजे[5]। बुडाला जेणें॥
ऐसें आथि जें कांहीं। तें तो उत्तम पुरुष पाहीं।
जें परमात्मा इहीं। बोलिजे नामीं॥

ज्ञा. १५. ५२६-५३२.

अर्जुना ऐसिया परी। परमात्मा शब्दवरी।
सूचिजे गा अवधारी। पुरुषोत्तम॥
येऱ्हवीं न बोलणेंनि बोलणें। जेथिचें सर्व नेणिवा जाणणें।
कांहींच न होनि होणें। जे वस्तु गा॥...॥
कां घ्राणा[6] फुला दोहीं। द्रुती[7] असे माझारिला ठायीं।
तें न दिसे तरी नाहीं। ऐसें बोलों नये।
तैसें द्रष्टा दृश्य हें जाये। मग कोण म्हणे काय आहे।
हेंचि अनुभवें तेंचि पाहे। रूप तया॥
जो प्रकाश्येंवीण प्रकाश। जो ईशितव्येंवीण ईश।

१ आपलाच नाश केल्यावर. २ निष्पत्ति, शेवट. ३ भिन्न. ४ पूर. ५ गोंधळतो, घाबरतो ६ नाक. ७ सुवास.

आपणेंनीचि अवकाश । वसवीत असे जो ॥
जो नादें ऐकिजता नाद । स्वादें चाखिजता स्वाद ।
जो भोगिजतसे आनंद । आनंदेंचि ॥
जो पूर्णतेचा परिणाम । पुरुष गा सर्वोत्तम ।
विश्रांतीचाही विश्राम । विराला जेथें ॥
सुखासी सुख जोडलें । जें तेज तेजासि सांपडलें ।
शून्यही बुडालें । महाशून्यीं जिये ॥...॥
पैं नेणतयाप्रती । रुपेंपणाची प्रतीती ।
रुपें न होनि शुक्ति । दावी जेवीं ॥
कां नाना अलंकारदशे । सोनें न लपत लपालें असे ।
विश्व न होनियां तैसें । विश्व जो धरी ॥
हें असो जलतरंगा । नाहीं सिनानपण जेवि गा ।
तेविं सत्ता प्रकाश जगा । आपणचि जो ॥...॥
तैसा विश्वपणें कांहीं होये । ना विश्वलोपीं कैंही जाये ।
जैसा रात्रि दिवसें नोहे । द्विधा रवी ॥
तैसा कांहींचि कोणीकडे । कायिसेनिहि वेंचीं न पडे ।
जयाचें सांगडें । जयासीची ॥

ज्ञा. १५. ५४०–५५६.

---

## २२ क्षेत्रविचार.

रथांगांचा मेळावा । जेविं रथ म्हणिजे पांडवा ।
कां अधोर्ध्व अवेवां । नाम देह ॥
कां चतुरंगसमाजे । सेना नाम निपजे ।
कां वाक्यें म्हणिपती पुंजे । अक्षरांचे ॥...॥
कां स्नेह सूत्र वह्नी । मेळ एकिये स्थानीं ।

१ कोठें. २ नाश. ३ तुलना, सारखेंपणा. ४ रथाचे अवयव. ५ समुदाय.
६ तेल. ७ वात.

धरिजे तो जनीं । दीप होय ॥
तैसीं छत्तीसही इयें तत्वें । मिळती जेणें एकत्वें ।
तेणें समूहपरत्वें । क्षेत्र म्हणिजे ॥
आणि वाहतेनि[1] भौतिकें[2] । पापपुण्य येथ पिके ।
म्हणोनि आम्हीं कौतुकें । क्षेत्र म्हणों ॥

ज्ञा. १३. १५१-१५६

---

## २३ अनित्य देह, नित्य आत्मा.

तरि परमात्मा म्हणिपे । तो ऐसा जाण स्वरूपें ।
जळीं जळें न लिंपे । सूर्य जैसा ॥...॥
आरिसां मुख जैसें । बिंबलिया नांव असे ।
देहीं वसणें तैसें । आत्मतत्वा ॥
तया देहा म्हणती भेटी[3] । हे सर्पायी[4] निर्जीव[5] गोठी ।
वारिया वाळुव गांठी । कैंही आहे ॥...॥
एक निघे पूर्वेकडे । एक तें पश्चिमेकडे ।
तिये भेटीचेनि पाडें । संबंध हा ॥...॥
देह तंव पांचांचें जाळें[6] । हें कर्माचें गुणीं[7] गुंथलें ।
भंवर्नसे[8] चाकीं सूदलें[9] । जन्ममृत्यूंच्या ॥
हे काळानळाच्या कुंडीं । घातली लोणियाची उंडी[10] ।
माशी पांख पाखंडी[11] । तंव हे सरे[12] ॥
हें विपायें[13] आगींत पडे । तरि भस्म होऊनि उडे ।
जाहालें श्वाना वरपडें[14] । तरि ते विष्ठा ॥
या चुके दोहीं काजीं[15] । तरी होय कृमींचा पुंजा ।
हा परिणाम कपिध्वजा । कश्मळ[16] गा ॥

---

१ राबणाऱ्या. २ शरीरानें. ३ संबंध. ४ सर्वथैव. ५ व्यर्थ. ६ बनल. ७ दोऱ्यांत. ८ फिरणें. ९ चढवलेले. १० गोळा. ११ हलवते. १२ नाहींसें होतें. १३ कदाचित्. १४ प्राप्त, स्वाधीन. १५ प्रकार, कार्य. १६ वाईट.

या देहाची हे दशा । आणि आत्मा तो ऐसा ।
पैं शुद्ध नित्य अपैसा । अनादिपणें ॥
सकळ ना निष्कळ । अक्रिय ना क्रियाशीळ ।
कृश ना स्थूळ । निर्गुणपणें ॥
साभास ना निराभास । प्रकाश ना अप्रकाश ।
अल्प ना बहुवस । अरूपपणें ॥
रिता ना भरित । रहित ना सहित ।
मूर्त ना अमूर्त । शून्यपणें ॥
आनंद ना निरानंद । एक ना विविध ।
मुक्त ना बद्ध । आत्मपणें ॥
येतुला ना तेतुला । आइता ना रचिला ।
बोलता ना उगला । अलक्षपणें ॥
सृष्टीचा होणा न रचे । सर्वसंहारें न वेंचे
आथी नाथी या दोहींचें । पंचत्व हा ॥...॥
तैसे तयाचिये अनुस्यूती । होती जाती देहाकृती ।
तो घे ना सांडी सुमती । जैसा तैसा ॥
अहोरात्रें जैसीं । येती जाती आकाशीं ।
आत्मसत्ते तैसीं । देहें जाण ॥...॥
संसर्गें चेष्टिजे लोहें । परी लोह भ्रामक नोहे ।
क्षेत्र क्षेत्रज्ञा आहे । तेतुला पाड ॥

ज्ञा. १३. १०९५–११२४.

---

## २४. सत्वरजतमवृत्तींचा मृत्यूवर परिणाम.

पैं रजतमविजयें । सत्व गा देहीं इये ।
वाढतां चिन्हें तियें । ऐसीं होतीं ।
जे प्रज्ञा आंतुलीकडे । न समाती बाहेरीं वोसंडे ।

---

१ सहज. २ नाश होणें. ३ मरण. ४ अखंडपणामुळें. ५ मावल्यामुळें. ६ सांडते.

वसंतीं पद्मखंडें । द्रुति जैसी ॥
सर्वेंद्रियांच्या आंगणीं । विवेक करी राबणी ।
साचचि करचरणीं । होती डोळे ॥
राजहंसापुढें । चांचूचें आगरडें ।
तोडी जैवि झगडे । क्षीरनीराचे ॥
तैंवि दोषादोषविवेकीं । इंद्रियेंचि होती पारखीं ।
नियम बा रे पाइकी । वोळगे तें ॥
नायिकणें तें कानचि वाळी । न पाहणें तें दिठीचि गाळी ।
अवाच्य तें टाळी । जीभचि गा ॥
वातीपुढां जैसे । पळों लागे काळवसें ।
निषिद्ध इंद्रियां तैसें । समोर नोहे ॥
धाराधरकाळें । महानदी उचंबळे ।
तैसी बुद्धि पघळे । शास्त्रजातीं ॥
अगा पुनवेच्या दिवशीं । चंद्रप्रभा धांवे आकाशीं ।
ज्ञानीं वृत्ति तैसी । फांके सैंघ ॥
वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे ।
मानस विटे । विषयांवरी ॥

ज्ञा. १४. २०५--२१४.

एवं सत्व वाढे । तें हें चिन्ह फुडें ।
आणि निधनही घडे । तेव्हांचि जरी ॥
कां पाहालेनि सुयाणें । जालया परिगुणें ।
पाढियंते पाहुणे । स्वर्गौनि ये ॥
तरि जैसीचि घरींची संपत्ति । आणि तैसीच औदार्यधैर्यवृत्ति ।
मा परत्रा आणि कीर्ति । कां नोहावें ॥ ..॥

१ कमलांत. २ पहारा, चाकरी. ३ खरोखर. ४ टोंक, अग्र. ५ चाकरी ६ आश्रग करतों. ७ अंधार. ८ पर्जन्यकाळीं. ९ फांकते, वाढते. १० उदय पावणें. ११ सुकाळ. १२ मेजवानी. १३ आवडता.

जे स्वगुणीं उद्भटें[1] । घेऊनि सत्त्व चोखटें[2] ।
निगे सांडूनि कोपटें[3] । भोगक्षेम[4] हें ।
अवचटें[5] ऐसा जो जाये । तो सत्वाचाचि नवा होये ।
किंबहुना जन्म लाहे । ज्ञानियांमाजी ।
सांग पां धनुर्धरा । रावो रायपणें डोंगरा ।
गेलिया अपुरा । होय काई ॥
ना तरि येथींचा दिवा । नेलियां सोजिर्‍या[6] गांवा ।
तो तेथें तरी पांडवा । दीपचि कीं ॥

ज्ञा. १४. २१५–२२२.

इयाचि परी देख । तमसत्व अधोमुख ।
बैसोनि जैं आगळीक[7] । धरी रज ॥
आपुलिया कार्याचा । धुमाड[8] गांवीं देहाचा ।
माजवी तैं चिन्हांचा । उदय ऐसा ॥
पांजरली[9] वाहटुळी । करी वेगळ वेंटाळी ।
तैसी विषयीं सरळी[10] । इंद्रिया होय ॥
परदारादि पडे । परि विरूद्ध ऐसें नावडे ।
मग शेळीयेचेनि तोंडें । सैंघ[11] चारी ॥ ..॥
आणि आडें[12] पडलिया[12] । उद्यमजातां भलतियां ।
प्रवृत्ति धनंजया । हात न काढी ॥
नवींचि एकादा प्रासाद । कां करावा अश्वमेध ।
ऐसा अचाट छंद । घेऊनि उठी ॥
नगरेंचि रचावीं । जळाशयें[13] निर्मावीं ।
महावनें लावावीं । नानाविधें ॥
ऐसैसां अफाटीं कर्मीं । समारंभ उपक्रमी ।
आणि दृष्टादृष्टकामीं । पुरे न म्हणे ॥

---

१ श्रेष्ठ. २ शुद्ध. ३ खोपटें. ४ भोगाचें. ५ अकस्मात. ६ जवळच्या. ७ वरचढ. ८ धुमाकूळ ९ पसरलेली, उठलेली. १० मोकळीक. ११ पाहिजे तें. १२ पुढें आला असतां. १३ तलाव.

स्पृहा मना पुढां । आशेचा घे दवडा ।
विश्व घापें चाडा । पायांतळीं ॥
इत्यादि वाढतां रजीं । इयें चिन्हें होतीं सांजीं[2] ।
आणि ऐशा समाजीं[3] । वेंचे जरी देह ॥
तरि आघवाचि इहीं । परिवारला आनीं देहीं ।
रिगे परि योनिही । मानुषीची ॥
सुखाडेंसीं भिकारी । वसो पां राजमंदिरीं ।
तरी काय अवधारी । रावो[4] होईल ॥
बैल तेथें करबाडें[5] । हें न चुके गा फुडें ।
नेइजो कां वऱ्हाडें । समर्थाचेनि ॥
म्हणोनि व्यापाराच्या हातीं । उसंतु[6] दिहां ना रातीं ।
तैसयाचिये पांतीं । जुंपिजे तो ॥
कर्मजडाच्या ठायीं । किंबहुना होय देहीं ।
जो रजोवृत्तीच्या डोहीं । बुडोनि निमे ॥

ज्ञा. १४. २२७–२४३.

मग तैसाचि पुढती । रजसत्ववृत्ती ।
गिळूनि ये उन्नति । तमोगुण ॥...॥
तरी होय ऐसें मन । जैसें रविचंद्रहीन ।
रात्रीचें कां गगन । अंवसेचिये ॥
तैसें अंतर असोस । होय स्फूर्तिहीन उद्वसें ।
विचाराची भाष । हारपे तैं ।
बुद्धि मेचवेना[11] धोंडीं । हा ठायवरी मवाळें[12] सांडीं ।
आठवो देशधडी । जाला दिसे ॥
अविवेकाचेनि माजें । सबाह्य शरीर गाजे ।
एकलेनि घेपे दीजे । मौढ्यें तेथ ॥...॥
पैं आणिकही एक दिसे । जे दुष्कृतीं चित्त उल्हासे ।

---

१ घालतो. २ सुरेख. ३ चिन्हसमुदायांत. ४ राजा. ५ कडबा. ६ विश्रांति. ७ दिवसा. ८ पंक्तीला. ९ अतिशय. १० शून्य, वोस. ११ मोजतां येत नाहीं. १२ मदपणा.

आंधारीं देखणें जैसें । डुडुळाचें[1] ॥
तैसें निषिद्धाचेनि नांवें । भलतेंही भर होंवें ।
तियेविषयीं धांवे । घेती करणें[2] ॥
मदिरा न घेतां डुले । सन्निपातेंवीण बरळे ।
निष्प्रेमेंचि भुलें । पिसें[3] जैसें ॥
चित्त तरी गेलें आहे । परि उन्मनी तें नोहे ।
ऐसें माल्हातिजे[4] मोहें । माजिरनी ॥...॥
आणि हेंचि होय प्रसंगें । मरणाचें जरी पडे खांगें[5] ।
तरि तत्तुलनि निगे । तमेंसीं तो ॥...॥
पैं होऊनि दीपकलिका[6] । येरु आगी विझो कां ।
कां जेथ लाग तेथ असका । तोचि आहे ॥
म्हणोनि तमाचिये लोथें[7] । बांधोनियां संकल्पातें ।
देह जाय तें मागौतें । तमाचेंचि होय ॥
आतां काय येणें बहु । जो तमोवृद्धी मृत्यु लाहे ।
तो पशु कां पक्षी होय । झाड कां कृमी[8] ॥

ज्ञा. १४. २४४--२६०

---

## २५. जीवांची मृत्यूनंतर परमात्म्याशीं भेदाभेदस्थिति.

पुढती[9] जे तेथ गेले । ते न घेती माघौतीं[10] पाउलें ।
महोदधीं कां मिनले । स्रोतें[11] जैसे ॥
कां लवणाची कुंजरी[12] । सुदलिया[13] लवणसागरीं ।
होयचि ना माघारीं । परती जैसी ॥...॥
तैसें मजसीं एकवट । जे जाले ज्ञानें चोखट ।
तयां पुनरावृत्तीची वाट । मोडली गा ॥
तेथ प्रज्ञापृथ्वीचा रावो । पार्थ म्हणे जी जी पसावो[14] ।

---

१ घुबडाचें. २ इंद्रियें. ३ वेडा. ४ स्वाधीन होणें. ५ ठिकाण. ६ दिव्याची ज्योत. ७ मोटेंत, गाठोड्यांत. ८ किडा. ९ पुढें. १० परत ११ पाण्याचे प्रवाह. १२ हत्तीण. १३ घातली असतां. १४ प्रसाद.

परि विनंती एकी देवो । चित्त देतु ॥
तरि देवेंसि स्वयें एक होती । मग माघौति जे न येती ।
ते देवेंसि भिन्न आथी । कीं अभिन्न जी ॥
जरि भिन्नचि अनादिसिद्ध । तरि न येती हें असंबद्ध ।
जें फुलां गेले षट्पद[१] । ते फुलेंचि होती कां ॥
पैं लक्ष्याहूनि[२] अनारिसें[३] । बाण लक्ष्यीं शिवोनि जैसे ।
मागुते पडती तैसे । येतीच ते ॥
ना तरि तूंचि तें स्वभावें । तरी कोण कोणेंसी मिळावें ।
आपणयासीं आपण रुपावें । शस्त्रें केवीं ॥
म्हणोनि तुजसीं अभिन्नां जीवां । तुझा संयोग वियोग देवा ।
न थे बोलों अवगवां । शरीरेंसीं ॥...॥
इये आक्षेपीं अर्जुनाच्या । तो शिरोमणि सर्वज्ञांचा ।
तोषला बोध शिष्याचा । देखोनियां ॥
मग म्हणे गा महामति । मातें पावोनि न येती पुढती ।
ते भिन्नाभिन्न रीती । आहाती दोनी ॥
जें विवेकें खोलें पाहिजे । तरि मी तेचि ते सहजें ।
ना आहाचवाहांच[४] तरि दुजें । ऐसेंही गमती ॥
जैसे पाणियावरी वेगळ । तळपतां[५] दिसती कल्लोळ ।
येऱ्हवीं तरी निखिळ[६] । पाणीचि तें ॥
कां सुवर्णाहूनि आनें । लेणीं गमती भिन्नें ।
मग पाहिजे तंव सोनें । आघवेंचि तें ।
तैसें ज्ञानाचिये दिठी । मजसीं अभिन्नचि ते किरीटी ।
येर भिन्नपण तें उठी । अज्ञानास्तव ॥

ज्ञा. १५. ३१७–३३४

---

१ भ्रमर. २ निशाण. ३ वेगळें. ४ भोराकणें. ५ वरवर. ६ चमकत असतां ७ केवळ.

## २६. आत्मा येत नाहीं व जात नाहीं.

परि कर्ता भोक्ता ऐसें । हें जीवाचें तैंचि दिसे ।
जैं शरीरीं कां पैसे । येकाधिये ॥...॥
अथवा शरीरातें सांडी । तऱ्ही इंद्रियांची तांडी ।
हे आपणपयां सवें जोडी । घेऊनि जाय ॥
जैसा अपमानिला अतिथि । ने सुकृताची संपत्ति ।
कां साइंखडेयाची गति । सूत्रतंतु ॥
ना ना मावळतेनि तपनें । नेइजती लोकांची दर्शनें ।
हें असो द्रुती पवनें । नेइजे जैसी ॥
तेवीं मनःषष्ठां यया । इंद्रियांतें धनंजया ।
देहराज ने देहा-। पासूनि गेला ॥
मग येथें अथवा स्वर्गीं । जेथ जैसे देह आपंगी ।
तेथ तैसेंचि पुढती पांगी । मनादिक ।
जैसा मालवलिया दिवा । प्रभेसीं जाय पांडवा ।
मग उजळिजे तेथ तेधवां । तैसाचि फांके ॥
तरि ऐसैसिया राहाटी । अविवेकियांची दिठी ।
येतुलें हें किरीटी । गमेचि गा ॥
जे आत्मा देहासी आला । आणि विषय यणोंचि भोगिला ।
अथवा देहोनि गेला । हें साचाचि मानिती ॥ ..॥
परि देहाचें मोर्टकें उभें । आणि चेतना तेथ उपलंभे ।
तिये चळवळेचोनि लोभें । आला म्हणती ॥...॥
पाठीं भोगक्षीण आपैसें । देह गेलियां तें न दिसे ।
तेथें गेला गेला ऐसें । बोभाती ॥...॥
कां आरसा समोर ठेविजे । आणि आपणपें तेथ देखिजे ।
तरि तेधवांचि झालें मानिजे । काय आधीं नाहीं ॥...॥

---

१ प्रवेश करतो, विस्तार करतो. २ समुदाय. ३ कळसूत्री बाहुलीचा ४ सूर्यानें ५ स्वीकारतो. ६ पसरतो. ७ व्यवहारानें. ८ लहान ९ मिळाली. १० ओरडतात.

कां परता केलिया आरसा । लोप जाला तया आरसा ।
तरि आपणपें नाहीं ऐसा । निश्चय करावा ॥...॥
येथ आत्मा आत्मयाच्या ठायीं । देखिजे देहींचा धर्म देहीं ।
ऐसें देखणे ते पाहीं । आन आहाती ॥...॥
तैसी विवेकाचेनि पैसें[1] । जयांची स्फूर्ति स्वरूपीं बैसे ।
ते ज्ञानिये देखती ऐसें । आत्मयातें ॥
जैसें तारांगणीं भरलें । गगन समुद्रीं बिंबलें ।
परि तें तुटोनि नाहीं पडिलें । ऐसें निवेडे[2] ॥...॥
कां थाडरींचि[3] भरे शोषे । सूर्य तो जैसा तैसाचि असे ।
देह होतां जातां तैसें । देखती मातें ॥...॥
चैतन्य चढे ना वोहटे । चेष्टवी ना चेष्टे ।
ऐसें आत्मज्ञानें चोखटें । जाणती ते ॥

ज्ञा. १५. ३६१-३९०.

---

## २७. विश्वाश्वत्थाचें वर्णन.

अगा पैं पंडुकुमरा । यतां स्वरूपाचिया घरां ।
करीतसे आडवारा[4] । विश्वाभास जो ।
तो हा जगडंबरू । नोहे येथ संसारू ।
हा जाणिजे महातरू । थांवला[5] असे ॥
परि येरां रुखासारिखा[6] । हा तळीं मुळ, वरी शाखा ।
तैसा नोहे, म्हणोनि लेखा[7] । नयेचि कवणा ॥...॥
अर्जुना हें कवतिक[8] । सांगता असे अलौकिक[9] ।
जे वाढी अधोमुख । रुखा यया ॥
जैसा भानु उंची नेणो कें । रश्मिजाळ तळीं फांके ।
संसार हे कावरुखें । झाड तैसें ॥

---

१ विस्तारानें. २ स्पष्ट भासतें ३ डबके. ४ प्रतिबंध. ५ वाढलेला पसरलेला. ६ वृक्षाप्रमाणें. ७ लक्षांत, समजुतींत. ८ आश्चर्य. ९ आश्चर्यकारक.

आणि आथी नाथी तितुकें । रुंधलें असे येणेंचि एकें ।
कल्पांतींचेनि उदकें । व्योम जैसें ॥...॥
यया फळ ना चुंबिता । फूल ना तुरंबिता ॥
जें कांहीं पंडुसुता । तें रुखाचि हा ॥
हा ऊर्ध्वमूळ आहे । परि उन्मूळिला नोहे ।
येणेंचि हा होये । शाड्वळ गा ॥...॥
आतां उर्ध्व या कवण । येथें मूळ तें किंलक्षण ।
कां अधोमुखपण । शाखा कैसिया ॥...॥
आणि अश्वत्थ हा ऐसी । प्रसिद्धी कायसी ।
आत्मविद्विलासीं । निर्णय केला ॥
हें आघवेंचि बरवें । तुझिये प्रतीतीसि फांवे ।
तैसेनि सांगों सोलिवें । विन्यासें गा ॥...॥
ऐसें प्रेमरसें सुरफुरें । बोलिलें जंव यादववीरें ।
तंव अवधान अर्जुनाकारें । मूर्त जालें ॥
देव निरूपिती तें थेकुलें । एवढें श्रोतेपण फांकलें ।
जैसें आकाशा खेंव पसरिलें । दाहीं दिशीं ॥
श्रीकृष्णोक्तिसागरा । हा अगस्तीचि दुसरा ।
म्हणौनि घोट भरीं पाहे एकसरां । अवघयाचा ॥

ज्ञा. १५. ४६–७०.

---

## २८. उर्ध्वमूळ म्हणजे काय ?

मग म्हणे धनंजया । तें उर्ध्व गा तरू यया ।
येणें रुखेंचि कां जया । उर्ध्वता गमे ॥
येऱ्हवीं मध्योर्ध्वअध । हे नाहीं जेथ भेद ।
अद्वयासीं एकवंद । जया ठायीं ॥

---

१ व्यापिलें. २ वास घेणारा. ३ उपटलेला ४ हिरवागार. ५ विस्तारानें. ६ भरपूर, पूर्णपणें. ७ थोडें. ८ आलिंगन. ९ एकवाक्यता.

जो नाइकिजता नाद । जो असौं[1]रभ्य मकरंद ।
जो आंगाथिला आनंद । सुरतेंविण ॥
जया जें आन्हां[2] पैरौतें[3] । जया जें पुढें मागौतें ।
दृश्येंविण देखतें । अदृश्य जें ॥
उपाधीचा दुसरा । घालितां वोपसैरा[4] ।
नामरूपांचा संसारा । होय जयातें ॥
ज्ञातृज्ञेयाविहीन । नुसधेंचि जें ज्ञान ।
सुखा भरलें गगन । गाळींव जें ॥
जें कार्य ना कारण । जया दुजें ना एकपण ।
आपणयां जें जाण । आपणचि ॥
ऐसें वस्तु जें सांचें । तें ऊर्ध्व गा यया तरूचें ।
तेथ आंर घेणें मुळाचें । तें ऐसें असे ॥

ज्ञा. १५. ७२–७९.

---

## २९. मुळाचा बीजांकुरफळभाव.

तरी माया ऐसी ख्याती । नसतीच यया आथी ।
कां वांझेची संतति । वानणें जैसें ॥
तैसी सत् ना असत् होय । जें विचाराचें नाम न साहे ।
ऐसे यापरीची आहे । अनादि म्हणती ॥
जे नाना तत्त्वांची मांदुस[6] । जें जगदभ्राचें आकाश ।
जे आकारजाताचें दुसें[7] । घडी केलें ॥
जे भवद्रुमबीजिका । जे प्रपंचाचित्रभूमिका ।
विपरीतज्ञानदीपिका । सांचली जे ॥
ते माया वस्तूच्या ठायीं । असे जैसेंनि नाहीं ।
मग वस्तुप्रभावाचि पाही । प्रगट होय ॥

---

१ घ्राणाला अप्राप्त २ अलीकडे. ३ पलीकडे. ४ मिना, हीन खडा हिरकणी सारखा दिसावा म्हणून ज्यानें पूट देतात तो. ५ अंकुर. ६ पेटी. ७ वस्त्र.

जेव्हां आपणयां आली निद । करी आपणपें जेवीं मुग्ध ।
कां काजळी आणी मंद । प्रभा दीपीं ॥
स्वप्नीं प्रियापुढें तरुणांगी । निदेली चेवउनि वेगीं ।
आलिंगिलेंनिवीण आलिंगी । सकाम करी ॥
तैसी स्वरूपीं जाली माया । आणि स्वरूप नेणणें जें धनंजया।
तेंचि तरू यया । मूळ पहिलें ॥
वस्तूसी आपुला जो अबोध । तो उर्ध्वी आठुळेंजे कंद ।
वेदांतीं हाचि प्रसिद्ध । बीजभाव ॥
घनअज्ञानसुषुप्ती । तो बीजांकुरभाव म्हणती ।
येर स्वप्न हन जागृति । हा फळभाव तियेचा ॥
ऐसी यया वेदांतीं । निरूपणभाषाप्रतीति ।
परी तें असो प्रस्तुतीं । अज्ञान मूळ ॥

ज्ञा. १५. ८०-९०.

---

### ३०. न श्वोऽपि तिष्ठतीति अश्वत्थः ।

आणि अश्वत्थ ऐसें ययातें । म्हणती जे जाणते ।
तेंही परिस हो येथें । सांगिजेल ॥
तरी अश्वत्थ म्हणिजे उखां । तोंवरि एकसारिखा ।
नाहीं निर्वाह यया रुखा । प्रपंचरूपा ।
जैसा न लोटतां क्षण । मेघ होय नानावर्ण ।
कां विजू नसे संपूर्ण । निमेषभरी ॥
कांपतया पद्मदळा- । वरीलिया बैसका नाहीं जळा ।
कां चित्त जैसें व्याकुळा । माणुसाचें ॥
तैसीचि ययाची स्थिति । नासत जाय क्षणक्षणाप्रति ।
म्हणोनि ययातें म्हणती । अश्वत्थ हा ॥
आणि अश्वत्थ येणें नांवें । पिंपळ म्हणती स्वभावें ।
परि तो अभिप्राय नोहे । श्रीहरीचा ॥

---

१ बनतो. २ उषःकाल. ३ स्थिति.

येऱ्हवीं पिंपळ म्हणतां विखीं । मियां गती देखिली असे निकी[2] ।
परि तें असो काय लौकिकीं । तुम्हां काज ॥
म्हणोनि हा प्रस्तुत । अलौकिक परिसा ग्रंथ ।
तरी क्षणिकत्वेंचि अश्वत्थ । बोलिजे हा ॥...॥
ऐसें या रुखाचें होणें जाणें । न तर्कें होतेनि वहिल्लेपणें[3] ।
म्हणोनि ययातें लोक म्हणे । अव्यय हा ॥
येऱ्हवीं दानशीळ पुरुष । वेंचकपणेंचि संचकें[4] ।
तैसा व्ययेंचि हा रुख । अव्यय गमे ॥...॥
रिगे मन्वंतर मनू पुढें । वंशावरी वंशांचें मांडें[5] ।
जैसी इक्षुवृद्धि कांडेन कांडें । जिके जेवीं ॥...॥
वर्ततें वर्ष जाये । तें पुढिला मुळ्हारी[6] होये ।
जैसा दिवस जात कीं येत आहे । हें चोजवेना[7] ॥...॥
जैसें वाहतें पाणी जाय वेगें । तैसेंचि आणिक मिळे मागें ।
येथ असंताचि आसिजे जगें । मानिजे संत ॥
कां लागोनि डोळा उघडे । तंव कोडीवरी घडे मोडे ।
नेणतया तरंग आवडे । नित्य ऐसा ॥
वायसा एकें बुबुळें दोहींकडे । डोळां चाळितां[8] अपाडें ।
दोन्ही आथी ऐसा पडे । भ्रम जेवीं जगा ॥
पैं भिंगोरी निधियेपडली[10] । ते गमे भूमीसी जैसी जडली ।
ऐसा वेगातिशय भुली । हेतु होय ॥
हें बहु असो झडिती[11] । आंधारीं भोवंडितां कोलती ।
ते दिसे जैसी आयती[12] । चक्राकार ॥
हा संसारवृक्ष तैसा । मोडत मांडत सहसा ।
न देखोनि लोक पिसा[13] । अव्यय मानी ॥
परी ययाचा वेग देखे । जो हा क्षणिक ऐसा वोळखे ।
जाणे कोडिवेळां निमिखें[14] । होत जात ॥

---

१ विषयीं. २ चांगली. ३ सत्वरपणानें. ४ संचय करणारा. ५ विस्तार ६ मूळ. ७ समजत नाहीं. ८ फिरवणें. ९ झटकन्. १० परिभ्रमणांत ११ झपाट्यानें. १२ अखंड. १३ वेडा. १४ क्षणांत.

नाहीं अज्ञानावांचूनि मूळ । ययाचें असिलेपण टवाळ ।
ऐसें झाड सिनसाळ । दोंखिलें जेणें ॥
तयातें गा पंडुसुता । मी सर्वज्ञही म्हणे जाणता ।
पैं वाग्ब्रह्मीं सिद्धांता । वंद्य तोचि ॥

ज्ञा. १५. ११०--१४०

---

## ३१. अश्वत्थाचें उन्मूलन म्हणजे काय ?

परि तुझ्या हन पोटीं । ऐसें गमेल किरीटी ।
जें येवढें झाड उत्पाटी । ऐसें कायि असे ॥
कीं ब्रह्मयाच्या शेवटवरी । उर्ध्व शाखांची थोरी ।
आणि मूळ तंव निराकारीं । ऊर्ध्वीं असे ॥
हा स्थावराही तळीं । फांकत असे अधांच्या डाळीं ।
माजि धांवतसे दुजा मुळीं । मनुष्यरूपीं ॥
ऐसा गाढा आणि अफाट । आतां कोण करी यया शेवट ।
तरी झणीं हा हळुवट । धरिसी भाव ॥
तरी हा उन्मूळाव या दोषें । येथ सायासचि कायिसे ।
काय बाळा बागूल देशें । दवडावा आहे ॥
गंधर्व दुर्ग काय पाडावें । काय शशविषाण मोडावें ।
होआवें मग तोडावें । खपुष्प कीं ॥
तैसा संसार हा वीरा । रूख नाहीं साचोकारा ।
मा उन्मूळणीं दरारा । कायिसा तरी ॥
आम्हीं सांगीतली जे परी । मूळ डाळांची उर्जरी ।
ते वांझेचीं घरभरी । लेंकुरें जैसीं ॥
काय कीजती चेइलेपणीं । स्पप्नींचीं तियें बोलणीं ।
तैसी जाण ते काहाणी । दुर्गळीचि ते ॥

---

१ खोटें. २ क्षणिक. ३ उपटणारे. ४ शाखा. ५ निबिड, बलाढ्य. ६ क्षुद्र. ७ श्रम. ८ प्रकार. ९ जागेपणीं. १० दुबळी.

वांचूनि आह्मीं निरूपिलें जैसें । ययाचें अचळ मूळ असे तैसें ।
आणि तैसाचि जरी हा असे । साचोकारा ॥
तरि कोणाचेनि संतानें । निपजती तया उन्मूळणें ।
काय फुंकलिया गगनें । जाइजेल गा ॥
म्हणोनि पैं धनंजया । आम्हीं वानिलें रूप तें मायां ।
कांसवीचेनि तुपें राया । वोगरिलें जैसें ॥
मृगजळाचीं गा तळीं । तियें दिठी दुरूनि न्याहाळीं ।
वांचूनि तेणें पाणियें सोंळी केळी । लाविसी काई ॥
मूळ अज्ञानाचि तंव लटिकें । मा, तयाचें कार्य केतुकें ।
म्हणौनि संसारवृक्ष सत्य कें । वावोचि गा ॥

ज्ञा. १५. २१०–२२३.

---

## ३२. अश्वत्थास आदि, अंत, व स्थिति मुळींच नाहींत.

आणि अंत यया नाहीं । ऐसें बोलिजे जें कांहीं ।
तेंही साचचि पाहीं । येकेपरी ॥
तरि प्रबोध जंव नोहे । तंव निद्रे काय अंत आहे ।
कीं रात्री सरे तंव पाहे । तया अंरांतें ॥
तैसा जंव पार्था । विवेक नुंधवी माथा ।
तंव अंत नाहीं अश्वत्था । भवरूप[१] यया ॥...॥
तेवींची हा अनादी । ऐसी ही आथीशाब्दी ।
तो आंळू नोहे अनुरोधी । बोलातें यया ॥...॥
वांझेचिया लेंका । कैंचि जन्मपत्रिका ।
नभीं नीळी भूमिका । कें कल्पूं पां ॥
व्योमकुसुमांचा पांडवा । कवणें देंठ तोडावा ।
म्हणौनि नाहीं ऐसिया भवा । आदि कैंची ॥...॥

---

१ वर्णन केलें. २ खोटें. ३ वाढणें, मेजवानी करणें. ४ भात. ५ खोटा. ६ जागृति. ७ अलीकडे. ८ काढीत नाहीं. ९ आरंभ.

अर्जुना ऐसेनि पाहीं । आद्यंत ययासी नाहीं ।
माजीं स्थिति आभासे कांहीं । परि टवाळ[1] ते गा ॥
ब्रह्मगिरीहूनि न निगे[2] । आणि समुद्रींही कीर न रिगे[3] ।
तरि माजीं दिसे वाउगें[4] । मृगांवु जैसें ॥...॥
नाना रंगीं गजबजे[5] । जैसें इंद्रधनुष्य देखिजे ।
तैसा नेणतया आपजे[6] । आहे ऐसा ॥
ऐसेनि स्थितीचिये वेळे । भुलवी अज्ञानाचे डोळे ।
लाघवी[7] हरी मेखळे[8] । लोक जैसा ॥...॥
एवं आदि ना अंतस्थिती । ना रूप ययासी आथी ।
आतां कायसी कुंथाकुंथी । उन्मूळनीं गा ॥
आपुलिया अज्ञानासाठीं । नव्हता थांवली[10] किरीटी ।
तरि आतां आत्मज्ञानाचिया लोटीं[11] । खांडेनि गा ॥
वांचूनि ज्ञानेंविण एकें । उपाय करिसी जितुके ।
तिहीं गुंफसी अधिकें । रुखीं इये ॥
मग किती खांदोखांदीं । यया हिंडावें ऊर्ध्वीं अधीं ।
म्हणोनि मूळचि अज्ञान छेदीं । सम्यक्ज्ञानें ॥
येऱ्हवी दोरीचिया उरगा[13] । डोंगा[14] मेळवितां पैं गा ।
तो शिणचि वाउगा । केला होय ॥
तरावया मृगजळाची गंगा । डोणी[15]लागीं धावतां दांगीं[16]-।
माजीं वोहळें बुडिजे पैं गा । साच्च जेवीं ॥
म्हणोनि स्वप्नींचिया भया । औषध चेवोचि धनंजया ।
तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ॥

ज्ञा. १५. २२४–२५४.

---

१ खोटी २ निघणें. ३ शिरणें. ४ व्यर्थ. ५ भरे ६ उत्पन्न होईल. ७ बहुरूपी. ८ फसवतो. ९ कफनीनें. १० पसरला. ११ तोड. १२ तरवारीनें. १३ साप. १४ काठ्या. १५ नाव. १६ वन.

## ३३. सर्वभावानें ईश्वराचें भजन करणारे लोकच मायासागर तरून जातात.

आतां महदादि[1] हे माझी माया । उतरोनियां धनंजया ।
मी होइजे हें आया[2] । कैसेनि ये ॥
जियें ब्रह्माचळाचा आधाडां[3] । पहिल्या संकल्पजलाचा उभडा[4] ।
सवेंचि महाभूतांचा बुडबुडा । साना आला ॥...॥
जे गुणघनाचेनि[5] वृष्टिभरें । भरली मोहाचेनि महापुरें ।
घेऊनि जात नगरें । यमनियमांचीं ॥
द्वेषाच्या आवर्तीं[6] दाटत[7] । मत्सराचे वळसे[8] पडत ।
माजीं प्रमादादि तळपत[9] । महामीन ॥...॥
रतीचिया वेटा । आदळती कामाचिया लाटा ।
जेथ जीवफेनसंघाटा[10] । सैंघ[11] दिसे ॥...॥
तया पाणियाचेनि वाहिलेपणें[12] । अर्जुना न धरिती वोभाणें[13] ।
ऐसा मायापूर हा कवणें । तरिजेल गा ॥
येथ एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो ।
तो तो अपावो[14] । होय तें एक ॥
एक स्वयंबुद्धीच्या बाहीं । रिगाले[15] तयांची शुद्धीचि[16] नाहीं ।
एक जाणिवेचे डोहीं । गर्वेंचि गिळिले ॥
एकीं वेदत्रयाचिया सांगडीं[17] । घेतल्या अहंभावाचिया धोंडी ।
ते मदमीनाच्या तोंडीं । सगळेचि गेले ॥...॥
एकीं यजनक्रियेची पेटी । बांधोनि घातली पोटीं ।
ते स्वर्गसुखाच्या कपाटीं । शिरकोनि ठेले ॥...॥
जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तार्गा[18] नलगे ।
वरी कांहीं तरों ये योगें । तरी विपाय[19] तो ॥...॥

---

१ महत्तत्त्वादि. २ स्वाधीन, साध्य. ३ अर्धवट तुटलेला कडा. ४ उसळी. ५ गुणरूपी मेघांच्या. ६ भोवरें. ७ भरलेली. ८ वळणें. ९ चमकतात. १० समुदाय. ११ पुष्कळ. १२ वेगानें. १३ पूर. १४ हानि. १५ शिरले. १६ पत्ताच. १७ भोपळे. १८ ठाव पहाण्याचा वेळू. १९ क्वचित्.

पाडस[1] वागुर[2] करांडी[3] । कां मुंगी मेरू वोलांडी ।
तरी मायेची पैलथडी[4] । देखती जीव ॥ . ॥
येथ एकचि लीला[5] तरले । जे सर्वभावें मज भजले ।
तयां ऐलींच[6] थडीं[7] सरलें । मायाजाळ ॥

ज्ञा. ७. ९८–९७.

---

## ३४. ईश्वर नाहीं म्हणणारे लोक केवळ दैवहीन होत.

म्हणोनि अर्जुना मी नसें । ऐसा कवण ठावं[8] असे ।
परी प्राणियांचें दैव कैसें । जे न देखती मातें ॥...॥
हें आंत बाहेर मियां कोंदलें[9] । जग निखिल माझेंचि वोतिलें ।
कीं कैसें कर्म तयां आड आलें । जे मीचि नाहीं म्हणती ॥
परि अमृतकुहां[10] पडिजे । कां आपणपयांतें काडिये काढिजे ।
ऐसे अर्थी काय कीजे । अप्राप्तासी ॥
ग्रासा एका अन्नासाठीं । अंध धांवताहे किरिटी ।
आडळेला[11] चिंतामणी पायें लोटी । आंधळेपणें ॥
तैसें ज्ञान जैं सांडूनि जाये । तैं ऐसी हे दशा आहे ।
म्हणोनि कीजे तें केलें नोहे । ज्ञानेंविण ॥

ज्ञा. ९. ३००–३०५.

---

## ३५. विश्वांतील सर्व सत्ता ईश्वराकडे आहे.

तो विश्वश्रियेचा भर्ता[12] । मीचि गा येथ पांडुसुता ।
मी गोसावी[13] समस्ता । त्रैलोक्याचा ॥
आकाशें सर्वत्र वसावें । वायूनें नावभरी[14] उगें[15] नसावें ।
पावकें दाहावें । वर्षावें जळें ॥

---

१ हरणाचें पोर. २ जाळें. ३ कुरतडी, तोडी. ४ परतीर. ५ सहज. ६ अलीकडच्याच. ७ तीरावर. ८ ठिकाण. ९ भरलें. १० कूपांत ११ सांपडलेला. १२ विश्वांतील संपत्तीचे भरण पोषण करणारा. १३ धनी. १४ क्षणभर. १५ स्वस्थ.

पर्वतीं बैसका न संडावी । समुद्रीं रेखा नोलांडावी ।
पृथ्वीया भूतें वाहावीं । हे आज्ञा माझी ॥
म्यां बोलविला वेद बोले । म्यां चालविला सूर्य चाले ।
म्यां हालविल्या प्राण हाले । जो जगातें चाळिता ॥
मियांचि नियमिलासांतां । काल ग्रासितसे भूतां ।
इयें म्हणियागतें पंडुसुता । सकळें जयाचीं ॥
जो ऐसा समर्थ । तो मी जगाचा नाथ ।
आणि गगना ऐसा साक्षिभूत । तोही मीचि ॥

ज्ञा. ९. २८०–२८५.

---

## ३६. देवाचा जगताशीं संबंध.

इहीं नामरूपीं आघवा । जो भरला असे पांडवा ।
आणि नामरूपांचाही वोल्हावा । आपणचि जो ॥
जैसे जळाचे कल्लोळ । आणि कल्लोळीं आथी जळ ।
ऐसेनि वसवीतसे सकळ । तो निवास मी ॥
जो मज होय अनन्य शरण । त्याचें निवारीं मी जन्ममरण ।
यालागीं शरणागतां शरण्य । मीचि एक ॥...॥
जैसा समुद्र थिल्लर न म्हणतां । भलतेथ बिंबे सविता ।
तैसा ब्रह्मादि सर्वांभूतां । सुहृद तो मी ॥
मीचि गा पांडवा । या त्रिभुवनासी वोलावा ।
सृष्टिक्षयप्रभवा । मूळ तें मी ॥
बीज शाखांनें प्रसवे । मग तें रूखपण बीजीं सामावे ।
तैसें संकल्पें होय आघवें । पाठीं संकल्पीं मिळे ॥
ऐसें जगाचें बीज जो संकल्प । अव्यक्त वासनारूप ।
तया कल्पांतीं जेथ निक्षेप । होय तें मी ॥

ज्ञा. ९. २८६–२९३.

---

१ मर्यादा. २ चालन करणारा. ३ आज्ञा दिली असतां. ४ चाकर. ५ आधार जिव्हाळा. ६ डबकें. ७ सांठवलें जातें. ८ ठेवणें.

## ३७. ईश्वर सर्वकर्ता असून मनुष्य हा निमित्तमात्र आहे.

येर चेष्टविते जें बळ । तें मागांचि मियां ग्रासिलें सकळ ।
आतां कोल्हेरीचे वेताळें । तैसे निर्जीव हे आहाती ॥
हालविती दोरी तुटली । तरी तियें खांबावरील बाहुलीं ।
भलतेणें लोटलीं । उलथोनि पडती ॥
तैसा सैन्याचा यया बगा । मोडतां वेळ न लगे पैं गा ।
म्हणोनि उठीं उठीं वेगां । शहाणा होईं ॥
तुवां गोग्रहणाचेनि अवसरें । घातलें मोहनास्त्र येकसरें ।
मग विराटाचेनि महाभेडें उत्तरें । आसडूनि नागविलें ॥
आतां हें त्याहूनि निपटारें जाहालें । निवटीं आयितें रण पडिलें ।
घेईं यश रिपु जिंतिले । एकलेनि अर्जुनें ॥

ज्ञा. ११. ४६६-४७०,

---

## ३८. ईश्वरास स्थूलदृष्टीनें पाहाणें हें पाहणें नव्हे.

किंबहुना भेवा विहाया । आणि साचें चाड आथि जरी मियां ।
तरी तूं गा उपपत्ति इया । जतन कीजे ॥
येऱ्हवीं दिठी वेधिली कवळें । तें चांदिणियातें म्हणे पिवळें ।
तेवीं माझ्या स्वरूपीं निर्मळें । देखिती दोष ॥
ना तरी ज्वरें विटाळलें मुख । तें दुधातें म्हणे कडू विख ।
तेवीं अमानुषा मानुष । मानिती मातें ॥...॥
पैं स्थूलदृष्टी देखती मातें । तेंचि न देखणें जाण निरुतें ।
जैसे स्वप्नींचेनि अमृतें । अमर नोहिजे ॥...॥

---

१ मातीच्या चित्राचे. २ पुतळे. ३ आकार. ४ वेळीं. ५ एकदम. ६ अति भ्याडपणाचें. ७ हिसकावून. ८ हीन, निर्जीव. ९ संहार कर. १० संसाराला ११ भीत असाल. १२ इच्छा १३ युक्ती. १४ व्यापली. १५ कावीळ रोगानें १६ कडवट झालेलें १७ निश्चयेंकरून.

जैसा नक्षत्राचिया आभासा-। साठीं घात जाला तया हंसा।
माजीं रत्नबुद्धीचिया आशा। रिगोनियां ॥...॥
अथवा निधान[1] हें प्रगटलें। म्हणोनि खदिरांगार[2] खोळे[3] भरिले।
कां साउली नेणतां घातलें[4]। कुहां सिंहें ॥
तेवि मी म्हणोनि प्रपंचीं। जिहीं बुडी दिधली कृतनिश्चयाची।
तिहीं चंद्रासाठीं जेवि जळींची। प्रभा धरिली ॥
तैसा कृतनिश्चय वायां गेला। जैसा कोण्ही येक कांजी[5] प्याला।
मग परिणाम पाहों लागला। अमृताचा ॥
तैसें स्थूळाकारीं नाशिवंतें। भरंवसा बांधोनि चित्तें।
पाहती मज अविनाशातें। तरी केंचा दिसें ॥

ज्ञा. ९. १४०-१५२.

---

## ३९. ईश्वरास मानुषधर्म लावणें हें चुकीचें होय.

येतुलेनि अनामा नाम। मज अक्रियासी कर्म।
विदेहासि देहधर्म। आरोपिती ॥...॥
मज वर्णहीना वर्ण। गुणातीतासी गुण।
मज अचरणा चरण। अपाणिया पाणी ॥...॥
तैसें अश्रवणा श्रोत्र। मज अचक्षूसी नेत्र।
अगोत्रा गोत्र[6]। अरूपा रूप ॥...॥
मज अनावरणा[7] प्रावरण। भूषणातीतासि भूषण।
मज सकळकारणा कारण। देखती ते ॥
मज सहजातें करिती। स्वयंभातें प्रतिष्ठिती।
निरंतरातें आव्हानिती। विसर्जिती गा ॥
मी सर्वदा स्वतःसिद्ध। तो कीं बाळ तरुण वृद्ध।
मज एकरूपा संबंध। जाणती ऐसे ॥

---

१ ठेवा. २ खैराचे निखारे. ३ पदरांत. ४ उडी घातली. ५ ताकाची निवळ, पेज. ६ नात्याचा संबंध. ७ आच्छादन घालण्यासारखा नसलेला.

मज अद्वैतासी दुजें । मज अकर्तयासी कांजें[1] ।
मी अभोक्ता कीं भुंजे । ऐसें म्हणती ॥...॥
मी स्वानंदाभिराम । तया मज अनेक सुखांचा काम ।
आघवाचि मी असें सम । कीं म्हणती एकदेशी ॥
मी आत्मा एक चराचरीं । म्हणती एकाचा कैंपक्ष[2] करीं ।
आणि कोपोनि एकातें मारीं । हेंचि रूढवित्ती[3] ॥
किंबहुना ऐसे समस्त । जे हे मानुषधर्म प्राकृत[4] ।
तयाचि नांव मी ऐसें विपरीत । ज्ञान तयांचें ॥
जंव आकार एक पुढां देखती । तंव हा देव येणें भावें भजती ।
मग तोचि विघडलिया[5] टाकिती । नाहीं म्हणोनि ॥
मातें येणें येणें प्रकारें । जाणती मनुष्य ऐसेनि आकारें ।
म्हणऊनि ज्ञानचि तें आंधारें[6] । ज्ञानासि करी ॥

ज्ञा. ९. १५६-१७१.

---

## ४० देवांची ईश्वराविषयीं तळमळ.

तैसें[7] या जगासि जाहालें । तूतें देखोनि तळमळित ठेलें ।
यामाजीं पैलं[8] भले । सुरांचे मेळाव[9] ॥
हे[10] तुझेनि आंगिकें तेजें । जाळूनि सर्व कर्मांचीं बीजें ।
मिळत तुज आंत निजें । सद्भावेंसीं ॥
आणिक एक सावियांचि[10] भयभीरू[11] । सर्वस्वें धरूनि तुझी मोहरू[12] ।
तुज प्रार्थिताती करू । जोडोनियां ॥
देवा अविद्यार्णवीं पडलों । जी विषयवागुरें[13] आतुडलों[14] ।
स्वर्गसंसाराचिया सांपडलों[15] । दोहीं भागीं ॥
ऐसें आमुचें सोडवणें । तुजवांचोनि कीजेल कवणें ।
तुज शरण गा सर्वप्राणें । म्हणत देवा ॥...॥

---

१ कर्म. २ कैवार. ३ प्रसिद्धीस आणतात. ४ सामान्य ५ भंगला. ६ काळोख. ७ पलीकडे. ८ समुदाय. ९ देवांचे समुदाय. १० सहजच. ११ भयभीत. १२ मार्ग १३ विषयरूप जाळ्यांत. १४ आडकलों १५ पेंचांत पडली.

हे आघवेचि आपुलालिया लोकीं । उत्कंठित अवलोकीं ।
हे महामूर्ती दैविकी । पाहात आहाती ॥
मग पाहात पाहात प्रतिक्षणीं । विस्मित होऊनि अंतःकरणीं ।
करित निजमुकुटीं वोवाळणी । प्रभुजी तुज ॥
ते जयजयघोषकलरवें । स्वर्ग गाजविती आघवे ।
ठेवित ललाटावरी बरवे । करसंपुट ॥

ज्ञा. ११. ३२६–३३६.

---

## ४१. ईश्वर हाच सर्व विश्वाचें मूळ होय.

पाहें पां आरंभीं बीज एकलें । मग तेंचि विरूढलिया बुंड जाहालें ।
बुडीं कोंभ निघाले । खांदियांचे ॥
खांदियांपासूनि अनेका । फुटलिया नाना शाखा ।
शाखांस्तव देखा । पल्लवपानें ॥
पल्लवीं फूल फळ । एवं वृक्षत्व जाहालें सकळ ।
तें निर्धारितां केवळ । बीजचि आघवें ॥...॥
ऐसेनि हें विश्व येथें । मीचि विस्तारिलोंसें निरुतें ।
परी भावाचेनि हातें । मानें जया ॥...॥
ह्मणोनि गा यापरी । ब्रह्मादि पिपीलिकांवरी ।
मींवाचूनि दुसरी । गोष्टीच नाहीं ॥
ऐसें जाणे जो साचें । तया चेईरें जाहालें ज्ञानाचें ।
म्हणोनि उत्तमाधमभेदाचें । स्वप्न न देखे ॥...॥
म्हणऊनि अभेदें जो भक्तियोग । तेथ शंका नाहीं नये खंग ।
करितां ठेला तरी चांग । तें सांगितलें षष्ठीं ॥...॥
ऐसेनि जे निजज्ञानी । खेळत सुखें त्रिभुवनीं ।
जगद्रूपा मनीं । सांठवूनि मातें ॥

---

१ मंजुळ शब्दानें. २ जोडलेले हात. ३ अंकूर आल्यावर ४ बुंधा. ५ अंकूर. ६ पटेल. ७ मुंगीपर्यंत ८ जागृति. ९ प्रतिबंध. १० राहिला

जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ।
हा भक्तियोग निश्चित । जाण माझा ॥

ज्ञा. १०. ९८–११८.

---

### ४२. विषमभूतग्रामामध्यें एकाच समवस्तूचें दर्शन.

भूतें आघवींचि होतीं । एकाचीं एक आहाती ।
परी पैं भूतप्रतीती । वेगळाली असे ॥
यांचीं नामेंही आनानें[1] । अनारिसीं[2] वर्तनें ।
वेषही सिनाने[3] । आघवेयांचे ॥
ऐसे देखोनि किरीटी । भेद सुसी[4] हन पोटीं ।
तरि जन्माचिया कोटी । न लाहसी निघों ॥
पैं नानाप्रयोजनशीळें[5] । दीर्घें वक्रें वर्तुळें ।
होतीं एकीचींच फळें । तुंबिणीयेचीं[6] ॥...॥
हे भूतग्राम विषम । परी वस्तु ते एथ सम ।
घटमठीं व्योम[7] । जियापरी ॥
हा नाशतां भूताभास । एथ आत्मा तो अविनाश ।
जैसा केयूरादिकीं कस । सुवर्णाचा ॥
एवं जीवधर्महीन । जो जीवेंसीं अभिन्न ।
देखे तो सुनयन । ज्ञानियांमाजीं ॥
ज्ञानाचा डोळा डोळसां–। माजि डोळस तो वीरेशा ।
हे स्तुति नोहे बहुवसा । भाग्याचा तो ॥...॥
म्हणोनि तो दैवागळा । वानीत असों वेळोवेळां ।
जे साम्यसेजे डोळां[8] । लागला तया ॥

ज्ञां. १३. १०५९–१०८०.

---

१ निरनिराळीं. २ भिन्नभिन्न. ३ तऱ्हेतऱ्हेचे. ४ धरिशील. ५ नानाप्रकारच्या कामीं उपयोगी पडणारीं. ६ भोपळीचीं ७ आकाश. ८ झोंप लागली.

## ४३. जगास परतें सारून ईश्वरास पाहतां येणें शक्य नाहीं.

आतां शरीरें बहुतें । देखोनि न भेद हो चित्तें ।
जें मनबुद्ध्यादि भूतें । एकचि येथें ॥
हां गा एकाचि देहीं । काय अनारिसे अवयव नाहीं ।
तेवीं विचित्र विश्व पाहीं । एकचि हें ॥
पैं उंचा नीचा डाहाळिया । विषमा वेगळालिया ।
येकाचि जेवीं जालिया । बीजाचिया ॥...॥
नाना कल्लोळपरंपरा । संतती जेसी सागरा ।
आह्मां आणि चराचरा । संबंध तैसा ॥
म्हणौनि वन्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्हीचि केवळ ।
तेवीं मी गा सकळ । संबंध वावे ॥
जालेंनि जगें मी झांकें । तरि जगत्वें कोण फांके ।
किळेवरी माणिकें । लोपिजे काई ॥...॥
म्हणौनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें ।
तैसा नोहें उखितें । आघवें मीचि ॥

ज्ञा. १४. ११८–१२८.

---

## ४४. ईश्वराच्या रूपाचें याथातथ्यरीतीनें अज्ञेयत्व.

मी कवण पां केतुला । कवणाचा कैं जाहला ।
या निरुती करितां बोला । कल्प गेले ॥
अगा उदरींचा गर्भ जैसा । न देखे आपुलिये मायेची वयसा ।
मी आघवेया देवां तैसा । नेणवे कांहीं ॥
आणि जळचरां उदधीचें मान । मशका नोलांडवेचि गगन ।
तेवीं महर्षीचें ज्ञान । न देखेचि मातें ॥

---

१ भिन्नभिन्न. २ खोटा. ३ प्रभेनें. ४ पलीकडे. ५ संपूर्ण. ६ निश्चय.
७ वय. ८ चिलट.

कां जे महर्षी आणि देवां । येरां भूतजातां सर्वां ।
मीचि आदि म्हणोनि पांडवा । अवघड जाणतां ॥
उतरलें उदक पर्वत वेळघे । जरि झाड वाढत मुळीं लागे ।
तरि मियां जालेनि जगें । जाणिजे मातें ॥

ज्ञा. १०. ६५–६९.

---

## ४५. ज्ञान हें ईश्वरापुढें अज्ञान होय.

अर्जुना माझे ठायीं । आपणपेंवीण सौरसें नाहीं ।
मी उपचारें कवणाही । नाकळें[3] गा ॥
एथ जाणीव करी तोचि नेणे । आथिलेपण मिरवी तोचि उणें ।
आम्ही जाहालों ऐसें जो म्हणे । तो कांहींचि नव्हे ॥...॥
पाहे पां जाणिवेचेनि बळें । कोण्ही वेदांपासूनि असे आगळें ।
कीं शेषाहूनि तोंडाळें । बोलकें आथी ॥
तोही आंथरुणा तळवटीं दडे । येरूं नेति नेति म्हणोनि बहुडे ।
एथ सनकादिक वेडे । पिसे जाहाले ॥
करितां तापसांची कडसणी । कवण जवळां ठाविजे शूळपाणी ॥
तोहि अभिमान सांडूनि पायवणी[11] । माथां वाहे ॥ . ॥
म्हणोनि थोरपण पैन्हां[12] सांडिजे । एथ व्युत्पत्ति[13] आघवी विसरिजे ।
जें जगा धाकुटें होइजे । तैं जवळीक माझी ॥
अगा सहस्रकिरणाचिये[14] दिठी– । पुढां चंद्रही लोपे किरीटी ।
तेथ खद्योतें कां हुटहुटी । आपुलेनि तेजें ॥...॥
यालागीं शरीरें सांडोवा कीजे । सकळगुणांचें लोण उतरिजे ।
संपत्तिमद सांडिजे । कुरवंडी करूनी ॥

ज्ञा. ९. ३६७–३८१.

---

१ आश्रय करील २ आनंद, योग्यता ३ स्वाधीन होत नाहीं. ४ संपन्नता ५ श्रेष्ठ. ६ बोलकें. ७ दुसरा (येथें, वेद). ८ मागें सरतो. ९ निवड, विचार १० शंकर. ११ चरणतीर्थ. १२ पलीकडे. १३ ज्ञातेपणाचा अभिमान. १४ सूर्य. १५ कांजवा. १६ घमेंड करावी. १७ निंबलोण करणें, उतरून टाकणें.

## ४६. तूं गुणत्रयाचा अव्हेर करून आत्मसुखाचा उपभोग घे.

तिहीं गुणीं आवृत[1] । हे वेद जाण निभ्रांत[2] ।
म्हणोनि उपनिषदादि समस्त । सात्त्विक ते ॥
येर रजतमात्मक । जेथ निरूपिजे कर्मादिक ।
जे केवळ स्वर्गसूचक । धनुर्धरा ॥
म्हणोनि तूं जाण । हे सुखदुःखांसीच कारण ।
एथ झणें[3] अंतःकरण । रिघों देसी ॥
तूं गुणत्रयातें अव्हेरीं । मी माझें हें न करीं ।
एक आत्मसुख अंतरीं । विसंबे[4] झणीं ॥
जरी वेदें बहुत बोलिलें । विविध भेद सूचिले ।
तरी आपण हित आपुलें । तेंचि घेपे ॥
जैसा प्रगटलिया गभस्ती । अशेषही मार्ग दिसती ।
तरि तेतुलेहि काय चालिजती । सांगें मज ॥
का उदकमय सकळ । जरी जाहलें असे महीतळ[5] ।
तरि आपण घेपे केवळ । आर्तीचि[6] जोगें ॥
तैसे ज्ञानी जे होती । ते वेदार्थातें विवंचिती[7] ।
मग अपेक्षित तें स्वीकारिती । शाश्वत जें ॥

ज्ञा. २. २५६–२६३.

---

## ४७. साधु हाच महाभूतांच्या माथ्यावर चढूं शकतो.

ऐसाही जरी विपायें[8] । सांडुनि पुढील पायें ।
सर्वेंद्रियांसी होये । पाठिमोरा[9] जो ॥
प्रवर्तलाही वरी बहुडे । देह सांडुनी मागिलीकडे ।
महाभूतांचिया चढे । माथयावरी ॥

---

१ व्याप्त. २ निःसंशय. ३ चुकून ४ विसरूं नकोस. ५ पृथ्वीतल. ६ तहान, इच्छा. ७ विचार करतात. ८ कदाचित्. ९ मागें फिरे.

तेथ राहोनि ठायेंठिकें[1] । स्वप्रकाशें चोखें ।
अजत्व माझें देखे । आपुलियां डोळां ॥
मी आदिसीं पर । सकळलोकमहेश्वर ।
ऐसिया मातें जो नर । यापरी जाणे ॥
तो पाषाणामाजीं परिस । जैसा रसाआंत सिद्धरस[2] ।
तैसा मनुष्याआंत तो अंश । माझाचि जाण ॥
तें चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ[3] ।
येर माणुसपण तें भांव[4] । लौकिक भाग ॥...॥
तो आपभयेंचि सांडिजे पापीं । जैसा जळत चंदन सर्पीं ।
तेवीं मातें जाणे तो संकल्पीं[5] । वर्जूनि[6] घेपे[7] ॥

ज्ञा. १०. ७२--८०.

---

## ४८. ईश्वरस्वरूपाचें ज्ञान म्हणजेच ईश्वराच्या सर्व विभूतींचें ज्ञान होय.

जैसीं अवघींचि नक्षत्रें वेंचावीं । ऐसी चाड उपजेल जें जीवीं ।
तें गगनाची बांधावी । लोथ[8] जेवीं ॥
कां पृथ्वीये परमाणूंचा उगाणा[9] घ्यावा । तरि भूगोलेंचि[10] कांखे सुवावा[11] ।
तैसा विस्तार माझा पाहावा । तरि जाणावें मातें ॥
जैसें शाखांसीं[12] फूल फळ । एकिहेळां[13] वेटाळूं म्हणिजे सकळ ।
तरि उपडुनियां मूळ । जेवीं हातीं घेपे ॥
तेवीं माझे विभूतिविशेष । जरी जाणों पाहिजती अशेष ।
तरी स्वरूप एक निर्दोष । जाणिजे माझें ॥
येऱ्हवीं वेगळालिया विभूती । कायिएक परिससी किती ।
म्हणोनि एकिहेळां महामती । सर्व मी जाण ॥

---

१ ठिकाणाच्या ठिकाणी स्थिर. २ अमृत. ३ अंकुर. ४ भास. ५ कल्पनां कडून. ६ वगळून. ७ घेतला जातो. ८ मोट, गांठोडें. ९ झाडा. १० पृथ्वी. ११ घालावी. १२ शाखांसह. १३ एकदम.

## ४९. अर्जुनाची विश्वरूपदर्शनाबद्दल उत्कंठा.

मग आइका तो किरीटी। घालूनि विश्वरूपीं दिठी।
पहिली कैसी गोठी। करिता जाहला॥
हें सर्वही सर्वेश्वर। ऐसा प्रतीतिगत[1] जो पतिकर[2]।
तो बाहेरी होआवा गोचर। लोचनांसी॥
हे जीवाआंतुली चाड। परि देवासि सांगतां सांकड[3]।
कां जें विश्वरूप गूढ। कैसेनि पुसावें॥
म्हणे मागां कवणीं कहीं। जें पढियंतेनें[4] पुसिलें नाहीं।
तें सहसा[5] कैसें काई। सांगा म्हणों॥
मी जरी सलगीचा[6] चांग। तरि काय आइसीहूनि अंतरंग[7]।
परि तेही हा प्रसंग। विहाली[8] पुसों॥
माझी आवडे तैसी सेवा जाहली। तरि काय होईल गरुडाचिया येतुली
परि तोही हे बोली। करीचि ना।
मी काय सनकादिकांहूनि जवळा। परि तयांही नागवेचि[9] हा चाळा।
मी आवडेन काय प्रेमळां। गोकुळींचिया ऐसा॥
तयांतेंही लेंकुरपणें झकविलें[10]। एकाचे गर्भवासही साहिले।
परि विश्वरूप हें राहविलें। न दावीच कवणा॥
हा ठायवरी गुंज[11]। याचिये अंतरींचें हें निज।
केवीं उराउरी[12] मज। पुसों[13] ये पां॥
आणि न पुसेंचि जरी म्हणें। तरी विश्वरूप देखिलियाविणें।
सुख नोहेचि, परि जिणें। तेंही विपायें॥
म्हणोनि आतां पुसों अळुमाळसें[14]। मग करूं देवा टाके तैसें[15]।
येणें प्रवर्तला साध्वसें[16]। पार्थ बोलों॥

ज्ञा. ११. २८--३८

---

१ अनुभवांत असलेला २ अनुभव, अंगिकार. ३ संकट, संकोच. ४ आवडत्यानें. ५ एकदम. ६ स्नेहाचा. ७ जवळचा ८ भ्यालों. ९ न करवे. १० फसविले. ११ गुप्त. १२ झडकर. १३ विचारतां येईल. १४ थोडेसें. १५ आवडलें तसें. १६ भयानें.

## ५०. ईश्वराचें मुद्दलरूप.

मग बोलिला तो किरीटी । म्हणे तुम्हीं केली जे गोठी ।
निया प्रतीतीची दिठी । निवाली माझी ॥
आतां जयाचेनि संकल्पें । हे लोकपरंपरा होय हारपे ।
जया ठायातें आपणपें । मी ऐसे म्हणसी ॥
तें मुद्दल रूप तुझें । जेथूनि इयें द्विभुजें हन चतुर्भुजें ।
सुरकार्याचेनि व्याजें । घेवों घेवों येसी ॥
पैं जळशयनाचिया अवगणिया । कां मत्स्यकूर्म इया मिरवणिया ।
खेळ सरलिया तूं गुणिया । सांठविसी जेथ ॥
उपनिषदें जे गाती । योगिये हृदयीं रिगोनि पाहाती ।
जयातें सनकादिक आहाती । पोटाळुनियां ॥
ऐसें अगाध जें तुझें । विश्वरूप कानीं ऐकिजे ।
तें देखावया चित्त माझें । उतावीळ देवा ॥
देवें फेडूनियां सांकड । लोभें पुसलों जरी चाड ।
तरि हेचि एकी वाड । आर्ति जी मज ॥
तुझें विश्वरूप आघवें । माझिये दिठीसी गोचर होआवें ।
ऐशी थोर आस जीवें । बांधोनि आहे ॥

ज्ञा. ११. ८१–८८.

---

## ५१. ईश्वराचें अतींद्रियस्वरूप चर्मदृष्टीनें पाहणें शक्य नाहीं.

मग म्हणे उत्कंठे वोहट न पडे । अझुनी सुखाची सोय न सांपडे ।
परि दाविलें तें फुडें । नाकळेचि यया ॥
हें बोलोनि देव हांसिले । हांसोनि देखणिया म्हणितलें ।
आम्हीं विश्वरूप तरी दाविलें । परि देखसीच ना तूं ॥

---

१ अनुभवाची. २ नाहींसा होतो ३ निमित्तानें. ४ सोंगें ५ गारुडा. ६ संकोच ७ गोठी. ८ कळीपणा ९ मार्ग. १० खरोखर. ११ पहाण्यास तयार झालेल्यास.

यया बोला येरें विचक्षणें । ह्मणितलें हां जी कवणासी तें उणें ।
तुह्मी बकाकरवीं चांदिणें । चरवूं पहा मां ॥
हां हो उटोनियां आरिसा । आंधळिया दावूं बैसा ।
बहिरियापुढें हृषीकेशा । गाणीव करा ॥...॥
जें अतींद्रिय ह्मणोनि व्यवस्थिलें । केवळ ज्ञानदृष्टीचिया भागा फिटलें
तें तुह्मीं चर्मचक्षूपुढें सूदलें । मी कैसेनि देखें ॥

ज्ञा. ११. १५४-१५९.

---

## ५२. दिव्यदृष्टीनें ईश्वराचें स्वरूपदर्शन.

ह्मणोनि तो देवांचा रावो । ह्मणे पार्थातें तुज दिव्य दृष्टि देवों ।
जया विश्वरूपाचा ठावो । देखसी तूं ॥
ऐसीं श्रीमुखौनि अक्षरें । निघतांना जंव एकसरें ।
तंव अविद्येचें आंधारें । जावोंचि लागे ॥...॥
मग दिव्यचक्षु प्रकटला । तया ज्ञानदृष्टी फांटा फुटला ।
ययापरी दाविता जाहला । ऐश्वर्य आपुलें ॥..॥
एकसरें ऐश्वर्यतेजें पाहलें । तया चमत्काराचें एकार्णव जाहालें ।
चित्त समाजीं बुडोनि ठेलें । विस्मयाचिया ॥...॥
तेव्हां मनासी मनपण न स्फुरे । बुद्धि आपणपें न सांवरे ।
इंद्रियांचे रश्मी माघारे । हृदयवरी भरले ॥...॥
तैसा विस्मित पाहे कोडें । तंव पुढां होतें चतुर्भुज रूपडें ।
तेंचि नानारूप चहूंकडे । मांडोनि ठेलें ॥...॥
प्रथम स्वरूपसमाधान । पावोनि ठेला अर्जुन ।
सवेंचि उघडी लोचन । तंव विश्वरूप देखे ॥
इहींचि दोहीं डोळां । पाहावें विश्वरूपा सकळा
तो श्रीकृष्णें सोहळा । पुरविला ऐसा ॥

ज्ञा. ११. १७६-१९६.

---

१ बुद्धिवानानें. २ तर. ३ स्वच्छ पसून, घासून. ४ साक्षात्कारें ठरलें ५ ठेवलें.

## ५३. अर्जुनाचें अपराधक्षमापनस्तोत्र.

ह्मणोनि काय काय आतां । निवेदिजेल अनंता ।
मी राशि आहे समस्तां । अपराधांची ॥
या लागीं पुढां अथवा पाठीं । जियें राहाटलों बहुवें वोखटीं[1] ।
तियें मायेचियापरी पोटीं । सामावी प्रभो ॥
जी कोणी एकें वेळें । सरिता घेऊनि येति खडुळें[2] ।
तियें सामाविजेती सिंधुजळें । आन उपाय नाहीं ॥
तैसी प्रीती कां प्रमादें । देवेसीं मज विरुद्धें ।
बोलविलीं तियें मुकुंदें । उपसाहावीं जी ॥...॥
तरि आतां अप्रमेया । मज शरणागता आपुलिया ।
क्षमा कीजो जी यया । अपराधांसी ॥...॥
ऐसें अर्जुनें ह्मणितलें । मग पुढती दंडवत घातलें ।
तेथें सात्विकाचें आलें । भरतें तया ॥
मग ह्मणतसे प्रसीद प्रसीद । वाचा होतसे सद्गद[3] ।
काढीं जी अपराध-। समुद्रांनि ॥...॥
पुत्राचे अपराध । जरी जाहाले अगाध ।
तरी पितां साहे निर्द्वंद्वें[4] । तैसें साहिजो जी ॥
सख्याचें उद्धतें । सखा साहे निवांत ।
तैसें तुवां समस्त । साहिजो जी ॥

ज्ञा. ११. ५५१-५७४.

---

## ५४. अर्जुनाचें धसाळपण.

या अर्जुनाचिया बोला । विश्वरूपा विस्मयो जाहला ।
ह्मणे ऐसा नाहीं देखिला । धसाळ[6] कोणी ॥

---

१ वाईट २ गढूळ उदकें ३ सद्गदित. ४ द्वैतभास सोडून. ५ दांडगेपण
६ अविचारी.

कोण हे वस्तु पावला आहासी । तया लाभाचा तोष न घेसी ।
मा भेणें काय नेणों बोलसी । हेकडे[1] ऐसा ॥
आम्ही सावियाचि जैं प्रसन्न होणें । तैं आंगचिवरी म्हणे देणें ।
वांचोनि जीव असे वेंचणें । कवणासि गा ॥...॥
तें हें अपरां अपार । स्वरूप माझें परात्पर ।
एथूनि ते अवतार । कृष्णादिक ॥...॥
हें तुजवांचून अर्जुना । पूर्वीं श्रुत दृष्ट नाहीं आना ।
जें जोगें नव्हे साधना । म्हणोनियां ॥...॥
आजि ध्यानसंपत्तीलागीं । तूं एकचि आथिला जगीं ।
हें परम भाग्य आंगीं । विरंचीही[2] नाहीं ॥
म्हणोनि विश्वरूपलाभें श्लाघें[3] । एथिचें भय नेघें नेघ[4] ।
हें वांचूनि अन्य चांग । न मनीं कांहीं ॥
हां गा समुद्र अमृताचा भरला । आणि अवसांत[5] वरपडा[6] जाहला ।
मग कोणीही आथि वोसंडिला[7] । बुडिजेल म्हणोनि ॥
ना तरि सोनयाचा डोंगर । येसणा[8] न चले हा थोर ।
ऐसें म्हणोनि अव्हेर । करणें घडे ॥
दैवें चिंतामणी लहिजे । कीं हें ओझें म्हणोनि सांडिजे ।
कामधेनु दवडिजे । न पोसावे म्हणोनि ॥...॥
तैसें ऐश्वर्य हें महातेज । आजि हातां आलें आहे सहज ।
कीं एथ तुज गजबज[9] । होआवी कां ॥
परी नेणसीच गांवढिया[10] । काय कोपों आतां धनंजया ।
आंग सांडोनि छाया । आलिंगितोसि मा ॥
हें नव्हे जो मी साचें । एथ मन करूनियां कांचें ।
प्रेम धरिसी अवगणियेचें[11] । चतुर्भुज जें ॥...॥
हें रूप जरी घोर । विकृत आणि थोर ।
तरी कृतनिश्चयाचें घर । हेंचि करीं ॥

---

१ भ्याड, एककल्ली. २ ब्रह्मदेवास. ३ धन्यता, मान. ४ घेऊं नकोस. ५ अकस्मात्. ६ प्राप्त. ७ टाकून दिला. ८ एवढा. ९ भीति. १० अधीर. ११ सोंगाचे.

कृपण चित्तवृत्ति जैसी । रोंवोनि घाली ठेवयापासीं[1] ।
मग नुसधेन[2] देहेसीं । आपण असे ।
कां अजातपक्षिया जवळा । जीव ठेऊनि अविसाळां[3]
पक्षिणी अंतराळां[4]–। माजी जाय ॥
ना ना गाय चरे डोंगरीं । परि चित्त बांधलें वत्सें घरीं ।
तैसें प्रेम येथिचें करीं । स्थानपती ॥
येरें वरिचिलेनी चित्तें । बाह्य सख्य सुखापुरतें ।
भोगिजो का श्रीमूर्तीतें । चतुर्भुज ॥
परी पुढतपुढती पांडवा । हा एक बोल न विसरावा ।
जे इये रूपांहुनी सद्भावा । नेदावें निघों ॥
हें कहीं नव्हतेंचि देखिलें । म्हणोनि भय जें तुज उपजलें ।
तें सांडीं एथ संचलें । असो दे प्रेम ॥
आतां करूं तुजया सारिखें । ऐसें म्हणितलें विश्वतोमुखें ।
तरी मागील रूप सुखें । न्याहाळीं[5] पां तूं ॥

ज्ञा. ११. ६०९–६३९.

---

## ५५. विश्वरूपाचें पुन्हां कृष्णरूप.

ऐसें वाक्य बोलतखेंवो[6] । मागुता मनुष्य जाहला देवो ।
हें ना परि नवलावो । आवडीचा तिये ॥
श्रीकृष्णचि कैवल्य उघडें । वारि सर्वस्व विश्वरूपायेवढें ।
हातीं दिधलें कीं नावडे । अर्जुनासी ॥
वस्तु घेऊनि वाळिंजे[7] । जैसें रत्नासि दूषण ठाविजे ।
ना तरि कन्या पाहूनियां म्हणिजे । मना न ये हे ॥
तया विश्वरूपा येवढी दशा । करितां प्रीतीचा वाढ[8] कैसा ।
शेल दिधलीसे उपदेशा । किरीटीसि देवें ॥

---

१ द्रव्याच्या ठेव्याजवळ २ सडचा, एकटचा . ३ घरटयांत. ४ आकाशांत.
५ पहा. ६ बोलतांक्षणींच. ७ टाकावी ८ उत्तम वांटा.

मोडोनि भांगाराचा रवा[1] । लेणें घडिलें आपुलिया सवा[2] ।
मग नावडे जरी जीवा । तरी आटिजे पुढती ॥६४४॥
हो कां जें कृष्णाकृतींचिये मोडीं[3] । होती विश्वरूपपटाची घडी ।
ते अर्जुनाचिये आवडी । उकलुनि दाविली ॥६५१॥
तंव परमाणु वा रंग । तेणें देखिला साविया चांग ।
तथ ग्राहिकीये[4] नव्हेचि लागें[5] । म्हणोनि घडी केली पुढती ॥६५२॥
तैसें शिष्याचिये प्रीती जाहालें । कृष्णत्व होतें तें विश्वरूप जालें ।
तें मना नयेचि मग आणिलें । कृष्णपण मागुतें ॥६४५॥
हा ठाववरी शिष्याची निकसी[6] । साहाती गुरू आहाती कवणे देशीं ।
परी नेणिजे आवडी कैशी । संजय म्हणे ॥

ज्ञा. ११. ६४०–६४६.

---

## ५६. भक्त हेच योगयुक्त होत.

इया किरीटीचिया बोला । तो जगद्बंधु संतोषला ।
म्हणे हो प्रश्न भला । जाणसी करूं ॥...॥
का वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागे पांडुसुता ।
तैसी नीच[7]नवी भजतां । श्रद्धा दिसे ॥
परी ठाकलियाही[8] सागर । जैसा मागीलही यावा अनिवार ।
तिये गंगेचिये ऐसा पडिभर[9] । प्रेमभावा ॥
तैसें सर्वेंद्रियांसहित । मजमाजीं सूनि[10] चित्त ।
जे रात्रिदिवस न म्हणत । उपासिती ॥
इयापरी जे भक्त । आपणपें मज देत ।
तेचि मी योगयुक्त । परम मानीं ॥

ज्ञा १२. २४–३०.

---

१ लगड. २ इच्छेप्रमाणें. ३ डौलांत, वळणांत. ४ गिऱ्हाइकाचा. ५ संबंध. ६ किरकिर, जिकीर. ७ नित्यनवी. ८ प्राप्त झाल्यावरही. ९ भर. १० घालून.

## ५७. अव्यक्तोपासक हेही मलाच मिळतात.

आणि येर तेही पांडवा । जे आरूढोनि सोहंभावा ।
झोंबती निरवयवा । अक्षरासी ॥
मनाची नेखी[१] न लगे । जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे ।
इंद्रियां कीर जोगें । काय होईल ॥
परि ध्यानाही कुवाडें[२] । म्हणोनि एके ठायीं न सांपडे ।
व्यक्तीसी माजिवडें[३] । कवणेही नोहे ॥
जया सर्वत्र सर्वपणें । सर्वांही काळीं असणें ।
जें पावूनि चिंतवणें । हिंपुटी[४] जाहलें ॥
जें होय ना नोहे । जें नाहीं ना आहे ।
ऐसें म्हणोनि उपाये । अुपजतीचि ना ॥
जें चळे ना ढळे । सरे ना मैळे ।
तें आपुलेनीचि बळें । आंगविलें[५] जिहीं ॥...॥
ऐसे जे समबुद्धी । मिळावया सोहंसिद्धी ।
आंगवितांती निरवधी[६] । योगदुर्गें ॥
आपुलिया साटोवाटीं[७] । शून्य घेती उठाउठीं ।
तेही मातेंचि किरीटी । पावती गा ॥
वांचूनि योगाचेनि बळें । आधिक कांहीं मिळे ।
ऐसें नाहीं आगळें[८] । कष्टची तयां ॥

ज्ञा. १२. ४०–५९.

---

## ५८. ब्रह्मस्वरूपाची अखंडस्थिति.

जें एक आंत बाहेरी । जें एक जवळ दुरी ।
जें एक वांचूनि पैरी[९] । दुजी नाहीं ॥ ..॥

---

१ नखें. २ कठीण. ३ मध्यें. ४ कष्टी. ५ स्वाधीन करून घेतलें. ६ एकसारखे ७ मोबदल्यांत. ८ अधिक. ९ प्रकार.

स्वेदज[1]प्रभृती । वेगळाल्या भूतीं ।
जयाचिये अनुस्यूतीं[2] । खोमणें[3] नाहीं ॥...॥
बाल्यादि तिन्ही वयसीं । काया एकचि जैसी ।
तैसें आदिस्थितिग्रासीं । अखंड जें ॥
सायंप्रातर्माध्यान्ह । होतां जातां दिनमान ।
जैसें कां गगग । पालटेना ॥
अगा सृष्टीवेळे[4] प्रियोत्तमा । जया नाम म्हणती ब्रह्मा ।
स्थिती जें विष्णुनामा । पात्र जाहालें ।
मग आकार हा हारपे । तेव्हां रुद्र जें म्हणिपे ।
तें ही गुणत्रय जेव्हां लोपे । तैं जें शून्य ॥...॥
जें अग्नीचें दीपन । जें चंद्राचें जीवन ।
सूर्याचें नयन । देखिती जेणें ॥ . ॥
जें देखिलियाचिसवें । दृश्य द्रष्टा हें आघवें ।
एकवट कालवे । सामरस्यें ॥ ..॥
जैसें सरलिया लेखें[5] । आंख[6] होती एक ।
तैसें साध्यसाधनादिक । एकयासि ये ।

ज्ञा. १३. १३. ९१५–९३८.

## ५९. ब्रह्मस्वरूपाचें अनिर्वर्णनीयत्व.

आणि जाणितलेया वरौतें[7] । कांहीं करणें नाहीं जेथें ।
जाणणेंचि तन्मयातें । आणि जयाचें ॥
जें जाणितलेयासाठीं । संसार काढूनियां कांठीं[8] ।
जिरोनि जाइजे पोटीं । नित्यानंदाच्या ॥ ..॥
जें नाहीं म्हणों जाइजे । तंव विश्वाकारें देखिजे ।
आणि विश्वचि ऐसें म्हणिजे । तरि हे माया ॥...॥

१ घामापासून उत्पन्न झालेले. २ अखंडतेंत. ३ कमीपणा, न्यूनता. उप्तत्तीचें वेळेस. ५ हिशोब. ६ आंकडे. ७ वर. ८ कांठावर.

म्हणोनि आर्थी नाथीं हे बोली । जे देखोनि मुकी जाहली ।
विचाराची मोडली । वाट जेथें ॥
जैसी भांडघटशरावीं । तदाकार असे पृथ्वी ।
तैसें सर्व होऊनियां सर्वीं । असे जे वस्तु ॥...॥
तयातें याकारणें । विश्वबाहु ऐसें म्हणणें ।
जें सर्वांचि सर्वपणें । सर्वदा करी ॥
आणि समस्तांही ठायां । एके काळीं धनंजया ।
आलें असे म्हणोनि जया । विश्वांघ्रि[2] नाम ।
पैं सवितया आंग डोळे । नाहींत वेगळ वेगळे ।
तैसें सर्वद्रष्टें सकळें । स्वरूपें जें ॥
म्हणोनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षूच्या ठायीं पक्षु ।
बोलावया दक्षु । जाहला वेद ॥
जें सर्वांचें शिरावरी । जें नित्य नांदे सर्वांपरी ।
ऐसिये स्थितीवरी । विश्वमूर्धा म्हणिपे ॥
पैं गा मूर्ति तेंचि मुख । हुताशना जैसें देख ।
तैसें सर्वपणें अशेख । भोक्तें जें ॥
यालागीं जया पार्था । विश्वतोमुख हे व्यवस्था ।
आली वाक्पथा । श्रुतीचिया ॥...॥
वांचूनि हस्त नेत्र पाये । हे भाष तेथ कें आहे ।
सर्वशून्यत्वाचा सोहे । निष्कर्ष जें ॥...॥
तैसें साचाचि जें एक । तेथ कें व्याप्यव्यापक ।
परी बोलावया नावेकें । करावें लागे ॥
पैं शून्य जैं दावावें जाहालें । तैं बिंदुलें एक केलें ।
तैसें अद्वैत सांगात्रें बोलें । तैं द्वैत कीजे ॥
येरव्हीं तरी पार्था । गुरुशिष्यसत्पथा ।
आडळ पडे सर्वथा । बोल खुंटे ॥

ज्ञा. १३. ८६६–८८९.

---

१ डेरा, घागर, परळ, इत्यादिकांत २ ज्याचे पाय सर्वत्र आहेत असा ३ सार. ४ क्षणभर ५ वर्तुळ. ६ प्रतिबंध.

## ६०. चित्सूर्याचें अप्रतिम वर्णन.

मावळवीत विश्वाभास । नवल उदयला चंडांश ।
अद्वयाब्जिनीविकाश । वंदूं आतां ॥
जो अविद्याराती रुसोनियां । गिळी ज्ञानाज्ञानचांदणियां ।
जो सुदिन करी ज्ञानियां । स्वबोधाचा ॥
जेणें विवळतिये सवळे । लाहोनि आत्मज्ञानाचे डोळे ।
सांडिती देहाहंतेचीं अविसाळें । जीवपक्षी ।
लिंगदेहकमळाचा । पोटीं वेंचतया चिद्भ्रमराचा ।
बंदीमोक्ष जयाचा । उदेला होय ॥
शब्दाचिया आसकडीं । भेदनदीच्या दोहीं थडीं ।
आरडत विरहवेडीं । बुद्धिबोध ॥
तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें समाधान ।
भोगवी जो चिद्गगन-। भवनदिवा ॥
जेणें पाहालिये पाहांटे । भेदाची चोरळी फिटे ।
रिगती आत्मानुभववाटे । पांथिक योगी ॥
जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेखसूर्यकांत फुणगे ।
दीपले जाळिती दांगें । संसाराचीं ॥
जयाचा रश्मिपुंज निबेर । होतां स्वरूपंअुखरीं स्थिर ।
ये महासिद्धीचा पूर । मृगजळ तें ॥
जो प्रत्यग्बोधाचिया माथया । सोहंतेचा माध्यान्हीं आलिया ।
लपे आत्मभ्रांतिछाया । आपणपां तळीं ॥
ते वेळीं विश्वस्वप्नसहितें । कोण अन्यथामती निद्रेतें ।
सांभाळी नुरेचि जेथें । मायाराती ॥ ॥

१ उजाडण्याचा. २ वेळेला. ३ मिळून. ४ घरटीं. ५ क्षय, नाश. ६ अड-चणीच्या जागेंत. ७ तीरांवर. ८ चोखटा. ९ मार्गस्थ. १० ज्ञान ११ ठिणग्या टाकितो १२ प्रखर. १३ माळ जमिनीवर.

तो अहोरात्रांचा पैलकड[1] । कोणें देखावा ज्ञानमार्तंड ।
जो प्रकाश्येंवीण सुरवाड[2] । प्रकाशाचा ॥

ज्ञा. १६. १–१६.

---

# ३. नीतिविचार.

## ६१. इन्द्रियांचें बळकटपण.

जयातें अभ्यासाची घरटी[3] । यमनियमांची तोंटी[4] ।
जे मनातें सदा मुठी । धरूनि आहाती ॥
तही किंजती[5] कासाविसी । या इंद्रियांची प्रौढी[6] ऐसी ।
जैसी मंत्रज्ञातें विवली[7] । भुलवी का ॥
देखें विषय हे तैसे । पावती ऋद्धीसिद्धींचेनि मिषें ।
मग आकळिती स्पर्शें । इंद्रियांचेनी ॥
तिये संधी मन जाये । अभ्यासीं थोंटावलें[8] ठाये[9] ।
ऐसें बळकटपण आहे । इंद्रियांचें ॥

ज्ञा. २. ३११–३१४.

---

## अमानित्व.

तरी कवणेही विषयींचें । जीवा साम्य[10] होणें न रुचे ।
संभावितपणाचें । वोझें जया ॥
आथिलेचि[11] गुण वानितां । मान्यपणें मानितां ।
योग्यतेचें येतां । अंगा रूप ॥

---

१ पलीकडचें तीर. २ सुकाळ. ३ गस्त. ४ कुंपण. ५ केले जातात. ६ बळ. ७ हडळ. ८ निर्बल, कुंठित ९ राहतें. १० बरोबरी, सारखेपणा. ११ असलेले.

तैं गजबजो लागे कैसा । व्याधें रुंधलां[1] मृग जैसा ।
कां बाहीं[2] तरतां[3] वळसां[4] । दाटला[5] जेवीं ॥
पार्था तेणें पाडें । सन्मानें जो सांकडे[6] ।
गरिमे[7]तें अंगाकडे । येवोंचि नेदी ॥
पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ती कानीं नायकावी ।
हा अमुका ऐसी नोहावी । सोंचि[8] लोकां ॥
तेथ सत्काराची कें गोठी । कें आदरा देईल भेटी ।
मरणेंसी सांटी[9] । नमस्कारितां ॥
वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे ।
परि वेडिवेमाजी दडे । महिमेभेणें ॥
चातुर्य लपवी । महत्व हारवी ।
पिसेंपण मिरवी । आवडोनी ॥
लौकिकाचा उद्वेग[10] । शास्त्रांवरी उबग[10] ।
उगेपणीं चांग । आथी भर ॥
जगें अवज्ञाचि करावी । संबंधीं[11] सोयचि न धरावी ।
ऐसी ऐसी जीवीं । चाड बहु ॥
तळवटपण[12] बाणे । आंगीं हिणावो[13] खेवणें[14] ।
तें तेंचि करणें । बहुत करूनी ॥
हा जीत ना नोहे । लोक कल्पी येणें भावें ।
तैसें जिणें होआवें । ऐसी आशा ॥
पैल चालत कीं नोहे । कीं वारेनि जात आहे ।
जना ऐसा भ्रम जाय । तैसे होइजे ।
माझें असतेंपण लोपो । नामरूप हारपो ।
मज झणें वोसिपो[15] । भूतजात ॥
ऐसीं जयाचीं नवसिये[16] । जो नित्य एकांता जात जाये ।
नामेंचि जो जिये । विजनाचेनि ॥

१ अडवलेला. २ हातांनीं. ३ पोहत असतां. ४ भोंवऱ्यांत. ५ सापडला. ६ संकोचतो. ७ मोठेपणास. ८ आठवण. ९ मोबदला. १० कंटाळा ११ नातलगांनीं. १२ हीनपण १३ लहानपण. १४ भूषण, अलंकार. १५ भिवो. १६ नवस.

वायु आणि तया पडे । गगनेंसीं बोलों आवडे ।
जीवेंप्राणें झाडें । पढियंतीं जया ॥
किंबहुना ऐसीं । चिन्हें जया देखसी ।
जाण तया ज्ञानेंसी । शेज जाहाली ॥
पैं अमानित्व पुरुषीं । तें जाणवें इहीं मिषीं ।
आतां अदंभत्वाचिया ओळखीसी । सौरस देवों ॥
ज्ञा. १३. १८५-२०२.

## ६३. अखंड अगर्वता.

आदि ब्रह्मा करूनि । शेवटीं मशार्क धरूनि ।
माजि समस्त हें जाणोनि । स्वरूप माझें ॥
मग वाड धाकुटें न म्हणती । सजीव निर्जीव नेणती ।
देखिलिये वस्तु उंजू लुंठिती । मीचि म्हणोनि ॥
आपुलें उत्तमत्त्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे ।
एकसरें व्यक्तिमात्राचेनि नांवें । नमूंची आवडे ॥
जैसें उंचौंहूनि पडिलें । तें तळवटवरी ये उंगलें ।
तैसें नमिजे भूतजात देखिलें । ऐसा स्वाभावोचि तयांचा ॥
कां फळलिया तरूची शाखा । सहजें भूमीसी उतरे देखा ।
तैसें जीवमात्रां अशेखां । खोलावती ते ॥
अखंड अगर्वता होऊनि असती । तयांची विनय हेचि संपत्ती ।
जे जयजय मंत्रें अर्पिती । माझ्या ठायीं ॥
नमितां मानापमान गळाले । म्हणोनि अवचितां मीचि जाहाले ।
ऐसें निरंतर मिसळले । उपासिती ॥
ज्ञा. ९. २२१-२२७

---

१ पटते. २ शय्या. ३ अभिप्राय. ४ चिलिट. ५ मोठें. ६ सरळ. ७ दंडवत घालतात. ८ एकसारखें. ९ निमुटपणानें. १० नम्र होतात. ११ एकाएकीं सहज.

## ६४. अदंभित्व.

तरि अदंभित्व ऐसें । लोभियाचें मन जैसें ।
जीव जावो परी नुमसे[1] । ठेविला ठावो ॥
तया परी किरीटी । पडिलाही प्राणसंकटीं ।
परि सुकृत न प्रकटी । आंगें बोलें ॥
खडाणे[2] आला पान्हा । पळवी जेवि अर्जुना ।
कां लपवी पण्यांगना[3] । वडिलपण[4] ॥
आढ्य[5] आतुडे[6] अडवीं । मग आढ्यता जेविं हारवीं ।
नातरी कुळवधु लपवी । अवयवातें ॥
ना ना कृषीवळें[7] आपुलें । पांघुरवीं पेरिलें
तैसे झांकीं निपजलें । दानपुण्य ॥
वरिवरि देहो न पूजी । लोकांते न रंजी[8] ।
स्वधर्म वाग्ध्वजीं । बांधों नेणें ॥...॥
शरीरभोगाकडे । पाहतां कृपण आवडे ।
येऱ्हवीं धर्मविषयीं थोडें । बहु न म्हणे ॥
घरीं दिसे सांकड । देहींचीं आयती[9] रोड ।
परि दानीं जया होडें[10] । सुरतरूसीं[11] ॥
किंबहुना स्वधर्मी थोर । अवसरीं उदार ।
आत्मचर्चे चतुर । येऱ्हवीं वेडा ॥
केळीचें दुळवाडें[12] । हळु पोकळ आवडे ।
परि फळोनियां गाढें । रसाळ जैसें ॥
कां मेघाचें आंग झीलें[13] । दिसे वारेनि जैसें जाईल ।
परि वर्षती नवल । घणवट तें ॥...॥
हें असो या चिन्हांचा । नटनोचि[14] ठायीं जयाच्या ।
जाण ज्ञान तयाच्या । हातां चढलें ॥

---

१ उघडा करीत नाहीं. २ लाथरी गाय. ३ वेश्या. ४ श्रीमान्, धनिक ५ सांपडे. ६ अरण्यांत. ७ शेतकरी. ८ खुशामत करीत नाहीं. ९ सामग्री. १० पैज. ११ कल्पवृक्षाबरोबर. १२ स्वरूप. १३ हलकें. १४ उत्कर्ष.

पैं गा अदंभपण । म्हणितलें तें हें जाण ।
आतां आईक खुण । अहिंसेची ॥

ज्ञा. १३. २०३–२१७.

---

## ६५. अहिंसा.

आणि स्वमताचिया निर्धारा । लागोनियां धनुर्धरा ।
प्राप्ता मतांतरा । निर्वेच[1] कीजे ॥
ऐसी हे अवधारी । निरूपिती परी ।
आतां ययावरी । मुख्य जें गा ॥
तें स्वमत बोलिजेल । अहिंसे रूप कीजेल ।
जिया उठलियां आंतुल । ज्ञान दिसे ॥ ---
तरि तरंग नोलांडित । लहरी[2] पायें न फोडित ।
सांचलु[3] न मोडित । पाणियाचा ॥
वेगे आणि लेसा । दिठी घालूनि आंविसा ।
जळीं बक जैसा । पाउल सुये[6] ॥
कां कमळावरि भ्रमर । पाय ठेविती हळुवार ।
कुचंबेल केशर । इया शंका ॥
तैसे परमाणु पांगुतेले । जाणूनि जीव सानुले ।
तेथ कारुण्यामाजि पाउलें । लपवूनि चाले ॥
ते वाट कृपेची करित । ते दिशाचि स्नेह भरित ।
जीवांतळीं आंथरित । आपुला जीव ॥...॥
पैं मोहाचेनि सांगडें । लांसी पिलीं धरी तोंडें ।
तेथ दांतांचे आगरडे[12] । लागती जैसे ॥...॥

---

१ चर्चा. २ लाट. ३ स्थिरपणा. ४ हळू, मर्यादेचा. ५ आमिष. ६ घालतो, ठेवतो. ७ सूक्ष्मरीतीनें. मऊपणानें. ८ चुरडेल. ९ आच्छावले गेलेले. १० अतिशय लहान. ११ योगें. १२ मांजरी. १३ अग्रें.

तैसेनि मार्दवें पाय । भूमीवरी न्यसीतें जाय ।
लागती तेथ होय । जीवां सुख ।

ज्ञा. १३. २४१–२५५.

किंबहुना ऐसी । दिठी जयाची भूतांसीं ।
करही देखसी । तैसेचि ते ॥
तरि होऊनियां कृतार्थ । राहिले सिद्धांचे मनोरथ ।
तैसे जयाचे हात । निर्व्यापार ॥
अक्षमें आणि संन्यासिलें । कां निरिंधन आणि विझालें ।
मुकेनि घेतलें । मौन जैसें ॥
तयापरी कांहीं । जयां करां करणें नाहीं ।
जे अकर्तयाच्या ठाईं । बैसों येती ॥
आसुंडेल[2] वारा । नख लागेल अंबरा ।
ह्या बुद्धि करां । चळों नेदी ॥
तेथ आंगावरिलीं उडवावीं । कां डोळां रिगतें झाडावीं ।
पशुपक्ष्यां दावावीं । त्रासमुद्रा ॥
इया केउतिया गोठी । नावडे दंड काठी ।
मग शस्त्राचें किरीटी । बोलणें कें ॥
लीलाकमळें खेळणें । कां पुष्पमाळा झेलणें ।
न करी म्हणे गोफणें । ऐसें होईल ॥
हालवतील रोमावळी । यालागीं आंग न कुरवाळी ।
नखांची गुंडाळीं । बोटांवरी ॥
तंव करणें याचाचि अभाव । परि ऐसाही पडे डाव ।
तरि हातां हाचि सरावें[3] । जे जोडिजती ॥
कां नाभिकारा उचलिजे । हात पडिलियां देइजे ।
ना तरि आर्तातें स्पर्शिजे । अळुमाळ[4] ॥

१ ठेवीत. २ हिसडेल, झटका बसेल. ३ संवय. ४ हळंच.

हेंही उपरोधें करणें । तरी आर्तभय हरणें ।
नेणती चंद्रकिरणें । जिव्हाळा तो ॥
पावोनि तो स्पर्शु । मलयानिळ खरपुसु[1] ।
येणें मानें पशु । कुरवाळणें ॥

ज्ञा १३. २७८--२९०.

आणि तयाचि परि किरीटी । थाउ[2] जयाचिया दिठी ।
सांडिलिया भ्रुकुटी । मोकाळिया ॥
कां जे भूतीं वस्तु आहे । तिये रूपों शके विपायें ।
म्हणोनि वास न पाहे । बहुतकरूनि ॥
ऐसाही कोणें एकें वेळें । भीतरले कृपेचेंनि बळें ।
उघडोनि डोळे । दृष्टि घाली ॥
तरि चंद्रबिंबौनि धारा । निगतां नव्हती गोचरा ।
परि एकसरें चकोरां । निघती दोंदें ।

ज्ञा. १३. २७३–२७६.

ऐसी जयाची चाली[5] । कृपाफळीं फळा आली ।
देखसी जियाली[6] । दया वाचे ॥
स्वयें श्वसणेंचि तें सुकुमार । मुख मोहाचें माहेर ।
माधुर्या जाहले अंकुर । दशन तैसे ॥
पुढां स्नेह पाझरे । माघां चालती अक्षरें ।
शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥
तंव बोलणेंचि नाहीं । बोलें म्हणे जरी कांहीं ।
तरि बोल कोणाही । खुपेल कां ॥
बोलतां अधिकही निघे । तरि कोणाचिया वर्मी न लगे ।
आणि कोणासी न रिघे । शंका मनीं ॥

---

१ नाइलाजास्तव. २ तीव्र, कठीण. ३ सुप्रसन्नता, निर्मळपणा.
४ कदाचित्. ५ चालण्याची रीत. ६ जगली.

मांडिली गोठी हन मोडेल। वासिपेलें[1] कोणी उडेल।
आइकोनि वोवांडिलें[2]। कोण्ही जरी॥
तरि दुवाळी[3] कोणा नोहावी। भंवई कवणाची नुचलावी।
ऐसा भाव जीवीं। म्हणोनियां॥
मग प्रार्थिला विपायें। जरि लोभें बोलों जाये।
तरि परिसतया[4] होये। मायबाप॥
कां नादब्रह्मचि मुसें[5] आलें। कीं गंगापय असळलें[6]।
पतिव्रते आलें। वार्धक्य जैसें॥
तैसें साच आणि मवाळ[7]। मितलें[8] आणि रसाळ।
शब्द जैसे कल्लोळ। अमृताचे॥
विरोधवादबळु[9]। प्राणितापढाळु[10]।
उपहास[11] छळु। वर्मस्पर्श[12]॥
आडु[13] वेगु[14] विंदाण[15]। आशा शंका[16] प्रतारण[17]।
हे संन्यासिले अवगुण। जया वाचा॥

ज्ञा. १३. २६१-२७२.

---

आतां मन तयाचें। सांगों म्हणों साचें।
तरी सांगितलें कोणाचे। विलास हे॥
काई शाखा नव्हे तरू। जळेंवीण असे सागरु।
तेज आणि तेजाकारु[18]। आन काई॥
अवयव आणि शरीर। हे वेगळाले काय कीर[19]।
कीं रस आणि नीर। सिनानीं[20] आथी॥
म्हणोनि हे जे सर्व। सांगितले बाह्यभाव।
तें मनचि सावयव। ऐसें जाण॥

---

१ भिईल. २ उपेक्षा करील. ३ क्लेश. ४ ऐकणाऱ्याला. ५ आकारले. ६ उसळले. ७ मृदु. ८ मोजके. ९ विरुद्धवादाचें बळ. १० प्राण्यांस कासाविस करणें. ११ निंदा. १२ मर्मी लागणें, झोंबणें. १३ कठिण वाक्य. १४ जोरानें बोलणें. १५ कपट, दगलबाजी. १६ संशय. १७ फसवणूक, ठकबाजी. १८ सूर्य. १९ खरोखर. २० वेगळाले.

जें भुईं बीज खोंविलें । तेंचि वरी रुख जाहालें ।
तैसें इंद्रियद्वारां फांकलें । तें अंतरचि कीं ॥
पैं मानसींचि जरी । अहिंसेची अवसरी ।
तरि कैंचि बाहेरी । वोसंडेल ॥
आवडे ते वृत्ती किरीटी । आधीं मनौनीचि उठी ।
मग ते वाचे दिठी । करांसि ये ॥
वांचूनि मनींचि नाहीं । तें वाचेसी उमटेल काई ।
बीजेंविण भुईं । अंकुर असे ॥
म्हणोनि मनपण जैं मोडे । तैं इंद्रिय आधींचि उबडे
सूत्रधारेंविण साइखडें । वावो जैसें ॥
उगमींचि वाळूनि जाये । तें वोघीं कैचें वाहे ।
जीवो गेलीया आहे । चेष्टा देहीं ॥
तैसें मन हें पांडवा । मूळ इंद्रियभावा ।
हेंचि राहटे आघवां । द्वारीं इहीं ॥
परि जिये वेळीं जैसें । जें होऊनि आंत असे
बाहेरि ये तैसें । व्यापाररूपें ॥
या लागीं साचोकारें । मनीं अहिंसा थावे थोरें ।
जैसी पिकली द्रुती आदरें । बोभात निघे ॥
म्हणोनि इंद्रियें तेचि संपदा । वेंचितां हीं उदावादा ।
अहिंसेचा धंदा । करितें आहाती ॥
समुद्रीं दाटे भरितें । तैं समुद्रचि भरी तरियांतें ।
तैसें स्वसंपत्ती चित्तें । इंद्रियां केलें ॥
हें बहु असो पंडित । धरूनि बाळाचा हात ।
वोळी लिही सुव्यक्त । आपणचि ॥
तैसें दयाळुत्व आपुलें । मनें हातापायां आणिलें ।
मग तेथ उपजविलें । अहिंसेतें ॥

---

१ समाप्ति, अभाव. २ पाहिजे ती. ३ कोणचीही. ४ पालथें पडतें. ५ कळसूत्री बाहुली. ६ स्थिरावे, बळकट होते. ७ सुवास. ८ पूर्णपणें, उघडउघड. ९ खाड्यांना.

याकारणें किरीटी । इंद्रियांचिया गोठी ।
मनाचियेचि रहाटी । रूप केलें ॥
ऐसा मनें देहें वाचा । सर्व संन्यास दंडाचा ।
जाहाला ठायीं जयाचा । देखशील ॥
तो जाण वेल्हाळ । ज्ञानाचें वेळाउळ ।
हें असो निखिळ । ज्ञानचि तो ॥
जे अहिंसा कानें ऐकिजे । ग्रंथाधारें निरूपिजे ।
ते पाहावी ऐसें जैं उपजे । तैं तोचि पाहावा ॥

ज्ञा. १३. २९३–३१२.

---

## ६६. शांति

त्रिविधें मुख्य आघवे । उपद्रवांचे मेळावे ।
वरि पडिलिया नव्हे । वांकडा जो ॥...॥
उन्हाळेनि जो न तापे । हिमवंतीं न कांपे
कायिसेनही नें वासिपे । पातलेया ॥...॥
ना ना चराचरीं भूतीं । दाटणीं नव्हे क्षितीं ।
तैसा नाना द्वंद्वप्राप्तीं । घामेजेना ॥
घेऊनि जळाचे लोट । आलिया नदीनदांचे संघाट ।
करी वाड पोट । समुद्र जेवीं ॥
तैसें जयाचिया ठायीं । न साहणें कांहींचिना हीं ।
आणि साहतसें ऐसेंही । स्मरण नुरे ॥

ज्ञा. १३. ३४४–३५१.

---

१ सुंदर, विस्तृत. २ घर ३ आदिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक ४ समुदाय. ५ भीत नाहीं. ६ श्रम पावत नाही. ७ समुदाय.

## ६७. आर्जव.

कां तोंड पाहुनी प्रकाशु। न करी जेविं चंडांशु।
जगा एक अवकाशु। आकाश जैसें ॥
तैसें जयाचें मन। माणुसाप्रति आन आन।
नोहे आणि वर्तन। ऐसें पैं तें ॥
जे जगचि सनोळखे[1]। जगेंसीं जुनाट सोयरिक।
आपपर हे भाखे[2]। जाणणें नाहीं ॥...॥
फांकलिया इंदीवरां[3]। परिर्वार नाहीं धनुर्धरा।
तैसा कोनु[4] कांपरा। नेणेचि जो ॥...॥
अमृताची धार। तैसें उजू अंतर।
किंबहुना जो माहेर। या चिन्हांचें ॥

ज्ञा. १३. ३५६–३६७

---

## ६८. आचार्योपासन.

आतां ययावरी। गुरुभक्तीची परी।
सांगों गा अवधारीं। चतुरनाथा ॥...॥
तरि सकळजळसमृद्धि। घेऊन गंगा निघाली उदधी।
कीं श्रुति हे महापदीं[5]। पैठी[6] जाहाली ॥...॥
तैसें सबाह्य आपुलें। जेणें गुरुकुळीं वोपिलें[7]।
आपणपें केलें। भक्तीचें घर ॥
गुरुगृह जिये देशीं। तो देशचि वसे मानसीं।
विरहिणी कां जैशी। वल्लभातें ॥...॥
म्हणे कैं हें बिरडें[8] फिटेल। कैं तो स्वामी भेटेल।
युगाहुनी वडिल। निमिष मानी ॥

---

१ ओळखीचें. २ भाषा, बोलणें. ३ कमळाला. ४ गुप्तपणा, मुकुलितभाव ५ ब्रह्मपदीं ६ प्रविष्ट. ७ दिलें. ८ पेंडें.

ऐसेया गुरुग्रामींचें आलें । कां स्वयें गुरूनींचि धाडिलें ।
परि गतायुष्या जोडलें । आयुष्य जैसें ॥...॥
ना तरि रंकें[1] निधान देखिलें । कां आंधळिया डोळे उघडले ।
भणंगाचिया[2] आंगा आलें । इंद्रपद ॥
तैसा गुरुकुळींचेनि नांवें । महासुखें अति थोरावे ।
जें कोडें हन पोटाळावे । आकाश कां ॥
पैं गुरुकुळीं ऐसी । आवडी जया देखसी ।
जाण ज्ञान तयापासीं । पाइकी[3] करी ॥

ज्ञा. १३. ३६९–३८४

आणि आभ्यंतरिलियेकडे[4] । प्रेमाचेनि पवाडें ।
श्रीगुरुचें रूपडें । उपासी ध्यानीं ॥
हृदयशुद्धीचिया आवारीं[5] । आराध्य तो निश्चळ धुरे[6] करी ।
मग सर्वभावेंसीं परिवारी । आपण होय ॥
कां चैतन्याचिये पोवळी–[7] । माजि आनंदाचिया राउळीं ।
श्रीगुरुलिंगा ढाळी[8] । ध्यानामृत ॥
उदयाजितां बोधार्का । बुद्धीची डाळ[9] सात्त्विकां[10] ।
भरोनियां त्र्यंबका । लाखोली वाहे ॥
काळशुद्धि त्रिकाळीं । जीवदशा धूप जाळी ।
ज्ञानदीपें वोंवाळी । निरंतर ॥
सामरस्याची रससोय[11] । अखंड अर्पित जाय ।
आपण भराडा[12] होय । गुरु तो लिंग[13] ॥

ज्ञा. १३. ३८५–३९०

एकाधिये वेळे । गुरु माय करी भावबळें ।
मग स्तन्यसुखें लोळे । अंकावरी ॥

१ दरिद्री. २ भिकारी. ३ चाकरी. ४ अं[illegible]बाजूस. ५ आवारांत, कुसुवांत. ६ श्रेष्ठ, मोठा. ७ आवारांत. ८ घालतो. [illegible] परडी, डाळ. १० अष्टसात्त्विक भावांनीं. ११ अन्न, स्वयंपाक. १२ पूजारी. १३ [illegible]

ना तरी गा किरीटी । चैतन्यतरुतळवटीं ।
गुरु धेनु आपण पोटीं । वत्स होय ॥
गुरुकृपास्नेहसलिलीं । आपण होय मासोळी ।
कोणे एके वेळीं । हेंचि भावी ॥
गुरुकृपामृताचें वडप[1] । आपण सेवावृत्तीचें होय रोप ।
ऐसैसे संकल्प । मनाचि विये ॥
चक्षुपक्षेंवीण । पिलूं होय आपण ।
कैसें पैं अपारपण । आवडीचें ॥
गुरूतें पक्षिणी करी । चारा घे चांचूवरी ।
गुरु तारूं[2] धरी । आपण कांस ॥
ऐसे प्रेमाचेनि थावें[3] । ध्यानचि ध्यानातें प्रसवे ।
पूर्णसिंधू हेलावें[4] । फुटती जैसे ॥
किंबहुना यापरी । श्रीगुरुमूर्ती अंतरीं ।
भोगी आतां अवधारीं । बाह्यसेवा ॥

ज्ञा. १३. ३९६--४०३.

तरि जिवीं ऐसे आवांके[5] । म्हणे दास्य करीन निकें ।
जैसनि गुरु कौतुकें । माग ह्मणती ॥
तैसिया साचा उपास्ती । गोसावी प्रसन्न होती ।
तेथ मी विनंती । ऐसी करीन ॥
म्हणेन तुमचा देवा । परिवार जो आघवा ।
येतुलें रूपें होआवा । मीचि एक ॥
आणि उपकरतीं आपुलीं । उपकरणें आथि जेतुलीं ।
माझीं रूपें ततुलीं । होआवीं स्वामी ॥
ऐसा मागेन वरु । तेथ हो ह्मणती श्रीगुरु ।
मग तो परिवारु । मीच होईन ॥

ज्ञा. १३. ४०४--४०८

१ वृष्टि. २ तारणारा. ३ बळानें. ४ तरंग, लाटा. ५ अवसाण बाळगतो.

जंव देह हें असेल । तंव वोळंगी ऐसी कीजेल ।
मग देहांतीं नवल । बुद्धि आहे ॥
इये शरीरींची माती । मेळवीन तिये क्षिती ।
जेथ श्रीचरण उभे ठाती । श्रीगुरुचे ॥
माझा स्वामी कवतिकें । स्पर्शत जियें उदकें ।
तेथ लया नेईल निकें । आपीं आप ॥
श्रीगुरु वोंवाळिजती । कां भुवनीं जे उजळिजती ।
तया दीपांचिया दीप्तीं । ठवीन तेज ॥
चवरी हन विंजणा । तेथ लय करीन प्राणा ।
मग अंगाचा वोळगणा । होईन मी ॥
जिये जिये अवकाशीं । श्रीगुरु असती परिवारेंसी ।
आकाश लया आकाशीं । नेईन तिये ॥

ज्ञा. १३. ४३१–४३६.

एखादिया वेळां । श्रीगुरुचिया खेळा ।
लोंण करी सकळां । जीविताचें ॥
जो गुरुदास्यें कृश । गुरुप्रेमें सपोष ।
जो गुरुआज्ञे निवास । आपणची ॥
जो गुरुकुळें सुकुलीन । जो गुरुबंधुसौजन्यें सुजन ।
जो गुरुसेवाव्यसनें सव्यसन । निरंतर ॥
गुरुसंप्रदायधर्म । तेचि जयाचे वर्णाश्रम ।
गुरुपरिचर्या नित्यकर्म । जयाचें गा ॥
गुरु क्षेत्र गुरु देवता । गुरु माता गुरु पिता ।
जो गुरुसेवेपरता । मार्ग नेणे ॥
श्रीगुरुचें द्वार । तें जयाचें सर्वस्व सार ।
गुरुसेवकां सहोदर- । प्रेमें भजे ॥

---

१ सेवा. २ पंखा. ३ सेवक. ४ ओवाळणी. ५ पुष्ट.

जयाचें वक्त्र । वाहे गुरुनामाचें मंत्र ।
गुरुवाक्यावांचूनि शास्त्र । हातीं न शिवे ॥
शिवतलें गुरुचरणीं । भलतेसें हो पाणी ।
तेथ सकळ तीर्थें आणी । त्रैलोक्यींचीं ॥
श्रीगुरुचें उशिटें । लाहे जैं अवचटें ॥
तैं तेणें लाभें विटे । समधीसी ॥
कैवल्यसुखासाठीं । परमाणु घे किरीटी
उधळती पायापाठीं । चालतां जे ॥
हें असो सांगावें किती । नाहीं पार गुरुभक्ती ।
परी गा उत्क्रांतमति[1] । कारण हें ॥
जया इये भक्तीची चाड । जया इये विषयींचें कोड ।
जा हे सेवेवांचून गोड । न मनीं कांहीं ॥
तो तत्वज्ञानाचा ठावो । ज्ञाना तेणेंचि आवो[2] ।
हें असो तो देवो । ज्ञान भक्त ॥
हें जाण पां साचोकारें । तेथ ज्ञान उघडोनि द्वारें ।
नांदत असे गा पुरें । इया रीती ॥
जिये गुरुसेवेविखीं । माझा जीव अभिलाखीं ।
म्हणोनि सोयचुकीं[3] । बोली केली ॥
येऱ्हवीं असतां हातीं खुळा[4] । भजनावधानीं आंधळा ।
परिचर्येलागीं पांगुळा —। पासूनि मंद ॥
गुरुवर्णनीं मुका । आळशी पोशिजे फुका ।
परि मनीं आथीं निको[5] । सानुराग[6] ॥
तेणें पैं कारणें । हें स्थूल पोसणें ।
पडलें मज म्हणे । ज्ञानदेवो ॥

ज्ञा. १३. ४४२—४५९.

---

१ व्यापकबुद्धीचा, ज्ञाता. २ डौल, शोभा. ३ मार्ग सोडून. ४ लुला, थोटा. ५ चांगले, खरें. ६ अनुरागयुक्त.

## ६९. शुचित्व.

म्हणे शुचित्व गा ऐसें । जयापाशीं दिसे ।
आंग मन जैसें । कापुराचें ॥
कां रत्नाचें दळवाडें । जैसें सबाह्य चोखडें ।
आंत बाहेरीं एकें पाडें । सूर्य जैसा ।
बाहेरीं कर्मे क्षाळेला । भीतरीं ज्ञानें उजळला ।
इहीं दोहीं परीं आला । पाखाळा एका ॥...॥
येऱ्हवीं तरी पांडुसुता । अंतर शुद्ध नसतां ।
बाहेरी कर्म तो सर्वथा । विटंबु गा ॥
मृत जैसा शृंगारला । गाढव तीर्थी न्हाणिला ।
कडु दुधिया माखिला । गुळें जैसा ॥
वोसगृहीं तोरण बांधिलें । कां उपवासी अन्नें लिंपलें ।
कुंकुमसेंदुर केलें । कांतहीनेनें ॥
कलश ढिमांचे पोकळ । जळो वरील ते झळाळ ।
काय करूं चित्रींव फळ । आंत शेण ॥
तैसें कर्मी वरिचिलेकडा । न सरे थोर मोलें कुडा ।
नव्हे मदिरेचा घडा । पवित्र गंगे ॥
म्हणोनि अंतरीं ज्ञान व्हावें । मग बाह्य लाभे स्वभावें ।
वरि ज्ञान कर्मे संभवे । ऐसें कें जोडे ॥
यालागीं बाह्यभाग । कर्मे धुतला चांग ।
ज्ञानें फिटला वंग । अंतरींचा ॥
तेथ अंतर्बाह्य गेलें । निर्मळत्व एक जाहालें ।
किंबहुना उरलें । शुचित्वचि ।
म्हणोनि सद्भाव जीवगत । बाहेरी दिसती फांकत ।
स्फटिकगृहींचे डोलत । दीप जैसे ॥...॥

---

१ स्वरूप. २ शुद्ध. ३ धुतला, शुद्ध झाला ४ शुद्धतेला ५ लिंपला. ६ शून्यघरीं. ७ मुलाम्याचे. ८ वाईट. ९ कलंक.

येऱ्हवीं इंद्रियांचेनि मेळें । विषयांवरी तरी लोळे ।
परि विकाराचेनि विटाळें । लिंपिजेना ॥
भेटलेया वाटेवरी । चोखी आणि महारी ।
तेथ नातळे तियापरी । राहाटों जाणे ॥
कां पतिपुत्रातें आलिंगी । एकचि ते तरुणांगी ।
तेथ पुत्रभावाच्या आंगीं । न रिगे काम ॥...॥
पाणियें हिरा न भिजे । आधाणीं हरळ न शिजे ॥
तैसी विकल्पजातें न लिंपिजे । मनोवृत्ती ॥
तया नांव शुचित्वपण । पार्था गा संपूर्ण ।
हें देखसी तेथ जाण । ज्ञान असे ॥

ज्ञा. १३. ४६२--४८४.

## ७०. स्थैर्य.

आणि स्थिरता साचें । घर रिगाली जयाचें ।
तो पुरुष ज्ञानाचें । आयुष्य गा ॥
देह तरि वरिचिलीकडे । आपुलियापरी हिंडे ।
परि बैसका न मोडे । मानसींची ॥...॥
कां लोभियां दूर जाये । परि जीव ठेविलाचि ठाये ।
तैसा देह चालतां न होये । चळ चित्ता ॥
जातया अभ्रासवें । जैसें आकाश न धांवे ।
भ्रमणचक्रीं न भंवे । ध्रुव जैसा ॥
पांथिकांचिया येरझारां । सवें पंथ न चले धनुर्धरा ।
कां नाहीं जेविं तरुवरां । येणें जाणें ॥
तैसा चळणवळणात्मकीं । असोनि ये पांचभौतिकीं ।
भूतोर्मी एकी । चळिजेना ॥

---

१ मनानेंही स्पर्शित नाहीं. २ वरच्या बाजूनें. ३ खेपा.

वाहुटोळीचेनि बळें । पृथ्वी जैसी न ढळे ।
तैसा उपद्रवउमाळें । न लोटे जो ॥
दैन्यदुःखीं न तपे । भयशोकीं न कंपे ।
देहमृत्यु ने वासिपे । पातलेनी ॥
आर्तिआशापडिभरें । वयव्याधीगजरें ।
उजू असतां पाठिमोरें । नव्हे चित्त ॥
निंदा निस्तेज दंडी । काम लोभा वरपडी ।
परि रोम नव्हे वांकुडी । मानसाची ॥
आकाश हें वोसरो । पृथ्वी वरि विरो ।
परि नेणे मोहरों । चित्तवृत्ति ॥
हातीं हाला फुलीं । पासवणा जेविं न घाली ।
तैसा न लोटे दुर्वाक्यशेलीं । शोलिलांसांता ॥...॥
तैशा आल्या गेल्या ऊर्मी । नव्हे गजवज मनोधर्मीं ।
किंबहुना धीरु क्षमी । कल्पांतींही ॥

ज्ञा. १३. ४८५–४९९.

## ७१. आत्मविनिग्रह.

आणि ईसाळु जैसा घेरा । कां दंडियें हातियेरा ।
न विसंबे भांडारा । लुब्धक जैसा ॥
कां एकलौतियां बाळका–। वरि पडौनि ठाके अंबिका ।
मधुविषयीं मधुमक्षिका । लोभिणी जैसी ॥
अर्जुना जो या परी । अंतःकरण जतन करी ।
नेदी उभें ठाकों द्वारीं । इंद्रियांच्या ॥

१ उसळीनें. २ भीत नाहीं. ३ भरानें. ४ गर्जनेनें. ५ अपमान. ६ सांपडला. ७ तूटून पडो. ८ हत्ती. ९ मारलें असतां. १० मागें हटणें. ११ दुर्वाक्यरूपी शल्यानें. १२ छळलें असतां. १३ लहरी. १४ भूत, पिशाच्च. १५ झाडाला. १६ योद्धी. १७ लोभी. १८ एकट्या.

म्हणे काम बागुल[1] एकेल । हे आशा सियारी देखेल ।
तरि जीवां टेंकेल । म्हणोनि बिहे[2] ॥
बाहेरी धीट[3] जैसी । दांडुगा[4] पति कोंडासी[5] ।
करी टेहणी[6] तैसी । प्रवृत्तीसीं ॥...॥
मनाचिया महाद्वारीं । प्रत्याहाराचिया ठाणांतरीं[7] ।
जो शम दम शरीरीं । जागवी उभे ॥
आधारीं नाभीं कंठीं । बंधत्रयाची घरटी[8] ।
चंद्रसूर्यसंपुटीं । सुये चित्त ॥
समाधीचे शेजेपासीं । बांधोनि घाली ध्यानासी ।
चित्त चैतन्य समरसीं । आंतु रते ॥
अगा अंतःकरणनिग्रहो जो । तो हा हें जाणिजो ।
हा आथी तेथ विजयो । ज्ञानाचा पैं ॥
जयाची आज्ञा आपण । शिरीं वाहे अंतःकरण ।
मनुष्याकारें जाण । ज्ञानचि तो ॥

ज्ञा. १३. ५०२--५१२

## ७२. वैराग्य.

आणि विषयांविखीं । वैराग्याची निकी[9] ।
पुरवणी[10] मानसी कीं । जिती[11] आथी ॥
वमिलिया अन्ना । लाळ न घोटीं जेवि रसना ।
कां आंग न सूये आलिंगना । प्रेताचिया ॥
विष खाणें नागवे[12] । जळत घरीं न रिगवे ।
व्याघ्रविवरां[13] न वचवे । वस्ती जेवीं ॥
धडाडीत[14] लोहरसीं । उडी न घालवे जैसी ।
न करवे उशी । अजगराची ॥

१ डांकीण. २ भितो. ३ व्यभिचारिणी. ४ दांडगा. ५ बांधून ठेवितो. ६ देखरेख. ७ चौकीवर. ८ गस्त. ९ चांगली. १० साठा, मदत. ११ जिवंत. १२ आवडत नाही. १३ वाघाच्या गुहेंत. १४ तापलेल्या.

अर्जुना तेणें पाडें । जयासीं विषयवार्ता नावडे ।
नेदी इंद्रियांचेनि तोंडें । कांहींचि जावों ॥
जयाचे मनीं आलस्य । देहीं अतिकार्श्य ।
शमदमीं सौरस्य[1] । जयासि गा ॥
तपोव्रतांचा मेळावा । जयाचे ठायीं पांडवा ।
युगांत जया गांवा- । आंत येता ॥
बहु योगाभ्यासीं हांव । विजनाकडे[2] धांव ।
न साहे जो नांव । संघातांचें[3] ॥
नाराचांचीं[4] आंथुरणें । पूयपंकीं लोळणें ।
तैसें लेखी भोगणें । ऐहिकीचें ॥
आणि स्वर्गातें मानसें । ऐकोनि मानी[5] ऐसें ।
कुहिलें[6] पिशितें[7] जैसें । श्वानाचें कां ॥
तें हें विषयवैराग्य । आत्मलाभाचें भाग्य ।
येणें ब्रह्मानंदा योग्य । होती जीव ॥
ऐसा उभयलोकीं त्रास । देखसी जेथ बहुवस ।
जाण तेथें रहिवास । ज्ञानाचा तूं ॥

ज्ञा. १३. ५१३–५२४

---

## ७३. अनहंकार.

आणि सर्वाङाचिये परी[8] । इष्टापूर्तें करी ।
परी केलेंपण शरीरीं । वसों नेदी ॥
वर्णाश्रमपोषकें । कर्में नित्यनैमित्तिकें ।
तयामाजीं कांहीं न ठके । आचरतां ॥
परि हें मियां केलें । कीं हें माझेनि सिद्धी गेलें ।
ऐसें नाहीं ठेविलें । वासनेमाजीं ॥
जैसें अवचितपणें । वायूसी सर्वत्र विचरणें ।

---

१ आनंद, गोडी. २ अरण्याकडे. ३ समुदायाचें. ४ बाणांची ५ समजतो ६ कुजलेलें. ७ मांस. ८ आशेखोराप्रमाणें.

कीं निरभिमान उदैजणें । सूर्याचें जैसें ॥
कां श्रुति स्वभावता बोले । गंगा काजेविण चाले ।
तैसें अवष्टंभहीन भलें । वर्तणें ज्याचें ॥
ऋतुकाळीं तरी फळती । परि फळलों हें नेणती ।
तयां वृक्षांचिये ऐसी वृत्ति । कर्मीं सदा ॥
एवं मनीं कर्मीं बोलीं । जेथ अहंकारा उखी जाहाली ।
एकावळीची काढिली । दोरी जैसी ॥
संबंधेंवीण जैसीं । अभ्रें असतीं आकाशीं ।
देहीं कर्मं तैसीं । जयासी गा ॥
मद्यपाआंगींचें वस्त्र । कां लेपाहातींचें शस्त्र ।
बैलावरी शास्त्र । बांधलें आहे ॥
तया पाडें देहीं । जया मी आहे हें स्मृतिचि नाहीं ।
निरहंकारता पाहीं । तया नांव ॥

ज्ञा. १३. ५२५--५३४.

---

## ७४. दोषदर्शन.

जन्ममृत्युजरादुःखें । व्याधिवार्धक्यकलुषें ।
तियें आंगा न येतां देखे । दुरूनि जो ॥...॥
म्हणे पूयगर्तें रिगाला । अहा मूत्ररंध्रें निघाला ।
कटारे मियां चाटिला । कुचस्वेद ॥
ऐसऐसियापरी । जन्माचा कंटाळा धरी ।
ह्मणे आतां तें मी न करीं । जेणें ऐसें होय ॥...॥
आणि मृत्यु पुढां आहे । तोचि कल्पांतीं कां पाहे ।
परी आजीच होये । सावध जो ॥

१ अहंकारावाचून. २ नाश. ३ एकेरी हाराची. ४ भिंतीवरील चित्राच्या हातचें. ५ आठवणच. ६ मल. ७ पुवाच्या खड्यांत. ८ अरेरे.

माजी अथांव[1] म्हणतां । थडियेचि पांडुसुता ।
पोहणार आइता । कांसी जेवीं ॥...॥
पाहेचा[2] पेणां[3] वाटवधा[4] । तंव आजीचि होईजे सावधा ।
जीव न वचतां औषधा । धांविजे जेवीं ॥
एरवी ऐसें घडे । जो जळत घरीं सांपडे ।
तो मग न पवाडे । कुहा खणों ॥...॥
म्हणोनि समर्थेसीं वैर । जया पडिलें हाडखाइर[5] ।
तो जैसा आठही पाहर । परजूनि[6] असे ॥
ना तरि केळवली[7] नोवरी । कां संन्यासी जयापरी ।
तैसा न मरतां जो करी । मृत्युसूचना[8] ॥
पैं गा जो ययापरी । जन्मेंचि जन्म निवारी ।
मरणें मृत्यु मारी । आपण उरे ॥...॥
आणि तयाचि परी जरा[9] । न टेंकता[10] शरीरा ।
तारुण्याचिया भरा- । माजि देखे ॥
म्हणे आजिच्या अवसरीं । पुष्टि जे शरीरीं ।
ते पाहे होईल कांचरी[11] । वाळली जैसी ॥ ॥
पद्मदळेंसीं इसाळें[12] । भांडताती हे डोळे ।
ते होतीं पडवळें । पिकलीं जैसीं ॥...॥
मळमूत्रद्वारें । होऊन ठाती खोकरें[13] ।
नवसियें[14] होतीं इतरें । माझिया निधनीं ॥
देखोनि थुंकील जग । मृत्युचा पडेल पांगें[15] ।
सोइरियां उबग[16] । येईल माझा ॥...॥
उभळिचा[17] उजगरा[18] । सेजारियां सोइलियां[19] घरा ।
शिणवील म्हणती म्हातारा । बहुतांतें हा ॥

---

१ अथाक, अथवा खोलपाणी. २ उद्याचा ३ मुक्काम. ४ घातव. ५ हाडास भेदणारे. ६ शस्त्र धारण करून. ७ उपवर झालेली. ८ मरणाचा विचार. ९ म्हतारपण. १० येतां. ११ वाळलेली भाजी. १२स्पर्धेने. १३ फुटकी. १४ नवस करणारीं १५ पराधीनपणा. ओशाळगत. १६ कंटाळा. १७ खोकल्याची उमळ. १८ जागरण. १९ निजलेल्यांना.

ऐसी वार्धक्याची सूचणी । आपणियां तरुणपणीं ।
देखे मग मनीं । विटे जो गा ॥
म्हणे पाहे हें येईल । आणि आतांचें भोगितां जाईल ।
मग काय उरेल । हितालागीं ॥
म्हणोनि नाइकणें पावे । तंव आइकोनि घाली आघवें ।
पंगु न होतां, जावें । तेथ जाय ॥
दृष्टी जंव आहे । तंव पहावें तेतुलें पाहे ।
मूकत्वाआधीं वाचा वाहे । सुभाषित ॥
हात होती खुळे । हें पुढील मोटकें कळे ।
तंव करूनि घाली सकळें । दानादिकें ॥
ऐशी दशा येईल पुढें । तैं मन होईल वेडें ।
तंव चिंतूनि ठेवी चोखडें । आत्मज्ञान ॥
जैं चोर पाहे झोंबती । तंव आजीचि रुसिजे संपत्ती ।
कां झांकाझांकि वाती । न वचतां कीजे ॥
तैसें वार्धक्य यावें । मग जें वायां जावें ।
तें आतांचि आघवें । सवतें करी ॥
आतां मोडूनि ठेलीं दुर्गें । कां वळिलें धरिलें खगें ।
तेथ उपेक्षूनि जो निघे । तो नागवला कीं ॥
तैसेंचि नाना रोग । पडिघाती ना जंव पुढां आंग
तंव आरोग्याचे उपेग । करूनि घाली ॥
सापाच्या तोंडीं । पडिली जे उंडी ।
ते लोऊनि सांडी । प्रबुद्ध जैसा ॥
तैसा वियोग जेणें दुःखें । विपत्तिशोक पोखे ।
तें स्नेह सांडूनि सुखें । उदास होय ॥

ज्ञा. १३. ५३६–५१०.

---

१ लुळे. २ अल्प. ३ उद्यां. ४ मागें. ५ माघार घेणें. ६ पक्ष्यांनी. ७ बाजूस ठेवून. ८ लुटला जाईल. ९ ग्रासणें. १० पिठाचा गोळा. ११ लाहून, पाहून.

## ७५. अनासक्ति.

तरि जो या देहावरी । उदास ऐसिया परी ।
उखितां[1] जैसा बिढारीं । बैसला आहे ॥
कां वृक्षाची साउली । वाटे जातां मिनली[2] ।
घरावरी तेतुली[3] । आस्था नाहीं ॥
साउली सरिसीच[4] असे । परी असे हें नेणिजे जैसें ।
स्त्रियेचें तैसें । लोलुप्य नाहीं ॥
आणि प्रजा जे जाली । तियें वस्तीकरें आलीं ।
कां गोरुवें[6] बैसलीं । रुखातळीं ॥
जो संपत्तिमाजी असतां । ऐसा गमे पांडुसुता ।
जैसा कां वाटे जातां । साक्षी ठेविला ॥
किंबहुना पुंसा[7] । पांजरियांमाजि[8] जैसा ।
वेदाज्ञेसी तैसा । बिहूनि असे ॥

ज्ञा. १३. ५९४--५९९.

## ७६. एकांतप्रियता.

आणि तीर्थें धौतें[9] तटें । तपोवनें चोखटें ।
आवडती कपाटें[10] । वसवूं जया ॥
शैलकक्षांचीं[11] कुहरें[12] । जळाशयें[13] परिसरें[14] ।
अधिष्ठी जो आदरें । नगरा न ये ॥
बहु एकांतावरी प्रीति । जया जनपदाची[15] खंती ।
जाण मनुष्याकारें मूर्ति । ज्ञानाची तो ॥

ज्ञा १३. ६१२-६१४.

---

१ अतिथि. २ प्राप्त झाली. ३ तेवढी. ४ बरोबरच. ५ वाटसरू. ६ गुरें. ७ पोपट. ८ पिंजऱ्यांत. ९ पवित्र. १० गुहा. ११ पर्वतांच्या बाजूंचीं. १२ गुहा. १३ तलाव १४ जवळचीं स्थळें. १५ लोकसमुदायाची.

## ७७. अनन्यभक्ति.

आणि मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटें नाहीं ।
ऐसा निश्चयो तिहीं । जयाचा केला ॥
शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा कोश ।
एक मीवांचूनि वास । न पाहती आन ॥
किंबहुना निकट निज । जयाचें जाहालें मज ।
तेणें आपणयां आम्हां सेज । एकी केली ॥
रिगतां वल्लभापुढें । नाहीं आंगीं जीवीं सांकडें ।
तियें कांतेचेनि पाडें । एकसरला जो ॥
मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें ।
मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ॥...॥
जो अनन्य यापरी । मी जाहलाही मानें वरी ।
तोचि तो मूर्तधारी । ज्ञान पैं गा ।

ज्ञा १३. ६०४–६११

## ७८. अध्यात्मज्ञान.

तरि परमात्मा ऐसें । जें एक वस्तु असे ।
तें जया दिसे । ज्ञानास्तव ॥
तें एकवांचूनि आनें । जियें भवस्वर्गादि ज्ञानें ।
तें अज्ञान ऐसा मनें । निश्चय केला ॥...॥
म्हणे एक हेंचि आथि । येर जाणणें ते भ्रांति
ऐसिया निकरेंसी मती । मेरु होय ॥
एवं निश्चय जयाचा । द्वारीं अध्यात्मज्ञानाचा ।
ध्रुव देवो गगनींचा । तैसा राहिला ॥
तयाचिया ठायीं ज्ञान । या बोला नाहीं आन ।
जें ज्ञानीं बैसलें मन । तेव्हांचि तो मी ॥...॥

१ चांगलें. २ शपथेचें तीर्थ. ३ वाट. ४ संकोच. ५ मूर्तिमंत. ६ निर

येऱ्हवीं बोधा आलेनि ज्ञानें । जरी ज्ञेय न दिसेचि मनें ।
तरि ज्ञानलाभही न मनें । जाहला सांता ॥
आंधळेया हातीं दिवा । देऊनि काय करावा ।
तैसा ज्ञाननिश्चय आघवा । वायांचि जाय ॥...॥
पैं ज्ञानाचिये प्रभेसवें । जयाची मती ज्ञेयी पावे ।
तो हातधरणिया शिवे । परतत्त्वातें ॥
तोचि ज्ञान हें बोलतां । विस्मयो कवण पांडुसुता ।
काय सवितयातें सविता । म्हणावें असें ॥
ज्ञा. १३. ६१६–६३३.

---

## ७९. अज्ञानलक्षण.

आतां धनंजया महामती । अज्ञान ऐसी वदंती ।
तेही सांगो व्यक्ती । लक्षणेंसीं ॥ ..॥
पाहे पां दिवस आघवा सरे । मग रात्रीची वारी वावरे ।
वांचूनि कांहीं तिसरें । नाहीं जेवीं ॥
तैसें ज्ञान जेथ नाहीं । तें अज्ञानचि पाहीं ।
तरि सांगों कांहीं कांहीं । चिन्हें तियें ॥
तरि संभावने जिये । जो मानाची वाट पाहे ।
सत्कारें होये । तोष जया ॥
गर्वें पर्वताचीं शिखरें । तैसा महत्वावरूनि नुतरे ।
तयाचिया ठायीं पुरें । अज्ञान आहे ॥
आणि स्वधर्माचीं मांगळी । बांधे वाचेच्या पिंपळीं ।
उभिला जैसा देऊळीं । जाणोनि कुंचा ॥
घाली विद्येचा पसारा । सुये सुकृताचा डांगोरा ।
करी तेतुलें मोहरा स्फीतीचियां ॥...॥

---

१ जाहाला असतां. २ हातोहात. ३ बोलणें. ४ पाळी. ५ मानाकरितां. ६ दिवाळीचे दिवशीं हिराची केरसुणी मांगलोक चावडीवर ठेवतात ती. ७ उभा केला. ८ केरसुणी. ९ दवंडी, प्रसिद्धी. १० प्रतिष्ठेच्या.

आणि वन्ही वनीं विचरे । तेथ जळती जैसीं जंगमस्थावरें ।
तैसें जयाचेनि आचारें । जगा दुःख ॥
कौतुकें जें जें जल्पे । तें सबळाहुनी तीख रुपे ।
विषाहूनि संकल्पें । मारक जें ॥...॥
आणि फुंके भाता फुगे । रिचविलिया सवेंचि उफगे ।
तैसा संयोगवियोगें । चढे वोहटे ॥
पडली वारयायिचा वळसां । धुळी चढे आकाशा ।
हरिखा वळघे तैसा । स्तुती वेळे ॥
निंदा मोटकी आइकें । आणि कपाळ धरूनि ठाके ।
थेंबें विरे वारेनि शोखे । चिखल जैसा ॥ ..॥
आणि जयाचिया मनीं गांठी । वरिवरि मोकळी वाचा दिठी ।
आंगें मिळे, जीवें पाठी । भलतया दे ॥
व्याधाचें चारा घालणें । तैसें प्रांजळ जोगावणें ।
चांगाचीं अंतःकरणें । विरुद्ध करी ॥
गारें शेवाळें गुंडाळलीं । कां निंबोळी जैसी पिकली ।
तैसी जयाची भली । बाह्य क्रिया ॥..॥
आणि गुरुकुळीं लाजे । जो गुरुभक्ति उभेजे ।
विद्या घेऊनि माजे । गुरुसीचि जो ॥ ..॥
तरि आंगें कर्मे ढिला । जो मनें विकल्पें भरला ।
अडवींचा अवगळला । कुहा जैसा ॥
तया तोंडीं कांटिवडे । आंत नुसधीं हाडें ।
अशुचि तेणें पाडें । सबाह्य जो ॥
जैसें पोटालागीं सुणें । उघडें झाकलें न म्हणे ।
तैसें आपलें परावें नेणे द्रव्यालागीं ।

१ बोलतो. २ बर्ची, पहार. ३ तीक्ष्ण ४ सोडला असतां. ५ वावटळींत. ६ हर्षास. ७ चढे. ८ थोडी. ९ विरघळतो. १० पोसणें ११ शिळा १२ त्रासतो १३ अरण्यांतला. १४ टाकलेला. १५ कुवा. १६ कांटे कुटे.

इया ग्रामसिंहोचिया ठायीं । जैसा मिळणी ठावो अठावो नाहीं ।
तैसा स्त्रीविषयीं कांहीं । विचारी ना ॥
कर्माचा वेळ चुके । कां नित्यनैमित्तिक ठाके ।
तें जया न दुखे । जीवामाजी ॥...॥
पावो सूदलियासवें[3] । जैसें थिल्लरें[4] काल्वे ।
तैसा भयाचेनि नांवें । गजबजे जो ॥
मनोरथांचिया धारसा । वाहणें जयाचिया मानसा ।
पुरीं पडिला जैसा । तुंबिणा पाहीं ॥...॥
तयाच्या ठायीं उद्दंड । अज्ञान असे वितंड ।
जो चांचल्यें भावंड । मर्कटाचें ॥ ॥
वसू जैसा मोकाट । वारा जैसा अफाट ।
फुटला जैसा पाट । निर्जळीं[10] ॥
आंधळें हातिरूं[11] मातलें । कां डोंगरीं जैसें पेटलें ।
तैसें विषयीं सुटलें । चित्त जयाचें ॥...॥
जो अखंड भोगा जेंचे[12] । जया व्यसन कामक्रोडेचें ।
मुख देखोनि विरक्ताचें । सचैल[13] करी ॥
खरी[14] टेंको नेदी उडे । लातौनि[15] फोडी नाकाडें ।
तरी जोवें न काढे । माघौता खर ॥
तैसा जो विषयालागीं । उडी घाली जळते आगीं ॥
व्यसनांची आंगीं । लेणीं मिरवी ॥
फुगोनि पडे तंव । मृग वाढवी हांव ।
परि न म्हणे ते मांव[16] । रोहिणीची[17] ॥
तैसा जन्मोनि मृत्युवरी । विषयीं त्रासिला बहुती परी ।
तऱ्ही त्रास नेघे धरी । अधिक प्रेमा ॥
पहिलिये बाळदशे । आई बा हेंचि पिसें[18] ।
तें सरें मग स्त्रीमांसें । भुलोनि ठाके ॥

---

१ कुत्र्याच्या. २ थांबते. ३ घातल्याबरोबर. ४ डबकें. ५ धारेवर. ६ भोपळा. ७ मोठें. ८ बैल. ९ मोकळा. १० निर्जनवनांत ११ हत्ती. १२ परिश्रम करतो. १३ सचैलस्नान. १४ गाढवी. १५ लाथेनें. १६ भास कपट. १७ मृगजळाची. १८ वेड.

मग स्त्री भोगितां थांवो । वृद्धाप्य लागें येवों ।
तेव्हां तोचि एक प्रेमभावो । बाळकासि आणी ॥ ..॥
तरि देहचि आत्मा । ऐसेया जो मनोधर्मा ।
वळघोनियां कर्मा । आरंभ करी ॥...॥
डोईये ठाविलेनि भोजें । देवलाविसें जैवि फुंज ॥
तैसा विद्यावयसामाजें । उताणा चाले ॥...॥
नाहीं माझेनि पाडें वाड । मी सर्वज्ञ एकचि रूढ ।
ऐसा गर्व तुष्टी गंड । घेऊनि ठाके ॥...॥
पैं गुण तेतुला खाय । स्नेह कीं जाळित जाय ।
जेथ ठाविजे तेथ होय । मसीऐसें ॥
जीवनें शिंपिला तिडपिडी । विजिला प्राण सांडी ।
लागला तरी काडी । उरों नेदी ॥
अळुमाळु प्रकाश करी । तेतुलेनीचि उबारा धरी ।
तैसिया दीपाचिया परी । सुविद्य जो ॥...॥
अंत्यज राणिव बैसविला । आरे धारणें गिळिला ।
तैसा गर्वे फुगला । देखसी जो ॥
जो लाटणें ऐसा न लवे । पाथर तावि न द्रवे ।
गुणियांसी नागवे । फोडसें जैसें ॥ . ॥
जिणयाचेनि विश्वासें । मृत्यु एक एथ असे ।
हें जयाचेनि मानसें । मानिजे ना ॥
अल्पोदकींचा मासा । हे नाटे ऐसिया आशा ।
न वचेचि कां जैसा । अगाध डोहां ॥...॥
तैसा जीविताचेनि मिषें । हा मृत्यूचि आला असे ।
हें नेणेंचि राजसें । सुखें जो गा ॥...॥

---

१ ठाव. २ चढून. ३ डोक्यावर. ४ देव अंगांत आणणारा. ५ अभिमान धरतो. ६ मोठा. प्रसिद्ध. ८ गाल फुगवून ९ वात १० तेल. ११ काजळी. १२ पाण्यानें. १३ वारा घातला तर १४ थोडा. १५ उष्णता, ऊब. १६ अजगरानें. १७ वाळलेलें लाकूड १८ वांकत नाहीं. १९ दगड. २० गारुडी, विषवैद्य. २१ फुरसें, एक सापाची जात २२ जातच नाहीं.

पारि वापुडा ऐसें नेणे । जें वेश्येचें सर्वस्व देणें ।
तेंचि तें नागवणें[1] । रूप येथ ॥
संवचोरांचें[2] साजणें[3] । तेंचि तें प्राण घेणें ।
लेंपा[4] स्नपनें[5] करणें । तोचि नाश ॥...॥
सन्मुख शूला । धांवतया पायें चपळा ।
प्रतिपदीं जवळा । मृत्यु जेवीं ॥
तेविं देहा जंव जंव वाढ । जंव जंव दिवसाचा पवाड ।
जंव जंव सुरवाड[6] । भोगाचां यया ॥
तंव तंव अधिकाधिकें । मरण आयुष्यातें जिंके ।
मीठ जेविं उदकें । घांसिजत असे ॥...॥
कडाडीं[7] लोटला गाडा । कां शिखरौनि सुटला धोंडा ।
तेसा न देखे जो पुढां । वार्धक्य आहे ॥
कां आडवोहळा[8] पाणी आलें । कां जैसें म्हैसयांचें झुंज मातलें ।
तसें तारुण्याचें चढलें । भुररें[9] जया ॥...॥
तरि वाघाचियें अडवे[10] । एकवेळ आला चरोनि दैवें ।
तेणें विश्वासें पुढतीं धांवे । वसू जैसा ॥
कां सर्पघराआंतु । अवचटें[11] ठेवा आणिला स्वस्थु ।
येतुलियासाठीं[12] निश्चितु । नास्तिक होय ॥
तसेंचि अवचटें हें । एक दोनीचि वेळां लाहे ।
एथु उरग[13] एक आहे । हें मानीना जो ॥...॥
सवेंळींच[14] वियोग पडेल । विळौनि[15] विपत्ति येईल ।
हें दुःख पुढील । देखेना जो ॥...॥
वयसेचेनि[16] उवायें[17] । संपत्तीचेनि सावायें[18] ॥
सेव्यासेव्य जायें । सरकाटित ॥...॥

---

१ लुटणें. २ सांवासारखा चोर. ३ मैत्री. ४ मातीच्या चित्राला. ५ स्नान. ६ अनुकूलता. ७ कडयावरून. ८ आडरानांतील वोहळ. ९ भुली, वेड. १० अरण्यांत. ११ अवचित्. १२ एवढ्यानेंच. १३ साप. १४ लवकरच. १५ वेळानें. १६ तारुण्याच्या. १७ उत्कर्षानें. १८ मदतीनें.

रिघे जेथ न रिघावें । मागें जें न घ्यावें ।
स्पर्शों जेथ न लगावें । आंग मन ॥
न जावें तेथ जाये । न पाहावें तें जो पाहे ।
न खावें ते खाये । तेणेंचि तोषे ॥
न धरावा तो संग । न लगावें तेथ लाग ।
नाचरावा तो मार्ग । आचरे जो ॥
नायकावें तें आइके । न बोलावें तें बके ।
परि दोष होतील हें न देखे । प्रवर्ततां ॥...॥
तरि जयाची प्रीति पुरी । गुंतली देखसी घरीं ।
नवगंधकेसरीं । भ्रमरी जैसी ॥
साकरेचिया राशीं । बैसली नुठे माशी ।
तैसेनि स्त्रीचित्त आवेशी । जयाचें मन ॥...॥
महापुरुषाचें चित्त । जालिया वस्तुगत ।
ठाके व्यवहारजात । जया परी ॥
हानि लज्जा न देखे । परापवाद नाइके ।
जयाचीं इंद्रियें एकमुखें । स्त्रिया केलीं ॥
चित्त आराधी स्त्रियेचें । आणि तियेचेनि छंदें नाचे ।
माकड गारुडियाचें । जैसें होय ॥...॥
प्रेमाथिलेनि भक्तें । जैसेनि भजिजे कुलदैवतें ।
तैसा एकाग्रचित्तें । स्त्री जो उपासी ॥...॥
इयेतें हन कोणी देखेल । इयेसी वेखासें जाईल ।
तरि युगचि बुडेल । ऐसें जया ॥ ॥
आणि माझ्या ठायीं भक्ति । फळालागीं जया आर्ती ।
धनोद्देशें विरक्ति । नटणें जेवीं ॥...॥
आणि भजिनालियासवें । तोचि विषय जरी न पावे ।
तरी सांडी म्हणे आघवें । टवाळ हें ॥

१ सबंध २ बडबडती. ३ सुवासिक कमळाच्या केसरांत ४ सिद्धाचें. ब्रह्मगत. ६ विरुद्ध ७ बरोबर. ८ खोटें.

कुणबट कुळवाडी । तैसा आन आन देव मांडी ।
आदि[2]लाची [3]पैरवडी । करी तया ॥
तया गुरुमार्गा टेंके । जयाचा [4]सुगरवा देखे ।
तरि तयाचा मंत्र शिके । येर ने घे ॥...॥
माझी मूर्ति [5]निफजवी । ते घराचे कोनीं बैसवी । ।
आपण देवों देवीं । यात्रे जाय ॥
नित्य आराधन माझें । [6]काजीं कुळदेवता भजे ।
पर्वविशेषें कीजे । पूजा आना ॥
माझें अधिष्ठान घरीं । आणि [7]वोत्रसें आनाचें करी । ।
पितृकार्यां अवसरीं । पितरांचा होय ॥
एकादशीच्या दिवशीं । जेतुला पाड आम्हांसी ।
तेतुलाचि नागांसी । पंचमीच्या दिवशीं ॥
चौथ मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होये ।
चउदसीं ह्मणे माये । तुझाचि वो दुर्गे ॥
नित्यनैमित्तिक कर्में सांडी । मग बैसे नवचंडी ।
आदित्यवारीं वाढी । बहिरवां पात्रीं ॥
पाठीं सोमवार पावे । आणि बेलेंसि लिंगा धांवे ।
ऐसा एकलाचि आघवे । जोगावी जो ॥
ऐसा अखंड भजन करी । उगा नोहे क्षणभरी ।
अवघेनि गांवद्वारीं । अहेवं जैसी ॥
ऐसेन जो भक्त । देखसी सैरा धांवत ।
जाण अज्ञानाचा मूर्त । अवतार तो ॥...॥
जया जनपदीं सुख । गजबजेचें कवतिक ।
वानूं आवडे लौकिक । तोही तोचि ॥
आणि आत्मा गोचर होये । ऐसी जे विद्या आहे ।
ते आइकोनि [10]डौरें वाहे । विद्वांसू जो ॥

---

१ व्यवहार. २ पहिल्याचे ३ प्रकार. ४ मोठेपणा. ५ उत्पन्न करतो. बनवतो. ६ कार्यासाठीं ७ नवस. ८ पोसतो, उपासना करितो. ९ वेश्या १० एक चर्म वाद्य. निंदा, उपहास.

उपनिषदांकडे न वचे । योगशास्त्र न रुचे ।
अध्यात्मज्ञानीं जयाचें । मनचि नाहीं ॥
आत्मचर्चा एकी आथी । ऐसिये बुद्धीची भिंती ।
पाडूनि जयाची मति । वोढाळ जाहाली ॥
कर्मकांड तरी जाणे । मुखोद्गत पुराणें ।
ज्योतिषी तो म्हणे । तैसेंचि होय ॥
शिल्पीं अतिनिपुण । सूपकर्मींही[1] प्रवीण ।
विधि आथर्वण । हातीं आथी ।
कोकीं[2] नाहीं ठेलें । भारत कीर म्हणितलें ।
आगम आपाँविले[3] । मूर्त होती ॥
नीतिजात सुँझे[4] । वैद्यकही बुझे ।
काव्यनाटकीं दुजें । चतुर नाहीं ॥
स्मृतींची चर्चा । देँश[5] जाणे गारुडीचा ।
निघंट प्रज्ञेचा । पाइँकु[6] करी ॥
पैं व्याकरणीं चोखडा । तर्कीं अतिगाढा ।
परि एक आत्मज्ञानीं फुडा । जात्यंध जो ॥
तें एक वांचूनि आघवा शास्त्री । सिद्धांतनिर्माणधाँत्री[7] ।
परि जळों तें मूळनक्षत्रीं । न पाहे गा ॥
मोराआंगीं अशेषें । पिसें असती डोळसें ।
परि एकली दृष्टी नसे । तैसें तें गा ॥
तैसें शास्त्रजात जाण । आघवेंचि अप्रमाण ।
पार्था अध्यात्मज्ञानेंविण । एकलेनि ॥...॥
आणि अध्यात्मज्ञान कांहीं । जेणें मानिलेंचि नाहीं ॥
तो ज्ञानार्थ न देखे काई । हें बोलावें असे ॥
ऐलीचि थडी न पवतां । पळे जो माघौता ।
तया पैलद्वीपींची वार्ता । काय होय ॥

१ पाकशास्त्रांत. २ कामशास्त्र. ३ आपलेसे केले. ४ समजतो ५ मर्म. ६ चाकर. ७ कर्ता, आधार.

मागां श्लोकांचेनि अर्धार्धें । ऐसें सांगितलें श्रीमुकुंदें ।
ना उफराटीं इयें ज्ञानपदें । तेंचि अज्ञान ॥
ज्ञा. १३. ६५३-८५२.

## ८० दैवीसंपत्तीचें वर्णन.

आतां तयाची दैवगुणां । माजि धुरेचा[१] वैसणा ।
वैसे तया आकर्णा[२] । अभय ऐसें ॥...॥
तैसा कर्माकर्माचिया मोहरा । उठूं नेदुनि अहंकारा ।
संसाराचा दरारा । सांडणें येणें ॥
अथवा ऐक्यभावाचेनि पैसें[३] । दुजे मानूनि आत्मा ऐसें ।
भयवार्ता देशें । दवडणें जें ॥
पाणी बुडवूं ये मिठातें । तंव मीठचि पाणी आतें[४] ।
तेवि आपण जालेनि अद्वैतें । नाशे भय ॥...॥
नातरी वार्षिया[५] नाहीं मांडिली । ग्रीष्में नाहीं सांडिली ।
माजि निजरूपें निवाडिली । गंगा जैसी ॥
तैसी संकल्पविकल्पांची वोढी । सांडूनि रजतमांची कावडी ।
भोगितां निजधर्माची आवडी । बुद्धि उरे ॥
इंद्रियवर्गी दाखविलिया । विरुद्धा अथवा भलेया ।
विस्मयो कांहीं केलिया । नुठी चित्तीं ॥
गांवा गेलिया वल्लभ । पतिव्रतेचा विरहक्षोभ ।
भलतेसणी[६] हानि लाभ । न मनी जेवी ॥
तेवि सत्स्वरूप रुचलेपणें । बुद्धि जें ऐसें अनन्य होणें ।
ते सत्वशुद्धी ह्मणे । केशिहंता[७] ॥
आतां आत्मलाभाविखीं । ज्ञानयोगामाजि एकीं ।
जे आपुलिया ठाकीं[८] । हांवे[९] भरे ॥

१ श्रेष्ठपणाचा. २ ऐका. ३ विस्तारानें. ४ होतें. ५ वर्षाऋतू. ६ भलत्या रीतीनें. ७ केशिदैत्यास मारणारा. ८ ठिकाणीं. ९ इच्छा.

तेथ सगळिये चित्तवृत्ति । त्याग करणें या रीतीं ।
निष्कामें पूर्णाहुती । हुताशीं जैसी ।
कां सुकुळीनें आपुली । आत्मजा सत्कुळींचि दिधली ।
हें असो लक्ष्मी स्थिरावली । मुकुंदीं जैसी ॥

तैसें निर्विकल्पपणें । जें योगज्ञानींच या वृत्तिक होणें ।
तो तिजा गुण म्हण । कृष्णनाथ ॥

फुलीं फळीं छाया । मुळीं पत्रींही धनंजया ।
वाटेचा न चुके आलिया । वृक्ष जैसा ।
तैसें मनौनि धनवरी । विद्यमानें आल्या अवसरीं ।
श्रांताचिये मनोहारीं । उपयोगा जाणें ॥

तया नांव जाण दान । जें मोक्षनिधानाचें अंजन ।
हें असो आयिक चिन्ह । दमाचें तें ॥

तरि विषयेंद्रियामिळणी । करूनि घापे विलुटणी ।
जैसें तोडिजे खडूळ पाणी । पारकयां ॥

तैसा विषयजातांचा वारा । वाजों नेदिजे इंद्रियद्वारां ।
इयें बांधोनि प्रत्याहारा । हातीं वोपी ॥

आंतुला चित्ताचें अंगवरी । प्रवृत्ति पर्लूनि माघारी ।
आगी सुयिजे दाहींही द्वारीं । वैराग्याची ॥

श्वासोच्छ्वासाहुनि बहुवसें । व्रतें आचरे खरपुसें ।
वोसंतितां रात्रिदिवसें । नाराणुक जया ॥

पैं दमु ऐसा म्हणिपे । तो हा जाण स्वरूपें ।
यज्ञार्थही संक्षेपें । सांगों ऐक ॥

जया जें सर्वोत्तम । भजनीय देवता धर्म ।
तें तेणें यथागम- । विधी यजिजे ॥

जैसा द्विज षट्कर्में करी । शूद्र तयातें नमस्कारी ।
कीं दोहींसही सरोभरी । निपजे याग ॥

१ अग्नींत. २ वानदार. ३ मनास आनंददायक रीतीचें. ४ वियो
५ गढूळ. ६ निवळीच्या बियांनीं. ७ देतो ८ फिरवून ९ खरपूस १० आचर
करीत असतां. ११ जसा शास्त्रांत विधि असेल त्याप्रमाणें १२ सारखाच.

तैसें अधिकारपर्यालोचें । हें यज्ञ करणें सर्वांचें ।
परि विष फळाशेचें । न घ्यावें माजी ॥...॥
आतां चेंडुवें भूमी हाणिजे । हें नव्हे तो हातां आणिजे ।
कीं शेतीं बीं विखुरिजे । परी पिकीं लक्ष ॥...॥
हें बहु असो आरिसा । आपणपें देखावया जैसा ।
पुढतपुढतीं बहुवसा । उटिज प्रीती ॥
तैसा प्रतिपाद्य जो ईश्वर । तो होआवयालागीं गोचर ।
श्रुतीचा निरंतर । अभ्यास करणें ॥
तें द्विजांसींच ब्रह्मसूत्र । येरां स्तोत्र कां नाममंत्र ।
आवर्तणें पवित्र । पावावया तत्व ॥
पार्था गा स्वाध्यावो । बोलिजे तो हा म्हणे देवो ।
आतां तपशब्दाभिप्रावो । आईक सांगों ॥...॥
ना ना धूपाचा अग्निप्रवेश । कनकीं तुकाचा नाश ।
पितृपक्ष पोशितां र्‍हास । चंद्राचा जैसा ॥
तैसा स्वरूपाचिया प्रसरा-। लागीं प्राणेंद्रियशरीरां ।
आटणी करणें जें वीरा । तेंचि तप ॥

ज्ञा. १६. ६८–१०८.

आतां बाळाच्या हितीं स्तन्य । जैसें नानाभूतीं चैतन्य ।
तैसें प्राणिमात्रीं सौजन्य । आर्जव तें ॥
आणि जगाचिया सुखोद्देशें । शरीरवाचामानसें ।
राहाटणें तें अहिंसें । रूप जाण ॥
आतां तीख होऊनि मवाळ । जैसें जातीचें मुकुळ ।
कां तेज परि शीतळ । शशांकाचें ॥
शके दावितांचि रोग फेडूं । आणि जिभे तरी नव्हे कडू ।
तें वोखद नाहीं मा घडूं । उपमा कैंचो ॥

---

१ अधिकारपरत्वें. २ टाकणें ३ घासणें, पुसणें. ४ जपणें. ५ वजनाचा.
६ मैत्री. ७ तिखट. ८ मृदु. ९ कमळ.

तरि मउपणें बुबुळें । झगडितांही परी नाडळे ।
येरवीं फोडी कोराळें । पाणी जैसें ॥
तैसें तोडावया संदेह । तीख जैसें कां लोह ।
श्राव्यत्वें तरि माधुर्य । पायीं घाली ॥
ऐकों ठातां कौतुकें । कानातें निघती मुखें ।
जे साचारिवेचेनि बिकें । ब्रह्मही भेदी ॥
किंबहुना प्रियपणें । कोणातेंही झकऊं नेणें ।
यथार्थ तारि खुपणें । नाहीं कवणा ॥
येऱ्हवीं गोरीं कीर काना गोड । परिसाचा पोखाळीं कीड ।
आगियेचें करणें उघड । परि जळों तें साच ।
कानीं लागतां मॅहुर । अर्थें विभांडीं जिव्हार ।
ते वाचा नव्हे सुंदर । लांवचि पां ॥
परि अहितीं कोपोनि सोपें । लालनीं मऊ जैसें पुष्प ।
तिये मातेचें स्वरूप । जैसें कां होय ॥
तैसें श्रवणसुखचतुर । परिणमोनि साचार ।
बोलणें जें अविकार । तें सत्य येथें ॥
आतां घालितांही पाणी । पाषाणीं न निघे अंणी ।
कां मथिलिया लोणी । कांजी नेदी ॥
त्वचा पायें शिरीं । हालेयौहीं फडे न करी ।
वसंतींही अंबरीं । न होती फुलें ॥
ना ना रंभेचेन हि रूपें । शुकीं नुठिजेचि कंदर्पें ।
कां भस्मीं वन्हि न उद्दीपे । घृतेंही जेवीं ॥...॥
अक्रोधत्व ऐसें । नांव तें ये दशे ।
जाण ऐसें श्रीनिवासें । म्हाणितलें तया ॥...॥
तेवीं बुद्धिमंतीं देहीं । अहंता सांडूनि पाहीं ।
सांडिजे अशेषही । संसारजात ॥

---

१ दगड. २ बळानें. ३ फसवूं. ४ पारध्याचें गायन. ५ शुद्धपणा. ६ हीनधातु ७ गोड. ८ विवसी, भूत. ९ पोकळ. १० टोंक, अग्र. ११ मारिली असतांही.

तया नांव त्याग । म्हणे तो यज्ञांग ।
हें मानूनि सुभग । पार्थ पुसे ॥
आता शांतीचें लिंग । तें व्यक्त मज सांग ।
देवो म्हणती चांग । अवधान देईं ॥
तरी गिळोनि ज्ञेयातें । ज्ञाता ज्ञानही माघौतें ।
हारपें निरुतें । ते शांति पैं गा ॥
जैसा प्रळयांबूचा उभड[1] । बुडऊनि विश्वाचा पैवाड[2] ।
होय आपणपें निबिड । आपणचि ॥
मग उगमओघासिंधु । हा नुरेचि व्यवहारभेदु ।
परि जलैक्याचा बोधु । तोही कवणा ॥
तैसी ज्ञेया देतां मिठी । ज्ञातृत्वही पडे पोटीं ।
मग उरे तेंचि किरीटी । शांतीचें रूप ॥
आतां कदर्थवित[3] व्याधी । बळीकरणाचिया[4] आधी ।
आपपर न शोधी । सद्वैद्य जैसा ॥
कां चिखलीं रुतली गाये । घड भाकड न पाहे ।
जो तियेचिया ग्लानी होये । कालाभुला[5] ॥
ना ना बुडतयातें सकरुण । न पुसे अंत्यज कीं ब्राह्मण ।
काढूनि राखे प्राण । हेंचि जाणे ॥
कीं मार्यवणी[6] पापियें । उघडी केली विपायें ।
ते नेसविल्याविण न पाहे । शिष्ट जैसा ॥...॥
अगा पुढिलांचे दोष । करूनि आपुलिये दिठी चोख ।
मग घापे अवलोक । तयावरी ॥
जैसा पुजूनि देव पाहिजे । पेरूनि शेता जाइजे ।
तोषौनि प्रसाद घेइजे । अतिथीचा ॥
तैसें आपुलेनि गुणें । पुढिलांचें उणें ।
फेडुनियां पाहाणें । तयाकडे ॥...॥

---

१ उमाळा. २ विस्तार. ३ त्रास देत असतां. ४ बरे करण्याच्या
५ कासावीस. ६ पतिव्रता.

अगा अपैशुन्यांचें लक्षण । अर्जुना हें फुडें जाण ।
मोक्षमार्गीचें सुखासन । मुख्य हें गा ॥
आतां दया ते ऐसी । पूर्ण चंद्रिका जैसी ।
निवविता न कडसी । सानें थोर ॥...॥
पैं जगीं जीवनासारिखें । वस्तु आंगवरी उपेंखे ।
परि जातें जीवित राखे । तृणाचेंही ।
तैसें पुढिलांचेनि तापें । कळवळलीये कृपें ।
दिधलें ही आपणपें । न्यूनचि मानी ॥ ॥
पैं पायीं कांटा नेहटे । तंव व्यथा जीवीं उमटे ।
तैसा पोळे संकटें । पुढिलांचेनि ॥
कां पावो शीतळता लाहे । कीं तें डोळ्याचिलागीं होये ।
तैसा परसुखें जाये । सुखावत जो ॥
किंबहुना तृषितालागीं । पाणी आरायिलें असे जगीं ।
तैसें दुःखितांचे सेलभागीं । जिणें जयाचें ॥
तो पुरुष वीरराया । मूर्तिमंत जाण दया ।
मी उदयजतांचि तया । ऋणिया लाभें ॥
आतां सूर्यासी जीवें । अनुसरलियां राजीवें ।
परि तें तो न शिवे । सौरभ्य जैसें ॥
कां वसंताचिया वाहणीं । आलिया वनश्रीच्या अक्षौहिणी ।
ते न करीतांचि घेणी । निघाला तो ॥
हें असो महासिद्धींसीं । लक्ष्मीही आलिया पाशीं ।
परि महाविष्णु जैसी । न गणीचि ते ॥
तैसें ऐहिकींच कां स्वर्गींचे । भोग पाइकें जालिया इच्छेचे ।
परि भोगावे हें न रुचे । मनामाजी ॥
बहुवें काय कौतुकीं । जीव नोहे विषयाभिलाखी ।
अलोलुप्त्वदशा ठाउकी । जाण ते हे ॥

---

१ दुष्टपणाचा अभाव. २ कसास लावणें, विचार करणें. ३ पाणी. ४ नाश पावते. ५ जोरानें लागे. ६ उत्पन्न केलें. ७ उत्तम वांटा. ८ कमळ. ९ चाकर.

आतां माशिया जैसें मोहळ । जळचरां जेवीं जळ ।
कां पक्षिया अंतराळ । मोकळें हें ॥
ना तरी बाळकोद्देशें । मातेचें स्नेह जैसें ।
कां वसंतींच्या स्पर्शें । मऊ मलयानिळ ॥
डोळेगां प्रियांचो भेटी । कां पिलियां कूर्मींची दिठी ।
तैसी भूतमात्रीं रहाटी । मवाळ ते ॥
स्पर्शें अतिमृदु । मुखीं घेतां सुस्वादु ।
घ्राणासी सुगंधु । उजाळ आंगें ॥
तो आवडे तेवढा घेतां । विरुद्ध जरी न होता ।
तरी उपमे येता । कापुर कीं ॥
परि महाभूतें पोटीं वाहे । तेवींचि परमाणुमाजी सामाये[1] ।
या विश्वनुसार हाये गगन जैसें ॥
काय सांगो ऐसें जिणें । जें जगाचेनि जीवें प्राणें ।
तया नांव म्हणे । मार्दव मी ॥...॥
रूपसां[2] उदयलें कुष्ठ । संभावितां कुटीचें[3] बोट ।
तया लाजा प्राणसंकट । होय जैसें ॥
तैसें औटहातपणें । जें शव होऊनि जिणें ।
उपजों उपजों मरणें । नावां नावां[4] ॥
तिये गर्भभेदमुसे । रक्तमूत्ररसें ।
वोंतिव होऊनि असे । तें लाजिरवाणें[5] ॥
हें बहु असो देहपणें । नामरूपासि येणें ।
नाहीं लाजिरवाणें । तयाहूनी ॥
ऐसैलिया अवकळा । घेपे शरीराचा कंटाळा ।
ते लाज पैं निर्मळा । निसुगा[6] गोड ॥
आतां सूत्रतंतु तुटलिया । चेष्टाचि ठाके सायखंडिया[7] ।
तैसी प्राणजयें कर्मेंद्रिया । खुंटे गती ॥

---

१ सामावलें जातें. २ रूपवानाला. ३ निंदेचें. ४ क्षणक्षणां. ५ फजिती. ६ कोडगा. ७ लांकडाची बाहुली.

कीं मावळिलिया दिनकर । सरे किरणांचा प्रसार ।
तैसा मनोजयें प्रकार । बुद्धींद्रियां ॥
एवं मनपवनानियमें । होतीं दाहीं इंद्रियें अक्षमें ।
तें अचापल्य वर्मे । येणें होय ॥

ज्ञा १६. ११३--१८५.

आतां ईश्वरप्राप्तीलागीं । प्रवर्तता ज्ञानयोगीं ।
धिर्वे[2]लेयाच्या आंगीं । वोसिवा[3] नव्हे ॥
वोखटें[4] मरणाऐसें । तेंही आलें अग्निप्रवेशें ।
परि प्राणेश्वरोद्देशें । न गणीचि सती ॥ ..॥
न ठाके निषेध आड । न पडे विधीची भीड ।
नुपजेचि जीवीं कोड । महासिद्धीचें ॥
ऐसे ईश्वराकडे निजें । धावे आपसया सहज ।
तया नांव तेज । आध्यात्मिक तें ॥
आतां सर्व[5]ही साहातिया गरिमा[6] । गर्वा न ये तेचि क्षमा ।
जैसें देह वाहतांनि रोमां[7] । वाहणें नेणें ॥
आणि मातलिया इंद्रियांचे वेग । कां प्राचीनें[8] खवळले रोग ।
अथवा योगवियोग । प्रियाप्रियांचें ॥
यया आघावियांचाचि थोर । एके वेळे आलिया पूर ।
तरि अगस्त्याहुनि धीर । उभा ठाके ॥
आकाशीं धूमाची रेखा । उठिली बहुवा आगळिका ।
ते गिळी येकी झुळुका । वारा जेवीं ॥
तैसें आधिभूताधिदैवां । अध्यात्मादि उपद्रवां ।
पातलेयां पांडवा । गिळूनि घाली ॥
ऐसें चित्तक्षोभाच्या अवसरीं । उचलूनि धैर्या जें चांगावें करीं ।
धृति म्हणिपे अवधारीं । तियेतें गा ॥

---

१ दीन. २ धैर्यच्या. ३ न्यूनता. ४ वाईट. ५ अंतःकरण. ६ मोठेपणा. ७ अंगावरील केंस. ८ प्रारब्धानें.

आतां निर्वाळूनि कनकें । भरिला गांगें पीयूषें ।
तया कलशाचिया सारखें । शौच असे ॥
जें आंगीं निष्काम आचार । जीवीं विवेक साचार ।
तो सबाह्य घडला आकार । शुचित्वाचाचि ॥
कां फेडित पाप ताप । पोखित तीरींचे पादप ।
समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥
कां जगाचें आंध्य फेडित । श्रियेचीं राउळें उघडित ।
निघे जैसा भास्वत । प्रदक्षिणे ॥
तैसीं बांधलीं सोडित । बुडालीं काढित ।
सांकडीं फेडित । आर्तांचिया ॥
किंबहुना दिवसराती । पुढिलांचें सुख उन्नती ।
आणित आणित स्वार्थी । प्रवेशिजे ॥
वांचूनि आपुलिया काजालागीं । प्राणिजातांच्या अहितभागीं ।
संकल्पाचीही आडवंगी । न करणें जें ॥
पैं अद्रोहत्व एसिया गोष्टी । एकसी जिया किरीटी ।
तें सांगितलें हे दिठी । पाहां ये तेसें ॥
आणि गंगा शंभूच्या माथां । पावोनि संकोचली जेविं पार्था ।
तेविं मान्यपणें सर्वथा । लाजणें जें ॥
तें हें पुढतपुढतीं । अमानित्व जाण सुमति ।
मागां सांगितलेसें किती । तेंचि तें बोलों ॥

ज्ञा. १६. १८६–२०६.

एवं इहीं सव्विसें । ब्रह्मसंपदा हे वसत असे ।
मोक्षचक्रवर्तीचें जैसें । अग्रहार होय ॥
ना ना हे संपत्ति दैवी । या गुणतीर्थांची नित्यनवी ।
निर्विण्णसगरांच्या दैवीं । गंगाचि आली ॥

---

१ शुद्धकरून. २ पाण्यानें. ३ दूर करीत. ४ आंधळेपणा. ५ ठिकाणें, मंदिरें. ६ संकटें. ७ अडथळा, प्रतिबंध. ८ इनामगांव. ९ विरक्त.

कीं गुणकुसुमांची माळा । हे घेऊनि मुक्तिबाळा ।
वैराग्यनिरपेक्षाचा गळा । गिंवसीत असे ।।
कीं सत्त्वीसगुणज्योती । इहीं उजळोनि आरती[1] ।
गीता आत्मया निजपती-। नीराजना आली ॥
उगळितें[2] निर्मळें । गुण इयेंचि मुक्ताफळें ।
दैवी शुक्तिकळे । गीतार्णवींची ॥
काय बहु वानूं ऐसी । अभिव्यक्ति ये आपैसी ।
केलें दैवी गुणराशी-। संपत्ती रूप ॥

---

## ८१. आसुरीसंपत्तीचें वर्णन.

तरीतयाचि आसुरा । दोषांमाजि जया वीरा ।
वाडपणाचा[3] डांगोरा[4] । तो दंभ ऐसा ॥
जैसी आपुली जननी । नग्न दाविलीया जनीं ।
तें तीर्थचि परि पतनीं । कारण होय ॥
कां विद्या गुरूपदिष्टा । बोंभाइलीया[5] चोहटां ।
तरि इष्टदाचि परि अनिष्टा । हेतु होती ॥
पैं आंगें बुडतां महापुरीं । जे वेगें काढी पैलतीरीं ।
तें नावचि बांधिलिया शिरीं । बुडवी जैसी ।।...॥
तैसा दृष्टादृष्टाचा सखा । धर्म जाला तो फोकारिजे[6] देखा ।
तरि तारिता तोचि दोखा-। लागीं होय ॥
म्हणौनि वाचेचा चौबारां[7] । घातलिया धर्माचा पसारा ।
धर्मचि तो अधर्म होय वीरा । तो दंभ जाणे ॥ ..॥
मांदुरी लोकांचा घोडा । गजपतीही थोडा ।
कां कांटियेवरिलिया सरडा । स्वर्गही नीच ॥

---

१ आरती ओंवाळण्याला. २ उघडणारीं. ३ मोठेपणाची. ४ टिमकी. ५ पुकारली असतां. ६ उघडा करणें. ७ चव्हाटा. ८ चाबुकस्वार.

तृणाचेनि इंधनें । आगी धांवे गगनें ।
थिल्लरवळें[1] मीनें । न गणिजे सिंधु ॥
तैसा माजे स्त्रियाधनें । विद्यास्तुती बहुतें मानें ।
एके दिवसींचेनि परान्नें । अल्पकु[2] जैसा ॥
अभ्रच्छायेचिया जोडी । निदैव घर मोडी ।
मृगांबु देखोनि फोडी । पाणियाडें[3] मूर्ख ॥
किंबहुना ऐसैसें । उतणें जें संपत्तिमिसें ।
तो दर्प गा अन[illegible] न बोले घेईं ॥...॥
पतंगा नाव[illegible]खद्योता भानूची खंती ।
टिटिभेनें[4] अपांपति[illegible]री केला ॥
तैसा अभिमानाचेनि [illegible]हें । ईश्वराचेंही नाम न साहे ।
बापातें म्हणे मज हे । सवती जाली ।
ऐसा मान्यतेचा पुष्टगंड[5][illegible]तो अभिमानी परम लंड ।
रौरवाचा रूढ । मार्गचि पैं ॥
आणि पुढिलांचें सुख । देखणियांचें होय मिष ।
चढे क्रोधाग्नीचें विख । मनोवृत्ति ॥
शीतजळाचिये भेटी । तातला[6] तेलीं आगी उठी ।
चंद्र देखोनि जळे पोटीं । कोल्हा जैसा ॥
विश्वाचें आयुष्य जेणें उजळे । तो सूर्य उदेला देखोनि सवळे[7] ।
पापिया फुटती डोळे । डुडुळांचे[8] ॥
जगाची सुख पहांट । चोरां मरणाहूनि निकृष्ट ।
दुधाचें काळकूट । होय व्याळीं ॥
अगाधें समुद्रजळें । प्राशितां अधिक जळे ।
वडवाग्नि न मिळे । शांती कांहीं ॥
तैसा विद्याविनोदवैभवें । देखे पुढिलांचीं दैवें ।
तंव तंव रोष दुणावे । क्रोध तो जाण ॥

---

१ डबकें. २ दरिद्री. ३ तळें. ४ टिटवीनें. ५ ज्याचे गाल फुगलेले आहेत असा. ६ तापलेल्या. ७ प्रातःकाळीं. ८ घुबडाचे.

आणि मन सर्पाची[1] कुटी । डोळे नाराचांची[2] सुटी ।
बोलणें तें वृष्टि । इंगळांची[3] ॥
येर जें क्रियाजात । तें तिखयांचें[4] कर्वत ।
ऐसें सबाह्य खसखसित । जयाचें गा ॥
तो मनुष्यांत अधम जाण । पारुष्याचें[5] अवतरण ।
आतां आईक खूण । अज्ञानाची ॥
तरी शीतोष्णस्पर्शा । निवाड नेणे पाषाण जैसा ।
कां रात्री आणि दिवसा । जात्यंध[6] तो ॥...॥
ना तरि ते नाना रसीं । रिघोनि दर्वी[7] जैसी ।
परि रसस्वादासी । चाखों नेणे ॥...॥
हें चोख हें मैळ । ऐसें नेणोनिया बाळ ।
देखे तें केवळ । मुखींचि घाली ॥
तैसें पापपुण्याचें खिचटें[8] । करोनि खातां बुद्धि चेष्ट ।
कडु मधुर न वाटे । ऐसी जे दशा ॥
तिये नाम अज्ञान । या बोला नाहीं आन ।
एवं साही दोषांचें चिन्ह । सांगितलें ॥
इहींच साही दोषांगीं । हे आसुरी संपत्ति दाटुगी[9] ।
जैसें थोर विष भुजंगीं । अंग सानें[10] ॥...॥
परि क्रूर ग्रहांची जैसी । मांदी[11] मिळे एकेचि राशीं ।
कां येती निंदकापासी । अशेष पापें ॥
मरणाराचें अंग । पडिघाती[12] अवघेचि रोग ।
कां कुमुहूर्तीं दुर्योग । एकवटी ॥...॥
कां आयुष्य जातिये वेळे । शेळिये सातवेउळी[13] मिळे ।
तैसें साही दोष सगळे । जोडती तया ॥
मोक्षमार्गाकडे । जयाचा आंबुखा[14] पडे ।
न निघे म्हणोनि बुडे । संसारीं जो ॥

१ वारूळ २ बाणांची. ३ निखाऱ्याची. ४ पोलादी. ५ काठिण्याचें. ६ जन्मांध. ७ पळी. ८ खिचडी ९ बळकट. १० लहान ११ समुदाय. १२ व्यापतात. १३ सात नांग्यांची इंगळी. १४ आवरण, आच्छादन.

अधमां योनींच्या पाउटीं । उतरत जो किरीटी ।
स्थावरांहीं तळवटीं । बैसणें घे ॥
हें असो तयाच्या ठायीं । मिळोनी साही दोषीं इहीं ।
आसुरी संपत्ति पाहीं । वाढविजे ॥

ज्ञा. १६. २१७–२६३.

## ८२. परमात्मा हाच बुद्धीची अवधि होय.

अर्जुना तें पुण्यवशें । जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे ।
तरी अशेषही नाशे । संसारभय ॥
जैसी दीपकलिका[1] धाकुटी[2] । परि बहु तेजातें प्रगटी ।
तैसी सद्बुद्धि हे थेकुटी । ह्मणों नये ॥
पार्था बहुतीं परी हें अपेक्षिजे विचारशूरीं ।
जे दुर्लभ चराचरीं । सद्वासना ॥
आणिकासारिखा बहुवस । जैसा न जोडे परिस ।
कां अमृताचा लेश । दैवगुणें ॥
तैसी दुर्लभ सद्बुद्धि । जिये परमात्माचि अवधि[3] ।
जैसा गंगेसी उदधि । निरंतर ॥
तैसें ईश्वरावांचुनि कांहीं । जियें आणिक लोणी[4] नाहीं ।
ते एकचि बुद्धि पाहीं । अर्जुना जगीं ॥

ज्ञा २. २३७--२४२.

## ८३. कर्म हाच संन्यास.

जैसा क्षाळूनियां[5] लेप एक । सवेंचि लाविजे आणिक ।
तैसेनि आग्रहाच्या पाइक[6] । विंचंबे[7] वायां ॥

१ दिव्याची ज्योत. २ लहान. ३ शेवट. ४ मिळणें, शेवट. ५ धुवून. ६ चाकर. ७ कष्टांत पडतो.

गृहस्थाश्रमाचें वोझें । कपाळीं आधींचि आहे सहजें ।
कीं तेंचि संन्यासें वाढविजे । सरिसें पुढती ॥
म्हणूनि अग्निसेवा न सांडितां । कर्माची रेखा नोलांडितां ।
आहे योगसुख स्वभावतां । आपणपांचि ॥

ज्ञा. ६. ४९–५१.

---

## ८४. संकल्पनाशानें परमात्म्याचें सांनिध्य.

तया स्वांतःकरणजिता । सकळकामोपशांता ।
परमात्मा परौता[1] । दूर नाहीं ॥
जैसा किडाळाचा[3] दोष जाये । तरि पंधरें[4] तेंचि होये ।
तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं ॥
हा घटाकार जैसा । निमालिया तया अवकाशा ।
नलगे मिळों जाणें आकाशा । आना[5] ठाया ॥
तैसा देहाहंकार नाथिला[6] । हा समूळ जयाचा नाशिला ।
तोचि परमात्मा संचला[7] । आधींचि आहे ॥

ज्ञा. ६. ८१–८४.

---

## ८५. परिमितता.

आहार तरी सेविजे । परि युक्तीचेनि[8] मापें मविजे[9] ।
क्रियाजात आचरिजे । तयाचि स्थिति ॥
मापितेंला[10] बोल बोलिजे । मितलिया[11] पाउलीं चालिजे ।
निद्रेंही मान दीजे । अवसरें येकें ॥

१ मर्यादा. २ पलिकडे. ३ हीणकस. ४ उत्तमकशी सोनें. ५ दुसऱ्या. ६ खोटा. ७ सर्वत्र सांचलेला. ८ नियमाच्या. ९ मोजावा. १० मोजका. ११ मोजक्या.

जागणें जरी जाहलें । तरि व्हावें तें मितलें ॥
येतुलेनि धातुसाम्य संचलें । असेल सुख ॥

ज्ञा. ६. ३४९–३५१

---

## ८६. साधूची आत्यंतिक समता.

पार्था जयाचिया ठायीं । वैषम्याची वार्ता नाहीं ।
रिपु मित्रां दोहीं । सरिसा पाडु ॥
कां घरिचियां उजेड करावा । परिकियां आंधार पाडावा ।
हें नेणेचि गा पांडवा । दीप जैसा ॥
जो खांडावया घाव घाली । कां लावणी जयानें केली ।
दोघां एकचि साउली । वृक्ष दे जैसा ॥
नातरि इक्षुदंडु । पाळितया गोडु ।
गाळितया कडु । नोहेचि जेवीं ॥
अरिमित्रीं तैसा । अर्जुना जया भाव ऐसा ।
मानापमानीं सरिसा । होत जाय ॥...॥
जो निंदेतें नेघे । स्तुती न श्लाघे
आकाशा नलगे । लेप जैसा ॥...॥
साच लटिकें दोन्हीं । न बोले जाहला मौनी ।
जो भोगितां उन्मनी । आरायेना ॥
जो यथालाभें संतोषे । अलाभें न पारुखे ।
पाऊसेविण न सुके । समुद्र जैसा ॥
आणि वायूसी एके ठायीं । बिढार जैसें नाहीं ।
तैसा न धरीच कहीं । आश्रय जो ॥...॥
हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।
किंबहुना चराचर । आपण जाहला

ज्ञा. १२. १९७–२१३.

१ सारखा. २ योग्यता. ३ परक्यांस. ४ तोडण्यांकरितां. ५ ऊंस. ६ खरें. ७ तृप्त होत नाहीं. ८ रुष्ट होत नाहीं. ९ आश्रय, राहण्याची जागा.

## ८७ सात्त्विक यज्ञ.

तरि तिहींमाजी प्रथम । सात्विका यज्ञाचें वर्म ।
आईक पांसुमहिम–। शिरोमणि ॥
तरि एक प्रियोत्तम–। वांचोनि वाढों नेदी काम ।
जैसा कां मनोधर्म । पतिव्रतेचा ॥
ना ना सिंधूतें ठाकूनि गंगा । पुढारां न करीचि रिगा ।
कां आत्मा देखोनि उगा । वेद ठेला ॥
तैसें जे आपुल्या स्वहितीं । वेंचूनिया चित्तवृत्ति ।
नुरवितीचि अहंकृति । फळालागीं ॥
पातलेया झाडाचें मूळ । मागुतें सरों नेणेंचि जळ ।
जिरालें कां केवळ । तयाच्याचि आंगीं ॥
तैसें मनें देहीं । यजननिश्चयाच्या ठाईं ।
हारपोनि जे कांहीं । वांछिती ना ॥...॥
परि आरिसां आपणपें । डोळां जैसा घेपे ।
कां तळहातींचें दीपें । रत्न पाहिजे ॥
ना ना उदितें दिवाकरें । गमावा मार्ग दिठी भरे ।
तैसा वेदनिर्धारें । देखोनियां ॥...॥
सकळावयवउचितें । लेणीं पातलीं जैसीं आंगातें ।
तैसे पदार्थ जेथिंचे तेथें । विनियोगुनी ॥
काय वानूं बहुतां बोलीं । जैसी सर्वाभरणीं भरली ।
तें यज्ञविद्याचि रूपा आली । यजनमिषें ॥
तैसा सांगोपांग । निपजे जो याग ।
नुठवूनियां लाग । महत्त्वाचा ॥
प्रतिपाळ तरी पाटाचा । झाडीं कीजे तुळसीचा ।
परि फळा फुला छायेचा । आश्रय नाहीं ॥

---

१ पावून. २ शिरकाव. ३ प्राप्त झालें असतां. ४ चालण्याचा. ५ संबंध. ६ उत्कृष्ट.

किंबहुना फळाशेंवीण । ऐसेया निगुती[1] निर्माण ।
होय तो याग जाण । सात्विक गा ॥
ज्ञा. १७. १७०–१८४.

## ८८. शारीर तप.

तरि तप जें कां सम्यक् । तेंही त्रिविध आईक ।
शारीर मानसिक । शाब्द गा ॥
आतां या तिहीं माझारीं । शारीर तंव अवधारीं ।
तरी शंभू कां श्रीहरि । पढियंता होय ॥
तया प्रिय देवतालया । यात्रादिकें करावया ।
आठही पाहार जैसें पाया । उळिग[2] घापे ॥
देवांगण मिरवणियां[3] । अंगोपचार पुरवणियां ।
करावया म्हणियां । शोभती हात ॥
लिंग कां प्रतिमा दिठी । देखतखेंवो[4] अंगयष्टी ।
लोटिजे कां कांठी । पडली जैसी ॥
आणि विद्याविनयादिकीं । गुणीं वडिल जे लोकीं ।
तया ब्राह्मणांची निकी[5] । पाइकी कीजे ॥
अथवा प्रवासें कां पीडां । कां शिणले जे सांकडां ।
ते जीव सुरवाडा[6] । आणिजती ॥
सकळ तीर्थांचिये धुरे[7] । जियें कां मातापितरें ।
तयां सेवेसी कीर शरीरें । लोण कीजे ॥
आणि संसारा ऐसा दारुण । जो भेटलाचि हरी शीण ।
तो ज्ञानज्ञानी सकरुण । भजिजे गुरू ॥
आणि स्वधर्माचा आगिठां । देहजाड्याचिया किटा ।
आवृत्तिपुटीं[8] सुभटा । झाडी कीजे ॥

१ युक्तीनें. २ भोंवरा, बिगार, वेठ. ३ सुशोभित करणें. ४ पाहतांच. ५ चांगली. ६ सुखाप्रत ७ श्रेष्ठ. ८ अग्नीत

वस्तु भूतमात्रीं नमिजे । परोपकारीं भजिजे ॥
स्त्रीविषयीं नियामिजे । नांवा नांवा ॥
जन्मतेनि प्रसंगें । स्त्रीदेह शिवणें आंगें ।
तेथूनि जन्म आघवें । सोंवळें कीजे ॥...॥
ऐसैसी जें शरीरीं । राहाटीची पडे[1] उजरी[1] ।
तें शारीर तप घुमरी[2] । आलें जाण ॥

ज्ञा. १७. २००-२१३.

---

## ८९. वाङ्मय तप.

एवं शारीर जें तप । तयाचें दाविलें रूप ।
आतां आईक निष्पाप । वाङ्मय तें ॥
तरी लोहाचें आंग तुक[3] । न तोडितांचि कनक ।
केलें जैसें देख । परिसें तेणें ॥
तैसें न दुखवितां सहजें । जावळिया सुख निपजे ।
ऐसें साधुत्व कां देखिजे । बोलणां जिये ॥
पाणी मुदल झाडा जाये । तृण तें प्रसंगेंचि जिये ।
तैसें एका बोलिलें होये । सर्वांहि हित ॥
जोडे अमृताची सुरसुरी[4] । तें प्राणांतें अमर करी ।
स्नानें पाप ताप वारी । गोडीही दे ॥
तैसा अविवेकही फिटे । आपुलें अनादित्व भेटे ।
आइकतां रुचि न विटे । पीयूषीं जैसी ॥
जरी कोणी करणें पुसणें । तरी होआवें ऐसें बोलणें ।
नातरि आवर्तणें[5] । निगम कां नाम ॥
ऋग्वेदादि तिन्ही । प्रतिष्ठिजती वाग्भुवनीं ।
केली जैसी वदनीं । ब्रह्मशाळा[6] ॥

---

१ उत्कर्ष होतो. २ पूर्णतेस. ३ वजन. ४ गंगा. ५ पठण करणें. ६ वेदशाळा.

नातरी एकाधें नांव । तेंचि शैव कां वैष्णव ।
वाचे वसे तें वाग्भव । तप जाणावें ॥

ज्ञा १७. २१५--२२३.

---

## ९० मानसिक तप.

आतां तप जें मानसिक । तेंही सांगों आइक ।
ह्मणे लोकनाथनायक-। नायकु तो ॥
तारि सरोवर तरंगीं । सांडिलें आकाश मेघीं ।
कां चंदनाचें उरगीं[1] । उद्यान जैसें ॥
ना ना कळावैषम्यें चंद्र । कां सांडिला आधीं[2] नरेंद्र ।
ना तरि क्षीरसमुद्र । मंदराचळें ॥
तैसीं नाना विकल्पजाळें । सांडूनि गेलिया सकळें ।
मन राहे कां केवळें । स्वरूपें जें ॥...॥
मग न चलतें कळंकेंवीण । शशिबिंब जैसें नित्य पूर्ण ।
तैसें चोखीं[3] स्थिरपण । मनाचें जें ॥
बुजाली वैराग्याची वोरप[4] । जिराली मनाची धांपकांप ।
तेथ केवळ जाली वांफ । निजबोधाची ॥
ह्मणौनि विचारावया शास्त्र । राहाटवावें जें वक्त्र ।
तें वाचेचेंही सूत्र । हातीं न धरी ॥
तें स्वलाभ लाभलेंपणें । मन मनपणाही धरूं नेणें ।
शिवतलें जैसें लवणें । आपलें निज ॥
तेथ कें उठिती ते भाव । जिहीं इंद्रियमार्गीं धांव ।
घेऊनि ठाकावे गांव । विषयांचे ते ॥
ह्मणोनि तिये मानसीं । भावशुद्धीचि असे आपैसी ।
रोमशुचि[5] जैसी । तळहातासी ॥

---

१ सापांनीं. २ मानसिक व्यथा, चिंता. ३ शुद्धता, सात्विक भाव ४ उत्कंठा. ५ शुद्धता.

काय बहु बोलों अर्जुना । जैं हे दशा ये मना ।
तैं मनस्तपोभिधाना । पात्र होय तीं ॥

ज्ञा. १७. २२४–२३६.

---

## ९१. राजस तप.

ना तरि तपस्थापनेलागीं । दुजेपण मांडूनि जगीं ।
महत्वाद्रीच्या शृंगीं । बैसावया ॥
त्रिभुवनींचिया सन्माना । न वचावें[1] ठाया आना ।
धुरेचिया आसना । भोजनालागीं ॥
विश्वाचेया स्तोत्रा । आपण होआवया पात्रा
विश्वें आपलिया यात्रा । करावया ॥
लोकांचिया विविधा पूजा । आश्रय न धरावया दुजा ।
भोग भोगावे वोजा[2] । महत्वाचिये ॥
आंग बोल माखूनि तपें । विकावया आपणपें ।
अंगहीन[3] पेंडपें[4] । जियापरी ॥
हें असो धनमानीं आस । वाढउनी तप कीजे सायास ।
तें तेंचि तप राजस । बोलिजे गा ॥
पहुरणें[5] ज दुहिलें । तें तें गुरूं न दुभेंचि व्यालें ।
कां उभें शेत चारिलें । पिकावया नुरे ॥
तसें फोकारितां तप । कीजे जें साक्षेप ।
तें फळीं तंव सोपें[6] । निःशेष जाय ॥...॥
येऱ्हवीं तरी आकाश मांडी । जो गर्जोनि ब्रह्मांड फोडी ।
तो अकाळ मेघ काय घडी । राहात आहे ॥
तैसें राजस तप जें होय । तें फळीं करि वांझ जाय ।
परी आचरणींहि नोहे । निर्वाहतें गा ॥

ज्ञा. १७. २४२–२५२.

---

१ जावें. २ चांगलेपणानें. ३ वेश्या. ४ शृंगार करते. ५ वीईपर्यंत दूध देणारें जनावर. ६ निष्फळ.

## ९२. तामस तप.

केवळ मूर्खपणाचा वारा । जीवीं घेऊनि धनुर्धरा ।
नाम ठेविजे शरीरा । वैरियाचें ॥ . ॥
मायां जळिजती गुगुळ । पाठीं घालिजती गळ ।
आंग जाळिजे इंगळ । जळत भिंता ॥
दवडोनि श्वासोच्छ्वास । कीजती वायांचि उपवास ।
कां घेपती धूमाचे घांस । अधोमुखें ॥
हिमोदकें आकंठें । खडकें सेविजती तटें ।
जितां मांसाचे चिमुटे । तोडिती जेथ ॥
ऐसी नानापरी हे काया । घाय सुतां पैं धनंजया ।
तप कीजे नाशावया । पुढिलांतें ॥
आंगभारें सुटला धोंडा । आपण फुटोनि होय खंडखंडा ।
कां आड जालियातें रगडा । करी जैसा ॥
तैसें आपुलिया आटणिया । सुखें असतयां प्राणियां ।
जिणावयां शिराणियां । कीजती गा ॥
किंबहुना हे वोखटी । घेऊनि क्लेशाची हातवटी ।
तप निफजे तें किरीटी । तामस होय ॥

ज्ञा. १७. २५४--२६२.

---

## ९३ ईश्वराचा अभेदसाक्षात्कार म्हणजेच ईश्वरास शरण जाणें.

पैं आपलेनि भेदेंविण । माझें जाणजे जें एकपण ।
तयाचि नांव शरण । मज येणें गा ॥
जैसें घटाचेनि नाशें । गगनीं गगन प्रवेशे ।
मज शरण येणें तसें । ऐक्यें करी ॥

---

१ समजणें. २ खडकाळ. ३ क्लेशांत घालून. ४ नाश करणें. ५ जिवंत रहाणें. ६ इच्छा. ६ वाईट. ७ प्रकार.

सुवर्णमणि सोनया। ये कल्लोळ जैसा पाणियां।
तैसा मज धनंजया। शरण ये तूं॥
वांचूनि सागराच्या पोटीं। वडवानळ शरण आला किरीटी।
जाळूं न शके तया गोठी। जाली देख पां॥
मजही शरण रिघिजे। आणि जीवित्वेंचि असिजे।
धिग्बोलीं यिया न लजे। प्रज्ञा केवीं॥
अगा प्राकृतां ही राया। आंगीं पडे जें धनंजया।
तें दासिऊं ही कीं तया। समान होय॥
मा मी विश्वेश्वर भेटें। आणि जीवग्रंथि न सुटे।
हे बोल नको वोखटे। कानीं लावूं॥
ह्मणौनि मी होऊनि मातें। सेवणें आहे आयितें।
तैसें करीं हातां येतें। ज्ञानें येणें॥
मग ताकौनियां काढिलें। लोणी मौघौतें ताकीं घातलें।
परि न घेपेंचि कांहीं केलें। तेणें जेवीं॥
तैसें अद्वयत्वें मज। शरण रिघालिया तुज।
धर्माधर्म हे सहज। लागतील ना॥
लोहें उभें खाय माती। तें परिसाचिये संगतीं।
सोनें जालियां पुढतीं। न शिविजे मळें॥
हें असो काष्ठापासोनि। मथूनि घेतलिया वन्हि।
मग काष्ठेंही कोंडोनि। न ठेके जैसा॥
अर्जुना काय दिनकर। देखत आहे आंधार॥
कीं प्रबोधीं होय गोचर। स्वप्नभ्रम॥
तैसें मजसीं एकवटलेया। मी सर्वरूप वांचोनियां।
आन कांहीं उरावया। कारण असे॥
ह्मणौनि तयाचें कांहीं। चिंतीं ना आपुल्या ठायीं।
तुझें पापपुण्य पाहीं। मीचि होईन॥

---

१ लाट. २ येऱ्हवीं ३ यःकश्चित्. ४ पुनः. ५ लोखंड. ६ मंथन करून. ७ सांपडे. ८ जागृतींत.

तेथ सर्वबंधलक्षणें । पापें उरावें दुर्जेपणें ।
तें माझ्या बोधीं वायाणें । होऊनि जाईल ॥
जळीं पडिलिया लवणा । सर्वही जळ होय विचक्षणा ।
तुज मी अनन्यशरणा । होईन तेसा ॥
येतुलेनी आपैसया । सुटलाचि आह्मासी धनंजया ।
घेईं मज प्रकाशौनियां । सोडवीन तूंतें ॥
याकारणें पुढतीं । हें आंधीं न वाहें चित्तीं ।
मज एकासि ये सुमति । जाणोनि शरण ॥

ज्ञा. १८. १३९८--१४१६.

## ९४. कर्मांत नैष्कर्म्यसिद्धि.

आणि उदोअस्ताचेनि प्रमाणें । जैसें न चालतां सूर्याचें चालणें ।
तैसें नैष्कर्मतत्व जाणें । कर्मींचि असतां ॥
तो मनुष्यासारिखा तरी आवडे । परि मनुष्यत्व तया न घडे ।
जैसें जळामाजि न बुडे । भानुबिंब ॥
तेणें न पाहतां विश्व देखिलें । न करितां सर्व केलें ।
न भोगितां भोगिलें । भोग्यजात ॥
येकेचि ठायीं बैसला । परि सर्वत्र तोचि गेला ॥
हें असो विश्व जाहला । आंगेंचि तो ॥

ज्ञा. ४. ९९-१०२.

## ९५. संतांस कर्माचरणाविषयीं आग्रह.

देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले ।
तयांही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥

---

१ व्यर्थ. २ मनोव्यथा. ३ उदय व अस्त. ४ दिसतो.

मार्गी अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा ।
अज्ञाना प्रकटावा धर्म तैसा । आचरोनि ॥
हां गा ऐसें जरी न कीजे । तरी अज्ञाना काय उमजे ।
तिहीं कवणें परी जाणिजे । मार्गातें या ॥
एथ वडील जें जें करिती । तया नाम धर्म ठाविती ।
तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥
हें ऐसें असे स्वभावें । म्हणोनि कर्म न संडावें ।
विशेषें आचरावें । लागे संतीं ॥

ज्ञा. ३. १५५-१५०

---

## ९६. नैष्कर्म्यतत्त्व कोणास सांगावें ?

जें सोंयासें स्तन सेवी । तें पक्कानें कैंवि जेवी ।
म्हणोनि बाळका जैसीं नेदावीं । धनुर्धरा ॥
तैसी कर्मी जया अयोग्यता । तयांप्रती नैष्कर्म्यता ।
न प्रगटावी खेळतां । आदिकरूनि ॥
तथें सत्क्रियाचि लावावी । तेचि एकी प्रशंसावी ।
नैष्कर्मी ही दावावी । आचरोनि ॥
तया लोकसंग्रहालागीं । वर्ततां कर्मसंगीं ।
तो कर्मबंध आंगीं । बाजेल ना ॥
जैसी बहुरूपियाची रावोराणी । स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं ।
परी लोकसंपादणी । तैसीचि करिती ॥

ज्ञा. ३. १७२-१७६.

---

१ डोळस. २ समजेल. ३ श्रेष्ट. ४ कष्टानें. ५ देऊं नयेत. ६ लागणार नाहीं.
७ लोकांमध्यें वर्तणूक.

### ९७. कर्मानें सत्वशुद्धि, व सत्वशुद्धीनें मोक्ष.

जियें यज्ञदानतपादिकें । इयें कर्में आवश्यकें ।
तियें न सांडावीं पंथिकें[1] । पाउलें जैसीं ॥
हारपलें[2] न देखिजे । तंव तयाचा मागु न सांडिजे ।
कां तृप्त न होतां न लोटिजे[3] । भाणें[4] जेवीं ॥
नाव थडी[5] न पवतां । न सांडिजे केळी न फळतां ।
कां ठेविलें न दिसतां । दीप जैसा ॥
तैसी आत्मज्ञानविखीं[6] । जंव निश्चिती नाहीं निकी ।
तंव नोहावें यागादिकीं । उदासीन ॥
तरि स्वाधिकारानुरूपें । तियें यज्ञदानें तपें ।
अनुष्ठावींचि साक्षेपें[7] । अधिकेंवरीं[8] ॥
जें चालणें वेगावत जाये । तो वेग वैसावयाचि होये ।
तैसा कर्मातिशय आहे । नैष्कर्म्यालागीं ॥
अधिकें जंव जंव औषधी । सेवायाची मांडी बांधीं[9] ।
तंव तंव मुकिजे व्याधी । तयाचिये ॥
तैसीं कर्में हातोंपांतीं[10] । जें कीजतीं यथानिगुती ।
तें रजतमें झडतीं । झाडा देऊनि ॥
कां पांठोवाटीं[11] पुटें । भांगारा[12] खार देणें घटे ।
तें कीर झडकरी तुटे । निर्व्याज[13] होय ॥
तैसें निष्ठा केलें कर्म । झाडी करूनि रजतम ।
सत्वशुद्धीचें धाम । डोळां दावी ॥
म्हणौनि धनंजया । सत्वशुद्धी गिंवसी तया ।
तीर्थांचिया सावायां[14] । आलीं कर्में ॥
तीर्थें बाह्य मळ क्षाळे । कर्में अभ्यंतर उजळे[15] ।
एवं तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्में चि

---

१ वाटसरूनें. २ हरवलेलें. ३ दूर करणें. ४ ताट. ५ तीर. ६ विषयीं. ७ यत्नानें. ८ अधिकच. ९ बंधन, निश्चय. १० लवकर. ११ एकामागून एक. १२ सोन्यास. १३ निर्दोष. १४ बरोबरीला. १५ स्वच्छ होतें.

तृषार्ता मरुदेशीं[1] । झळें अमृतें[2] वोळलीं जैसीं ।
कां अंधालागीं डोळ्यांसीं । सूर्य आला ॥
बुडतया नदीच धाविन्नली । पडतया पृथ्वीच कळवळिली ।
निमतया[3] मृत्यूनें दिधली । आयुष्यवृद्धि ॥
कर्मे कर्मबद्धता । मुमुक्षु सोडविले पंडुसुता ।
जैसा रसरीती[4] मरतां । राखिला विषें ॥
तैसीं एके हातवटिया[5] । कर्मे कीजतीं धनंजया ।
बंधकेंचि सोडवावया । मुख्य होतीं ॥

ज्ञा. १८. १४९-१६४.

---

## ९८. ईश्वरज्ञानावांचून त्रयीधर्म निष्कारण होत.

देख पां गा किरीटी । आश्रमधर्मांचिया रहाटी ।
विधिमार्गा कसवटी[6] । जे आपणचि होती ॥
यजन करितां कौतुकें । तिही वेदांचा माथा तुके[7] ।
क्रिया फळेंसी उभी ठाके । पुढां जया ॥
ऐसे दीक्षित जे सोमप । जे आपणचि यज्ञाचें स्वरूप ।
तिहीं तया पुण्याचेनि नांवें पाप । जोडिलें देखें ॥
जे श्रुतित्रयातें जाणोनि । शतवरी[8] यज्ञ करूनि ।
यजिलिया मातें चुकोनि । स्वर्गा वरिती ॥
जैसें कल्पतरूतळवटीं । बैसोनि झोळिये देतसे गांठी ।
मग निदैव निघे किरीटी । दैन्यचि[9] करूं ॥...॥
म्हणोनि मजवीण पाविजे स्वर्ग । तो अज्ञानाचा पुण्यमार्ग ।
ज्ञानिये तयातें उपसर्ग[10] । हानि म्हणती ॥
येऱ्हवीं तरी नरकींचें दुःख । पावोनि स्वर्गा नाम कीं सुख ।
वांचूनि नित्यानंद गा निर्दोख । तें स्वरूप माझें ।

---

१ मारवाडांत. २ उदकें. ३ मरणाऱ्याला. ४ रसायनाच्या योगें. ५ हातोटीं, युक्ति. ६ कसाची शिळा. ७ डोले. ८ शंभरपर्यंत. ९ भिक्षा मागण्यास. १० विघ्न.

मज येतां पैं सुभटा । या द्विविधा गा अडहांटा[1] ।
स्वर्ग नरक या वाटा । चोरांचिया ॥
स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे । पापात्मकें पापें नरका जाइजे ।
मग मातें जेणें पाविजे । तें शुद्धपुण्य ॥
आणि मजचि माजीं असतां । जेणें मी दुऱ्हावे[2] पंडुसुता ।
तें पुण्य ऐसें म्हणतां । जीभ न तुटे काई ॥...॥
मग मी न पविजे ऐसें । जें पापरूप पुण्य असे ।
तें साधलेनि सौरसें[3] । स्वर्गा येती ॥...॥
मग तया पुण्याची पाउठी[4] सरे । सवेंचि इंद्रपणाची उटी[5] उतरे ।
आणि येऊं लागती माघारें । मृत्युलोकां ॥
जैसा वेश्याभोगीं कवडा वेंचे । मग दारही चेपूं न ये तियेचें ।
तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें । काय सांगो ॥...॥
अर्जुना वेदविद जरी जहला । तरी मातें नेणतां वायां गेला ।
कण सांडूनि उपणिला[6] । कोंडा जैसा ॥
म्हणऊनि मज एकेंविण । हे त्रयीधर्म अकारण ।
आतां मातें जाणोनि कांहीं नेण । तूं सुखिया होसी ॥

ज्ञा. ९. २०७–२३४.

---

## ९९. स्वधर्म हाच कामधेनु होय.

आतां येचि विषयीं पार्था । तुज सांगेन एक मी कथा ।
जैं सृष्टयादि संस्था[7] । ब्रह्मेनें केली ॥
तैं नित्ययागसहितें । सृजिलीं भूतें समस्तें ।
परि नेणतींचि तियें यज्ञातें । सूक्ष्म म्हणउनी ॥
ते वेळीं प्रजीं विनविला ब्रह्मा । देवा काय आश्रयो येथ आम्हां ।
तंव म्हणे तो कमलजन्मा । भूतांप्रति ॥

---

१ अडमार्ग. २ दूर होतो. ३ योग्यतेनें, बळानें. ४ पायरी. ५ अधिकार, तेज. ६ पाखडला. ७ व्यवस्था.

तुम्हां वर्णाविशेषवशें । आम्हीं हा स्वधर्म विहिला[1] असे ।
यातें उपासा मग आपैसे । पुरती काम ॥
तुम्हीं व्रत नियम न करावे । शरीरातें न पीडावें ।
दूरि केंही न वचावें[2] । तीर्थासि गा ॥
योगादिकें साधनें । साकांक्षें[3] आराधनें ।
मंत्र यंत्र विधानें । झणीं करा[4] ॥
देवतांतरा न भजावें । हें सर्वथा कांहीं न करावें ।
तुम्ही स्वधर्मयज्ञीं यजावें । अनायासें ॥
अहेतुकें[5] चित्तें । अनुष्ठा पां यातें ।
पतिव्रता पतीतें । जियापरी
तैसा स्वधर्मरूप मख । हाचि सेव्य तुम्हां येक ।
ऐसें सत्यलोकनायक । बोलता जाहला ॥
देखा स्वधर्मातें भजाल । तरी कामधेनु हा होईल ।
मग प्रजा हो न संडील । तुमतें कदा ॥

ज्ञा. ३. ८५-९४.

---

## १००. अहंकारविरहित कर्मयोग.

तरि महायागप्रमुखें । कर्मे निफजतांही अचुकें ।
कर्तेपणाचें न ठाके । फुंजणें[6] आंगीं ॥
जो मोलें तीर्था जाये । तया मी यात्रा करित आहे ।
ऐसिये श्लाघ्यतेचा[7] नोहे । तोष जेवीं ॥
कां मुद्रा समर्थाचिया । जो एकवटु[8] झोंबे राया ।
तो मी जिणता ऐसिया । न येचि गर्वा[9] ॥
जो कांसे लागोनि तरे । तया पोहती ऊर्मि नुरे ।
पुरोहित नाविष्करे[10] । दातेपणें ॥

---

१ नियमित केला. २ जावें. ३ कामनिक, सकाम. ४ करूं नका. ५ निष्काम. ६ गर्व. ७ स्तुतीचा. ८ एकटा. ९ अहंकार. १० अविर्भाव आणीत नाहीं.

तैसें कर्तृत्व अहंकारें । नेघोनि यथाअवसरें ।
कृत्यजातांचें मोहरे । सारिजती ॥
केल्या कर्मा पांडवा । जो आथी फळाचा यावो[1] ।
तया मोहरा हों नेदावा । मनोरथ ॥
आधींचि फळीं आसतुटिया । कर्में आरंभावीं धनंजया ।
परावें बाळ धाया[2] । पाहिजे जैसें ॥
पिंपरुवांचिया[3] आशा । न शिंपिजे पिंपळ जैसा ॥
तैसिया फळनिराशा । किजती कर्में ॥
सांडूनि दुधाची टकळी[4] । गोवारी गांवधेनु वेंटाळी ।
किंबहुना धर्म फळीं । तैसें कीजे ॥
ऐसी हे हातवटी[5] । घेउनी जे क्रिया उठी ।
आपण आपुलिया गांठीं । लाहेचि तो ॥
म्हणोनि फळीं लाग[6] । सांडोनि देहसंग ।
कर्में करावीं हा चांग । निरोप माझा ॥

ज्ञा. १८. ११६–१७६.

## १०१. फलाशेचा त्याग.

नातरि हेंही तुज । नेदवे[7] कर्म मज ।
तरी तें तूं बुज[8] । पांडुकुमरा ॥
बुद्धीचिये पाठीं पोटीं । कर्मा आदि कां शेवटीं ।
मातें बांधणें किरीटी । दुवाड[9] जरी ॥
तरि हेंही असो । सांडीं माझा अतिसो ।
परि संयतिसीं[10] वसो । बुद्धि तुझी ॥
आणि जेणें जेणें वेळे । घडतीं कर्में सकळें ।
तयांचीं तियें फळें । त्यजित जाय ॥

---

१ प्राप्ति. २ दाईनें. ३ पिंपळाचें फळ. ४ इच्छा. ५ रीति, युक्ति. ६ संबंध. ७ देतां येत नाहीं. ७ समज. ९ कठीण. १० नियम, निश्चय.

वृक्ष कां वेली । लोटतीं फळें आलीं ।
तैसीं सांडी निपजलीं । कर्में सिद्धें ॥
परि मात मनीं धरावें । कां मज उद्देशें करावें ।
हें कांहीं नको आघवें । जाऊ दे शून्यीं ॥
खडकीं जैसें वर्षलें । कां आगीमाजी पेरिलें ।
कर्म मानीं देखिलें । स्वप्न जैसें ॥
अगा आत्मजेच्या विषीं । जीव जसा निरभिलाषी ।
तैसा कर्मीं अशेषीं । निष्काम होईं ॥
वन्हीची ज्वाळा जैसी । वायां जाय आकाशीं ।
क्रिया जिरों दे तैसी । शून्यामाजी ॥
अर्जुना हा फलत्याग । आवडे कीर[1] असलग[2] ।
परि योगांमाजी योग । धुरेचा हा ।

ज्ञा. १८. १२५–१३४.

---

## १०२. कर्माचें ईश्वरार्पणत्व.

तें क्रियाजात आघवें । जैसें निपजेल आघवें ।
तें भावना करोनि करावें । माझिया मोहरा ॥
परि सर्वथा आपुलें जीवीं । केलियाची से[3] कांहींचि नुरवी ।
ऐसी धुवोनि कर्में द्यावीं । माझिया हातीं ॥
मग अग्निकुंडें बीजें पातलीं । तियें अंकुरदशे जेवीं मुकलीं ।
तेवीं न फळतीं चि मज अर्पिलीं । शुभाशुभें ॥...॥
तें उगाणिलें[4] मज कर्म । तेव्हांचि पुसिलें मरणजन्म ।
जन्मासवें श्रम । वराचिलही गेले ॥
म्हणऊनि अर्जुना यापरी । पाहेचा[5] वेळ नव्हेल भारी ।
हे संन्यासयुक्ति सोपारी[6] । दिधली तुज ॥

---

१ खरोखर. २ साधारण. ३ आठवण. ४ हवालीं केलें. ५ उद्यांचा.
६ सोपी.

या देहाचिये बांदोडीं[1] न पडिजे। सुखदुःखांचिया सागरीं न बुडिजे।
सुखें सुखरूपा घडिजे। माझियाचि आंगा ॥

ज्ञा. ९. ४००–४०६.

---

## १०३ कर्में ईश्वरार्पण केल्यानें ईश्वरप्राप्ति

कां अभ्यासाही लागीं। कसे[2] नाहीं तुझिया आंगीं।
तरि आहासि जया भागीं। तैसाचि अस ॥
इंद्रियें न कोंडीं। भोगातें न तोडीं।
अभिमान न सांडीं। स्वजातीचा ॥
कुळधर्म चाळीं[3]। विधिनिषेध पाळीं।
मग सुखें तुज सरळी[4]। दिधली आहे ॥
परि मनें वाचा देहें। जैसा जो व्यापार होये।
तो मी करीत आहे। ऐसें न म्हणें ॥
करणें कां न करणें। हें आघवें तोचि जाणें।
विश्व चळतसें जेणें। परमात्मेनि ॥...॥
म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ति। इयें वोझीं नेघे मती।
अखंड चित्तवृत्ति। माझ्या ठायीं ॥
येऱ्हवीं तरी सुभटा। उंजू[5] कां अव्हांटा।
रथ काई खटपटा। करित असे।
आणि जें जें कर्म निपजे। तें थोडें बहु न म्हणिजे।
निवांताचि अर्पिजे। माझ्या ठायीं ॥
ऐसिया मद्भावना। तनुत्यागीं अर्जुना।
तूं सायुज्यसदना। माझिया येसी ॥

ज्ञा. १२. ११४–१२४.

---

१ बंधन. २ बळ. ३ आचरण कर. ४ मोकळीक. ५ ऋजु, सरळ.

## १०४. स्वकर्मकुसुमांनीं विश्वात्मक ईश्वराची पूजा.

येणें जग हें समस्त । आंत बाहेरीं पूर्ण भरित ।
जालें आहे दीपजात । तेजें जैसें ॥
तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा ।
पूजा केली होय अपारा । तोषा[1]लागीं ॥
म्हणौनि तिये पूजे । रिझ[2]लेनि आत्मराजें ।
वैराग्यसिद्धि देइजे । पैसाय तया ॥
जिये वैराग्यदशे । ईश्वराचेनि वेधवशें ।
हें सर्वही नावडे जैसें । वांत होत ॥
प्राणनाथाचिया आधीं । विरहिणीतें जिणेंही बाधी ।
तेसें सुखजात त्रिशु[3]द्धि । दुःखचि लागे ॥
सम्यग्ज्ञान नुदैजतां । वेधेंचि तन्मयता ।
उपजे ऐसी योग्यता । बोधाची लाहे ॥
म्हणौनि मोक्षलाभासाठीं । जो व्रतें वाहतसे आंगीं ।
तेणें स्वधर्मु आस्थां[4] चांगी । अनुष्ठावा ॥

ज्ञा. १८. ९१६--९२२.

---

## १०५. प्रकृतिपासून सत्वरजतमांची उत्पत्ति.

तरि सत्वरजतम । तिघांसि हें नाम ।
आणि प्रकृति जन्म-।भूमिका यया ॥...॥
हें एकेचि वृत्तीच्या ठायीं । त्रिगुणत्व आवडे पाहीं ।
वयसात्रय देहीं । येकीं जेवीं ॥
कां मीनलेनि कीडें । जंव जंव तु[5]क वाढे ।
तंव तंव सोनें हीन पडे । पांचि[6]कां कसीं ॥...॥

---

१ संतुष्ट होऊन. २ प्रसाद. ३ निश्चयेंकरून. ४ श्रद्धेनें. ५ वजन. ६ पांच रुपये तोळा, हीनकस.

जैसी मीनाच्या तोंडीं । पडेना जंव उंडी ।
तंव गळ आसुडी । जळपारधी ॥
तेवीं सत्वें लुब्धकें[1] । सुखज्ञानाचीं पाशकें ।
वोढिजती मग खुडुके[2] । मृग जैसा ॥
मग ज्ञानें चडफडी । जाणिवेचे खुरें[3] खोंडी ।
स्वयंसुख हें धाडी । हातींचें गा ॥
तेव्हां विद्यामानें तोखे । लाभमात्रें हरिखे ।
मी संतुष्ट हेंही देखे । श्लाघों लागे ॥
म्हणे भाग्य ना माझें । आजि सुखियें नाहीं दुजें ।
विकाराष्टकें फुंजे[4] । सात्विकाचेनी ॥
आणि येणेंही न सरे । लांकणें[5] लागे दुसरें ।
जें विद्वत्तेचें भरे । भूत आंगीं ॥
आपणचि ज्ञानस्वरूप आहे । तें गेलें हें दुःख न वाहे ।
कीं विषयज्ञानें होये । गगनायेवढा
ज्ञा. १४. १३९–१५४.
हें रज याचि कारणें । जीवातें रंजवूं जाणें ।
हें अभिलाखाचें तरुणें । सदाचि गा ॥...॥
घृतें आंबुखूनि[6] आगियाळें[7] । वज्राग्नीतें[8] सांदुंकिलें[9] ।
आतां बहु थेंकुलें । आहे तेथ ॥
तैसी खवळे चाड । होय दुःखासकट गोड ।
इंद्रश्रीही सांकडें[10] । गमों लागे ॥
तैसी तृष्णा वाढिनलिया । मेरूही हाता आलिया ।
तऱ्ही म्हणें पखादिया । दारुणा वळंघों[11] ॥
जीविताची कुरौंडी । वोवाळूं लागे कवडी ।
मानी तृणाचिये जोडी । कृतकृत्यता ॥

---

१ पारध्यानें. २ तडफडतो. ३ लाथा मारतो ४ अभिमान घेतो. ५ बंधन. ६ अभ्युक्षण करून, शिंपडून. ७ अग्निकुंड. ८ विजेच्या अग्नीला. ९ संवर्षण केलें, पेटविलें. १० संकट. ११ प्रवृत्त व्हावें.

आजि असतें वेंचिजेल । परि पाहें पां काय कीजेल ।
ऐसां पांगी वडील । व्यवसाय मांडी ॥
म्हणे स्वर्गा हन जावें । तरि काय तेथें खावें ।
ह्यालागीं धांवे । याग करूं ॥...॥
पैं ग्रीष्मांतींचा वारा । विसावों नेणे वीरा ।
तैसा न म्हणे व्यापारा । रात्रंदिवस ॥
काय चंचळ मासा । कामिनीकटाक्ष जैसा ।
लवलाहो तैसा । विजूही नाहीं ॥
तेतुलेनि गा वेगें । स्वर्गसंसारपांगें ।
आगिमाजि रिगे । क्रियांचिये ॥

ज्ञा. १४. १६१–१७२

हें रजोगुणाचें दारुण । देहीं देहियासि बंधन ।
परिस आतां विंदाण । तमाचें तें ॥...॥
अज्ञानाचें जियालें । जया एका लागलें ।
जेणें विश्व भुललें । नाचत असे ॥
अविवेकमहामंत्र । जें मौढ्यमद्याचें पात्र ।
हें असो मोहनास्त्र । जीवांसि जें ॥...॥
सर्वेंद्रियां जाड्य । मनामाजी मौढ्य ।
माल्हाती दार्ढ्य । आलस्याचें ॥
आंगें आंग मोडामोडी । कार्यजातीं अनावडी ।
नुसती परवडी । जांभयांची ॥
उघडियाची दिठी । देखणें नाहीं किरीटी ।
नाळवितांचि उठी । वो म्हणौनि ॥
पडिलिये धोंडीं । नेणे कान मुरडी ।
तयाचि परी मुरकुंडी । उकलूं नेणे ॥

१ आशेनें. २ कौशल्य. ३ आश्रय करितात. ४ रेलचेल. ५ हांक न मारतांच.

पृथ्वी पाताळीं जावो । कां आकाश हि वरी येवो ।
परि उठणें हा भावो । उपजों नेणे ॥
उचितानुचित आघवें । झांसुरेतां नाठवे जीवें ।
जेथिंचा तेथ लोळावें । ऐसी मेधा ॥
आणि निद्राविषयीं चांग । जीवीं आथि लाग ।
झोंपीं जातां स्वर्ग । वावो म्हणे ॥
ब्रह्मायु होइजे । मा निजेलियाचि असिजे ।
हें वांचुनि दुजें । व्यसन नाहीं ॥
वाटे जातां वुगें । कल्हांतांही डोळा लागे
अमृतही परी नेघे । जरि निद आली ॥
तोंवंचि आक्रोशबळें । व्यापारें कोणे एके वेळे ।
निगाले तरी आंधळें । रोषें जैसें ॥
केधवां कैसें राहाटावें । कोणेसीं काय बोलावें ।
हें ठाकतें कीं नांगवें । हेंही नेणे ॥
वणवा मियां आघवा । पांखें पुसोनि घेयावा ।
पतंग या हांवा । घाली जेविं ॥
तैसा वळघे साहसा । अकरणींचि धिवसा ।
किंबहुना ऐसा । प्रमादु रुचे ॥
एवं निद्रालस्यप्रमादीं । तम इया त्रिबंधीं ।
बांधे निरुपाधि । चोखटातें

ज्ञा. १४. १७४–१९४.

---

## १०६. निस्त्रैगुण्यानें स्वरूपदर्शन

ऐसी मुक्ति असे सहज । तें आतां परिसऊं तुज ।
जें तूं ज्ञानांबुज– । द्विरेफ कीं ॥...॥

---

१ स्वस्थ पडला असतां. २ इच्छा. ३ खोटा. ४ लवंडत असताना. ५ क्रोधानें ६ साध्य होतें. ७ स्वाधीन होत नाहीं. ८ धैर्य. ९ ज्ञानरूप कमलावरचा भ्रमर.

कां नटलेनि लाघवें[1] । नट जैसा नें[2] झंकवे[2] ।
तैसें गुणजात देखावें । न होनियां ॥...॥
सत्वरजतमांच्या । भेदीं प्रसर[3] कर्मांचा ।
होत असे तो गुणांचां । विकार हा ॥
ययामाजि मी ऐसा । वनीं कां वसंत जैसा ।
वनलक्ष्मीविलासा । हेतुभूत ॥
कां तारांगणीं लोपावें । सूर्यकांतीं उद्दीपावें ।
कमळीं विकासावें । जावें तमें ॥
यया कोणाचें कांहीं । सविता जैसा देखत नाहीं ।
तैसा अकर्ता मी देहीं । सत्तारूप ॥...॥
ऐसेनि विवेकें जया । उदय होय धनंजया ।
ये गुणातीतता तया । ऊर्ध्वपंथें ॥
आतां निर्गुण असे आणिक । तें तो जाणे अचुक ।
जें ज्ञानें केलें टीकें[4] । तयाचिवरी ॥
किंबहुना पंडुसुता । ऐसी तो माझी सत्ता ।
पावे जैसी सरिता । सिंधुत्व गा ॥
नळिकेवरूनि उठिला । जैसा शुक शाखे बैसला ।
तैसा मूळ अहंता ठाकिला[5] । तो मी म्हणौनि ॥
अगा अज्ञानाचिया निदा । जो घोरत होता बदबदा ।
तो स्वरूपीं प्रबुद्धा । चेइला[6] कीं ॥
पैं बुद्धिभेदाचा आरिसा । तया हातोनि पडिला वीरेशा ।
म्हणौनि प्रकृतिमुखाभासा । मुकला तो ॥
देहाभिमानाचा वारा । आतां वाजों[7] ठेला वीरा ।
तें ऐक्य वीचिसागरां[8] । जीवेशां हें ॥
म्हणौनि मद्भावेसीं । प्राप्ति पाविजे तेणें सरिसी ।
वर्षांतीं आकाशीं । घनजात जेवीं ॥

१ ठकबाजीनें. २ फसला जात नाहीं. ३ विस्तार. ४ मोत्यांचा झुबका. ५ प्राप्त झाला. ६ जागा झाला. ७ वाहण्याचा. ८ लाट व समुद्र.

तोवं मी होऊनि निरुता । मग देहींचि ये असतां ।
नागवे[1] देहसंभूतां । गुणांसि तो ॥
जैसा भिंगाचेनि घरें । दीपप्रकाश नावरे ।
कां विझेंचि सागरें । वडवानळ ॥
तैसा आलागेला गुणांचा । बोधु न मैळे तयाचा ।
तो देहीं जैसा व्योमींचा । चंद्र जळीं ॥
तिन्ही गुण आपुलालिये प्रौढी । देहीं नाचविती बागडीं[2] ।
तो पाहोंही न धाडी । अहंतेतें ॥
हा ठायवरी । नेहटोनि ठेला अंतरीं ।
आतां काय वर्ते शरीरीं । हेंही नेणे ॥
सांडूनि आंगींची खोळी । सर्प रिगालिया पाताळीं ।
ते त्वचा कोण सांभाळी । तैसें जालें ॥
कां सौरभ्यजीर्ण[3] जैसा । आमोद मिळोन जाय आकाशा ।
माघारा कमळकोशा । न येचि तो ॥
पैं स्वरूपसमरसें । तयाही गा जालें तैसें ।
तेथ किंधर्म हें कैसें । नेणे देह ॥

ज्ञा. १४. २८७–३१५.

---

## १०७. वैराग्यानें अश्वत्थवृक्षाचें छेदन.

परि तेंचि लीला परजेवे[4] । तैसें वैराग्याचें नवें ।
अभंगबळ होआवें । बुद्धीसि गा ॥
उठिलेनि वैराग्यें जेणें । हा त्रिवर्ग[5] ऐसेनि सांडणें ।
जैसें वमुलिया सुणें[6] । आतांचि गेलें ॥
हा ठायवरी पांडवा । पदार्थजातीं आघवा ।
विटवी तो होआवा । वैराग्यलाठु[7] ॥

---

१ स्वाधीन होत नाहीं. २ सोंगें. ३ ज्याचें सौरभ्य जीर्ण झालें आहे असा. ४ धारण करणें. चालवणें. ५ तिन्ही लोक. ६ कुत्रें. ७ बळकटपणा.

मग देहाहंतेचें दळें[1] । सांडूनि एकेचि वेळे ।
प्रत्यक्बुद्धिकरतळें । हातवसोवें[2] ॥
निसिलें[3] विवेकसाहाणें । जें ब्रह्माहमस्मि बोधें सणाणें[4] ।
मग पुरतेनि बोधें उटणें[5] । एकलेंचि ॥
परि निश्चयाचें मुष्टिबळ । पाहावें एक दोन वेळ ।
मग तुळावें अतिचोखाळ । मननवरी ॥
पाठीं हातियेरां आपणयां । निदिध्यासें एक जालिया ।
पुढें दुजें नुरेल घाया —। पुरतें गा ॥
तें आत्मज्ञानाचें खांडें[6] । अद्वैतप्रभेचें निवाडें ।
नेदील उरों कवणेकडे । भववृक्षासी ॥...॥
तेव्हां उर्ध्व कां अधोमूळ । कां आधींचें हन शाखाडाळ ।
तें कांहींचि न दिसे मृगजळ । चांदिणां जेवीं ॥

ज्ञा. १५. २५५—२६५.

---

## १०८. कामक्रोधलोभांच्या निर्मूलनानें आत्मसाक्षात्कार.

आणि दंभादि दोष साही । हे संपूर्ण जयांच्या ठायीं ।
ते त्यजावे हें काई । म्हणों कीर ॥
परि काम क्रोध लोभ । या तिहींचेंचि थोंबें ।
थांवे तेथें अशुभ । पिकलें जाण ॥
सर्वदुःखां आपुलिया । दर्शना धनंजया ।
पाढाऊं[9] हे भलतया । दिधले आहाती ॥
कां पापियां नरकभोगीं । सुवावयालागीं जगीं ।
पातकांची दाटुंगी[10] । सभाचि हे ॥
ते रौरव[11] गा तंवचि वरी । आइकिजती पटांतरीं[12] ।
जंव हे तिन्ही अंतरीं । उठती ना ॥ ..॥

---

१ तरवारीचें म्यान. २ हस्तगत करून घ्यावें. ३ घासणें, पाजळणें. ४ तीक्ष्ण. ५ घासणें. ६ तरवार, शस्त्र. ७ बंड. ८ स्थिरावे. ९ वाटाडे. १० बलिष्ठ. ११ नरकविशेष. १२ परोक्षत्वानें.

काय बहु बोलूं सुभटा । सांगितलिया निकृष्टा
नरकाचा दारवंठा[१] । त्रिशंकु हा ॥
या कामक्रोधलोभां-। माजि जीवें जो होय उभा ।
तो निरय[२]पुरींची सभा । येथ पावे ॥...॥
धर्मादिकां चौहीआंत । पुरुषार्थांची तैंचि मातें[३] ।
करावी जैं संघात । सांडील हा ॥
हे तीन्ही जीवीं जंव जागती । तंववरी निकियाची[४] प्राप्ति ।
हे माझे कान नाइकती । देवही म्हणे ॥
जया आपणपें पढियें[५] । आत्मनाशा जो बिहे ।
तेणें न धरावी हे सोये । सावध होइजे ॥
पोटीं बांधोनी पाषाण । समुद्रीं बाहीं आंगवण ।
कां जियावया जेवण । काळकूटाचें ॥
इहीं कामक्रोधलोभेंसी । कार्यसिद्धि जाण तैसी ।
म्हणोनि ठावोचि पुसीं । ययांचा गा ॥...॥
त्रिदोषीं[६] सांडिलें शरीर । त्रिकुटीं[७] फिटलिया नगर ।
त्रिदाहें[८] निमालिया अंतर । जैसें होय ॥
तैसा कामादिकीं तिघीं । सांडिला सुख पावोनि जगीं ।
संग लाहे मोक्षमार्गीं । सज्जनांचा ॥
मग सत्संगें प्रबळें । सच्छास्त्राचेनि बळें ।
जन्ममृत्यूचीं निमाळें[९] । निस्तरे रानें ॥
ते वेळीं आत्मानंदें आघवें । जें सदा वसतें बरवें
तें तैसेंचि पाटण[१०] पावे । गुरुकृपेचें ॥
तेथ प्रियाची परमसीमा । तो भेटे माउली[११] आत्मा ।
तये खेंवां[१२] आटे डिंडिमा[१३] । सांसारिक हे ॥

---

१ उंबरठा. २ नरक. ३ गोष्ट. ४ हिताची. ५ आवडतें. ६ वात, कफ. ७ चोरी, चहाडी, शिंदळकी. ८ आध्यात्मिक, आधिदैविक, आधिभौतिक ताप. ९ बरड. १० शहर. ११ आई. १२ आलिंगन, क्षण. १३ गलबला.

ऐसा जो कामक्रोधलोभां । झाडी करूनि ठाके उभा ।
तोचि येवढिया लाभा । गोसावी[1] होय ॥

ज्ञा. १६. ४२४–४४४

---

# ४. साक्षात्कार

## १०९. पंथराज.

ऐसें विवरोनियां[2] श्रीहरी । म्हणातिलें तिये अवसरीं[3] ।
अर्जुना हा अवधारी । पंथराज ॥
तेथ प्रवृत्तितरूच्या[4] बुडीं । दिसती निवृत्तिफळाचिया[5] कोडी[6] ।
जिये मार्गींचा कापडी[7] । महेश आझुनी ॥
पैं योगिवृंदें[8] वहिलीं । आडवीं[9] आकाशीं निघालीं ।
कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं । धोरण[10] पडला ॥
तिहीं आत्मबोधाचेनि उजुकारें[11] । धांव घेतली एकसरें[12] ।
कीं येर सकळ मार्ग निदसुरे[13] । सांडूनियां ॥
पाठीं[14] महर्षी येणें आले । साधकांचे सिद्ध जाहाले ।
आत्मविद थोरावले । येणेंचि पंथें ॥
हा मार्ग जैं देखिजे । तैं ताहानभूक विसरिजे ।
रात्रिदिवस नेणिजे । वाटे इये ॥
चालतां पाउल जेथ पडे । तेथ अपवर्गाची[15] खाणी उघडे ।
आव्हांटलिया[16] तरी जोडे । स्वर्गसुख ॥

---

१ स्वामी. २ विवरण करून. ३ वेळेला. ४ संसारवृक्षाखालीं. ५ मोक्षफल. ६ राशी. ७ यात्रेकरू. ८ समुदाय. ९ आडव्या तिडव्या मार्गानें. १० रहदारीचा रस्ता. ११ सरळमार्गानें. १२ एकसारखी. १३ अज्ञानांतील. १४ नंतर. १५ मोक्षाची. १६ आडमार्गास गेलें असतां.

निगिजे[1] पूर्वीलिया मोहरा[2] । कीं येइजे पश्चिमेचिया घरा ।
निश्चळपणें धनुर्धरा । चालणें एथिचें ॥
येणें मार्गें जया ठायां जाइजे । तो गांव आपणचि होइजे ।
हें सांगों काय सहजें । जाणसी तूं ॥

ज्ञा. ६. १५२–१६०.

---

## ११० चार मार्गांचें दिग्दर्शन.

कोणी एक सुभटा[3] । विचाराच्या आगिटा[4] ।
आत्मानात्मकिटा[5] । पुटें देउनी ॥
छत्तीसही वानीभेद[6] । तोडोनि निर्विवाद ।
निवडती शुद्ध । आपणपें ॥
तया आपणपयाच्या पोटीं । आत्मध्यानाचिया दिठी ।
देखती गा किरीटी । आपणपेंची ॥
आणि पैं दैववगें[7] । चित्त देती सांख्ययोगें ।
एक ते अंगलगें[8] । कर्माचेनी ॥...॥
येणें येणें प्रकारें । निस्तरिती साचोकारें[9] ।
हें भवकाउरें[10] । आघवेंची ॥
परि तें करिती ऐसें । अभिमान दवडूनि देशें ।
एकाचिया विश्वासें । टेंकती[11] बोला ॥
जे हिताहित देखती । हानिकणवा[12] घेपती ।
पुसोनि शीण हरिती । देती सुख ॥
तयाचेनि मुखें निघे । तेतुलें आदरें चांगें ।
ऐकोनियां आंगें । मनें होती ॥

---

१ निघावें. २ मार्गानें. ३ उत्तम योद्धया, अर्जुना. ४ आगींत. ५ आत्मा-त्मचर्चारूपी हिणकस धातु. ६ कसाचे भेद. ७ दैवयोगानें. ८ आश्रयानें. ९ खरोखर. १० भवभय. ११ आश्रय करतात. १२ दुःखाबद्दल दया.

तया ऐकणेयाचेनि नांवें । ठेवती गा आघवें ।
तया अक्षरांसी जीवें । लोण[1] करिती ॥
तेही अंतीं कपिध्वजा । इया मरणार्णवसमाजा-[2]।
पासूनि निघती वोजा[3] । गोमटेया[4] ॥

ज्ञा. १३. १०३७-१०४७.

---

## १११ ईश्वरास भजल्यावांचून गत्यंतरच नाहीं.

यालागीं शतजर्जर[5] नांवे । रिगोनि केविं निश्चिंत[6] होआवें ।
केसैंनि उघडिया असावें । शस्त्रवर्षीं[7] ॥
अंगावरी पडतां पाषाण । न सुवावें[8] कांवि वोडण[9] ।
रोगें दाटलीं[10] आणि उदासपण । वोखदेंसीं ॥
जेथ चहुंकडे जळत वणवा । तेथूनि न निगिजे केविं पांडवा ।
तेविं लोकां येऊनि सोपद्रवा । केविं न भजिजे मातें ॥
अगा मातें न भजावयालागीं । कवण बळ पां आपुलिया अंगीं ।
काइ घरीं कीं भोगीं । निश्चिती केली ॥
ना तरी विद्या कीं वयसा । यया प्राणियांसी हा ऐसा ।
मज न भजतां भरंवसा । सुखाचा कोण ॥

ज्ञा. ९. ४९०-४९४.

---

## ११२ ईश्वरप्राप्तीनेंच दुःखनिवृत्ति.

बाप दुःखाचें कणें[11] सुटलें । जेथ मरणाचे भरे[12] लोटले[13] ।
तिये मृत्युलोकींचे शेवटिले । हाटवेळे[14] येणें जाहालें ॥

१ निंबलोण करतात. २ मृत्युरूपी समुद्रसमुदायांतून. ३ रीतीनें. ४ चांगल्या. ५ शेकडो भोकें असलेल्या. ६ निर्धास्त. ७ शस्त्राच्या वर्षावांत ८ घालावें, पुढे करावें. ९ ढाल. १० ग्रस्त झाला. ११ माल. १२ एक भरा म्हणजे ( १६० ) पायल्या. १३ टाकले. १४ बाजाराची वेळ.

आतां सुखेंसी जीविता । कैंची ग्राहिकी[1] कीजेल पंडुसुता ।
काय राखोंडी फुंकितां । दीप लागे ॥
अगा विषाचे कांद वांटुनी । जो रस घेईजे पिळुनी ।
तया नांव अमृत ठेउनी । जैसें अमर होणें ॥
तैसें विषयांचें जें सुख । तें केवळ परम दुःख ।
परि काय कीजे मूर्ख । न सेवितां[2] न सरे ॥...॥
म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी[3] । ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं ।
कैंची सुखनिद्रा आंथरुणीं । इंगळांच्या[4] ॥
जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी । जेथ उदय होय अस्तालागीं ।
दुःख लेऊनि सुखाचीं आंगी[5] । साळित[6] जगातें ॥
जेथ मंगळाचिया अंकुरीं । सवेंचि अमंगळाची पड पोरी[7] ।
मृत्यु उदराचिया परिवरीं[8] । गर्भ गिवसी ॥...॥
अगा गिवसितां आघवां वाटीं । परतलें पाउलचि नाहीं किरीटी ।
सैंघ[9] निमालियांचिया गोष्टी । तियें पुराणें जेथिंचीं ॥...॥
ऐसी लोकींची जिये नांदणूक । तेथ जन्मले आथि जे लोक ।
तयांचिये निश्चिंतीचें[10] कौतुक । दिसत असे ॥...॥
जंव जंव बाळ बळिया वाढे । तंव तंव भोजें[11] नाचती कोडें ।
आयुष्य निमालें आंतुलियेकडे[12] । ते ग्लानीचि[13] नाहीं ॥
जन्मलियां दिवसदिवसें । हों लागे काळाचियाचि ऐसें ।
कीं वाढती[14] करिती उल्हासें । उभविती गुढिया ॥
अगा मर हा बोल न साहती । आणि मेलिया तरी रडती ।
परि असतें[15] जात न गणिती । गाहिंसपणें[16] ॥
दर्दुर सापें गिळिजत आहे उभा । कीं तो मासिया वेंटाळी[17] जिभा ।
तैसें प्राणिये कवण लोभा । वाढविती तृष्णा ॥

१ गिराइकी. २ सेवन केल्याशिवाय राहात नाहीं ३ गोष्ट. ४ निखाऱ्यांच्या. ५ आंगरखा. ६ छळत आहे. ७ धान्यावर पडणारी कीड. ८ घरांत. ९ पुष्कळ, सर्व. १० बेफिकीरपणाचे. ११ संतोषानें. १२ आंतून. १३ खंती. १४ वाढदिवस. १५ असलेलें (आयुष्य) जात असतां. १६ मूर्खपणानें. १७ धरतो.

अहा कटकटा हें वोखटें । इये मृत्युलोकींचें उफराटें ।
येथ अर्जुना जरी अवचटें । जन्मलासी तूं ॥
तरि झडझडोनि वाहिला निघ । इये भक्तीचिये वाटे लाग ।
जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें ॥

ज्ञा. ९, ४९६--५१६.

---

## ११३. ईश्वराबद्दल कोणतीही एक दृढभावना पाहिजे-

पाहें पां वालभाचेनि[4] व्याजें[5] । तियां वज्रांगनांचीं[6] निंजें[7] ।
मज मिनलियां काय माझें । स्वरूप नव्हती ॥
नातरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसें ।
कीं अखंडवैरवशें । चैद्यादिकीं ॥
अगा सोयरेपणेंचि पांडवा । माझें सायुज्य यादवां ।
कीं ममत्वें वसुदेवा-। दिकां सकळां ॥
नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका हन सनत्कुमारा ।
इयां भक्ती मी धनुर्धरा । प्राप्य जैसा ॥
तैसाचि गोपिकांसि कामें । तया कंसा भयसंभ्रमें ।
येरां घातकें[10] मनोधर्में । शिशुपालादिकां ॥
अगा मी एकलोणाचें[11] खागें[11] । मज येवों[12] ये भलतेनि मार्गें ॥
भक्ति कां विषयविरागें । अथवा वैरें ॥
म्हणोनि पार्था पाहीं । प्रवेशावया माझ्या ठायीं ।
उपायांचि नाहीं । वाणी[13] येथ ॥

ज्ञा. ९. ४६५-४७१.

---

१ हायहाय. २ वाईट. ३ वेगळा. ४ प्रीतीच्या ५ निमित्तानें. ६ गोपस्त्रिया. ७ अंतःकरणें. ८ निमित्तानें. ९ शिशुपालदिकांनीं. १० धातकबुद्धीनें ११ एकभावाचें स्थळ. १२ येतां येतें. १३ उणीव, कमतरता.




## ११४. दुराचारी सुद्धां साधु होऊं शकतो.

तो आधीं जरी दुराचारी । तरि सर्वोत्तमचि अवधारीं ।
जैसा बुडाला महासागरीं । न मरत निघाला ॥
तयाचें जीवित ऐलथडिये[1] आलें । म्हणोनि बुडालेंपण जैसें
वायां गेलें । तैसें नुरेचि पाप केलें । शेवटलिये भक्ती ॥
यालागीं दुष्कृती जरी जाहाला । तरी अनुतापतीर्थीं न्हाला ।
न्हाउनी मजआंत आला । सर्वभावें ॥
तरि आतां पवित्र तयाचें कुळ । आभिजात्य[2] तेंचि निर्मळ ।
जन्मलेयाचें फळ । तयासींच जोडलें ॥
तो सकळही पढिन्नला । तपें तोचि तपिन्नला ।
अष्टांग अभ्यासिला । योग तेणें ॥
हें असो बहुत पार्था । तो उतरला कर्मं सर्वथा ।
जयाची अखंड गा आस्था[3] । मजचि लागीं ॥
अवघिया मनोबुद्धीचिया रहाटी[4] । भरोनि एकनिष्ठेची पेटी ।
मजमाजी किरीटी । निक्षेपिली[5] जेणें ॥
तो आतां अवसरें[6] मजसारिखा होईल । ऐसा हन भाव तुज जाईल
हां गा अमृताआंत राहील । तया मरण कैंचें ॥...॥
म्हणोनि तयाचिया चित्ता । माझी जवळीक पंडुसुता ।
तेव्हांचि तो तत्वतां । स्वरूप माझें ॥
जैसा दीपें दीप लाविजे । तेथ आदील[7] कोण हें नोळखिजे ।
तैसा सर्वस्वें जो मज भजे । तो मीचि होऊनि ठाके ॥

ज्ञा. ९. ४१८–४२८.

---

१ अलीकडच्या कांठीं. २ कुलीनता. ३ तळमळ, आवड. ४ व्यवहार.
५ ठेविली, टाकिली. ६ अवकाशानें. ७ पूर्वीचा, पहिला.

## ११५. ईश्वरभक्तीविषयीं कुळजातिवर्णांचें निष्कारणत्व.

म्हणोनि कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्यजही व्हावें ।
वरि देहाचेनि नांवें । पशूचें ही लाभो ॥
पाहें पां सावजें हातिरुं धरिलें । तेणें तया काकुळती मातें स्मरिलें ।
कीं तयाचें पशुत्व वोखो जाहालें । पावलिया मातें ॥
अगा नांवें घेतां वोखटीं । जे आघवेया अधमांचिये सेवटीं ।
तिये पापयोनी ही किरीटी । जन्मले जे ॥
ते पापयोनि मूढ । मूर्ख जैसे कां दगड ।
परि माझ्या ठायीं दृढ । सर्वभावें ॥
जयांचिये वाचे माझे आलाप । दृष्टि भोगी माझेंचि रूप ।
जयांचें मन संकल्प । माझाचि वाहे ॥
माझिया कीर्तीविण । जयांचे रिते नाहीं श्रवण ।
जया सर्वांगीं भूषण । माझी सेवा ॥
जयांचें ज्ञान विषो नेणे । जाणीव मज एकातेंचि जाणे ।
जयां ऐसें लाभे तरी जिणें । येऱ्हवीं मरण ॥
ऐसा आघवांचिपरी पांडवा । जिहीं आपुल्या सर्वभावा ।
जियावयालागीं वोलावा । मींचि केला ॥
ते पापयोनीही हो तु कां । ते श्रुताधीतही न होतु कां ।
परि मजसीं तुकितां तुका । तुटी नाहीं ॥...॥
राजाज्ञेचीं अक्षरें आहातीं । तिये चामीं एका जया पडतीं ।
तया चामासाठीं जोडती । सकळ वस्तु ॥
वांचूनि सोनें रुपें प्रमाण नोहे । एथ राजाज्ञाची समर्थ आहे ।
तेंचि चाम एक जैं लाहे । तेणें विकती आघवीं ॥
तैसें उत्तमत्व तैंचि तरे । तैंचि सर्वज्ञता सरे ।
जैं मनाबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥

१ नक्रानें. २ हत्ती. ३ व्यर्थ. ४ वाईट. ५ गोष्टी. ६ रिकामे. ७ तोललें असतां. ८ वजनाला. ९ कमतरता. १० कातडें. ११ मिळतात.

म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण ।
एथ अर्जुना माझेंपण । सार्थक एक ॥
तेंचि भलतेणें भावें । मन मज आंतु येतें होआवें ।
आलें तरी आघवें । मागील वावो ॥
जैसें तंवचि वहाळ वोहळ । जंव न पवती गंगाजळ ॥
मग होऊनी ठाकती केवळ । गंगारूप ॥
कां खैर चंदनकाष्ठें । हे विवंचना तंवचि घेंटे ।
जंव न घापतीं एकवटें । अग्निमाजी ॥
तैसें क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ।
जाती तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ॥

ज्ञा. ९. ४४१–४६०

---

## ११६. "माझिये भक्तीवीण । जळों तें जियालेंपण."

एथ पार्था पुढतपुढतीं । तेंचि तें सांगों किती ।
जरी भियां चाड तरी भक्ति । न विसंबिजे गा ॥
अगा कुळाचिया चोखटपणा नलगा । आभिजात्य झणीं श्लाघा ।
व्युत्पत्तीचा वाउगा । सोस कां वाहावा ॥
कां रूपें वयसा माजा । आथिलेपणें कां गाजा ।
एक भाव नाहीं माझा । तरी पाल्हाळ तें ॥...॥
तैसें माझिये भक्तीविण । जळों तें जियालेंपण ।
अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ॥...॥
निंब निंबोळियां मोडोनि आला । तरि तो काउळियांसींचि सुकाळ जाहला । तैसा भक्तिहीन वाढिन्नला । दोषांचिलागी ॥
कां षड्रस खापरीं वाढिले । वाढूनि चोहटां ठेविले ।
ते सुणेयांचे उपेगा आले । जियापरी ॥

१ व्यर्थ. २ नाले, व ओढे ३ विचारणा. ४ होते, घडते. ५ जाऊं नका. ६ कुलीनपणांत. ७ आनंद मानूं नका. ८ हांव. ९ संपन्नत्वानें. १० पसारा, व्यर्थ. ११ जगणें. १२ फळांनीं. १३ चवाठा १४ कुत्र्यांच्या.

तसें भक्तिहीनाचें जिणें । जो स्वप्नींही परि सुकृत नेणें ।
तेणें संसारदुःखासि भोणें । वोगरिलें ॥
ज्ञा. ९. ४३०–४४०.

## ११७. भक्तीचें स्वरूप.

तैसा मी एकीचि परी । आतुडें गा अवधारीं ।
जरि भक्ति येऊनि वरी । चित्तातें गा ॥
परि तेचि भक्ति ऐसी । पर्जन्याची सुटिका जैसी ।
धरावांचूनि अनारिसी । गतीचि नेणें ॥
कां सकळजळसंपत्ती । घेऊनि समुद्रातें गिंवसिती ।
गंगा जैसी अनन्यगति । मिनलीच मिळे ॥
तैसें सर्वभावसंभारें । न धरत प्रेम एकसरें ।
मजमाजि संचरे । मीचि होऊनी ॥
आणि तेवींचि मी ऐसा । थडिये माझारीं सरिसा ।
क्षीराब्धि कां जैसा । क्षीराचाचि ॥
तैसें मजलागुनी मुंगीवरी । किंबहुना चराचरीं ।
भजनासि कां दुसरी । परीचि नाहीं ॥
तयाच क्षणासवें । एवंविध मी जाणवें ॥
जाणितला तरी स्वभावें । दृष्टही होय ॥
ज्ञा. ११. ६८५.–६९१.

## ११८. भक्ती म्हणजे अभेदज्ञान

म्हणोनि विश्व भिन्नभिन्न । परि न भेदे तयाचें ज्ञान ।
जैसे अवयव तरी आनआन । परी एकेचि देहींचे ॥

१ पुण्य. २ ताट. ३ वाढलें. ४ स्वाधीन होतो. ५ धारा.
६ पृथ्वीवांचून. ७ दुसरी. ८ सामुग्री. ९ तीरावर. १० भिन्नभिन्न.

कां शाखा सानिया थोरा । परि आहाती एकाचि तरुवरां ।
बहुरश्मि परि दिनकरां । एकाचे जेवीं ॥
तेवीं नानाविधा व्यक्ती । आनानें नामें आनानी वृत्ति ।
ऐसें जाणती भेदलां भूतीं । अभेदा मातें ॥...॥
नातरि जेधवां जिये ठायीं । कां देखती जें जें कांहीं ।
तें मीवांचूनि नाहीं । ऐसाचि बोध ॥.. ॥
तैसें भलतेथ भलतेणें भावें । भलतेंही हो अथवा नोहावें ।
पारि तें मी ऐसें आघवें । होऊनी ठेलें ॥
अगा हे जेव्हडी माझी व्याप्ति । तेव्हडीचि तयांची प्रतीति ।
ऐसें बहुधाकारीं वर्तती । बहुतचि होऊनि ॥...॥
अगा तयांचिया ज्ञाना । पाठीं पोट नाहीं अर्जुना ।
वायु जैसा गगना । सर्वांगीं असे ॥
तैसा मी जेतुला आघवा । तेंचि तुकें तयांचिया सद्भावा ।
तरि न करितां पांडवा । भजन जाहालें ॥

ज्ञा. ९. २५०–२६१.

---

## ११९. प्रथम भक्तीकडे प्रवृत्ति नसते.

ऐसें प्रेमळांचेनि प्रियोत्तमें । बोलिलें जेथ पुरुषोत्तमें ।
तेथ अर्जुन मनोधर्में । निवालों म्हणतसे ॥
हां हो जी अवधारा । भला केर फेडिला संसारा ।
जाहालों जननीजठरजोहरा– । वेगळा प्रभु ॥
जी जन्मलेंपण आपुलें । हें आजि मियां डोळां देखिलें ।
जीवित हातां चढलें । आवडे तैसें ॥
आजि आयुष्या उंजवण जाहाली । माझिया दैवा दशा उदयली ।
जे वाक्यकृपा लाधली । दैविकेनि मुखें ॥

---

१ लहान. २ भिन्न असलेल्या. ३ अथवा. ४ जेव्हां. ५ कस, वजन. ६ शांत झालों. ७ अडवून दिला. ८ मातेच्या उदरांतील अग्नि. ९ हवेंतसें. १० साफल्य. ११ चांगले दिवस.

आतां येणें वचनतेजाकारें । फिटलें आंतील बाहेरील आंधारें ।
म्हणोनि देखतसें साचोकारें । स्वरूप तुझें ॥....॥
पैं आणिकही एकेपरी । इये प्रतीतीची येतसे थोरी ।
जें मागें एसेंचि ऋषीश्वरीं । सांगितलें तूतें ॥
परि तया सांगितलियांचें साचपण । हें आतां माझें देखतसे अंतःकरण । जे कृपा केली आपण । म्हणोनि देवा ॥
येऱ्हवीं नारद अखंड जवळां ये । तोही ऐसेंची वचनीं गाये ।
परि अर्थ न बुझोनि ठाये । गीतसुखचि एकों ॥
जी आंधळेयांच्या गांवीं । आपणपें प्रकटिलें रवी ।
तरि तिहीं चांतपलीची घ्यावी । वांचूनि प्रकाश कैंचा ॥
परि देवर्षि अध्यात्म गातां । आहांच रागांगेंसी जे मधुरता ।
तेचि फांवे येर चित्ता । न लगेचि कांहीं ॥
पैं असितादेवलाचेनि मुखें । मी एवंविधा तूतें आयिकें ।
परि तें बुद्धी विषयविखें । घारिली होती ॥
विषयविषाचा पडिपाडु । गोड परमार्थ लागे कडू ।
कडू विषय तो गोडू । जीवासि जाहला ॥
आणि हें आणिकांचें काय सांगावें । राउळा आपणचि येउनी व्यासदेवें । तुझें स्वरूप आघवें । सर्वदा सांगिजे ॥
परि तो आंधारीं चिंतामणि देखिला । जैंवि नव्हे या बुद्धि उपेक्षिला ।
पाठीं दिनोदयीं वोळखिला । होय म्हणोनि ॥
तैसीं व्यासादिकांचीं बोलणीं । तिया मजपासीं चिद्रत्नांचिया खाणी।
परि उपेक्षिल्या जात होतिया तरणी । तुजवीण कृष्णा ॥
तें आतां वाक्यसूर्यकर तुझे फांकले । आणि ऋषींनीं मार्ग होते जे कथिले । तया आघवेयांचेंचि फिटलें । अनोळखपण ॥
जी ज्ञानाचें बीज तयांचे बोल । मांजि हृदयभूमिके पडिले सखोल ।
वरि इये कृपेची जाहाली वोल । म्हणोनि संवादफळ ॥

१ खरेंपण. २ समजतां. ३ कोंवळें ऊन. ४ बरबरच. ५ प्राप्त होई. ६ व्यापलेली. ७ सामर्थ्य. ८ राजमंदिर. ९ टाकला. १० सूर्य.

अहो नारदादिकां संतां । त्यांचिया उक्तिरूप सरितां ।
मी महोदधि जाहालों अनंता । संवादसुखाचा ॥
प्रभु आघवेनि येणें जन्में । जिये पुण्यें केलीं मियां उत्तमें ।
तयांची न टकतीचि अंगीं कामें । सद्गुरु तुवां ॥
येऱ्हवीं वडिलवडिलांचेनि मुखें । मी सदा तूंतें कानीं आइकें ।
परि कृपा न कीजेचि तुवां एकें । तंव नेणवेंचि कांहीं ॥
म्हणोनि भाग्य जें सानुकूळ । जालिया केले उद्यम सदा सफळ ।
तैसें श्रुताधीत सकळ । गुरुकृपा साच ॥
जी बनकर झाडेंसीं जीवें साटी । पाडूनि जन्में काढी आटी ।
परि फळेंसीं तेंचि भेटी । जें वसंत पावे ॥ ... ॥
कां इंद्रियें वाचा प्राण । यां जालियांचें तेंचि सार्थकपण ।
जें चैतन्य येऊनि आपण । संचरें माजीं ॥
तैसें शब्दजात आलोडिलें । अथवा योगादिक जें अभ्यासिलें ।
तें तेंचि म्हणों ये आपुलें । जें सानुकुळ श्रीगुरू ॥

ज्ञा. १०. १४४–१७२.

## १२०. संतांस भजल्यानें रहस्यप्राप्ति.

तें गा ज्ञान पैं वरवें । जरि मनीं आथि जाणावें ।
तरि संतांतें भजावें । सर्वस्वेंसीं ॥
जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंटा ।
तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनि ॥
तरि तनुमनजीवें । चरणांसीं लागावें ।
आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ॥
मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगतील पुसिलें ।
जेणें अंतःकरण बोधिलें । संकल्पा न ये ॥

---

१ पावणें, प्राप्त होणें. २ माळी. ३ संयोग. मोबदला. ४ जन्म काढतो ५ कष्टानें. ६ अभ्यासिलें. ७ घरटें, आश्रय. ८ आश्रय करून. ९ इच्छित.

जयाचेनि वाक्यउजियडें[1]। जाहलें चित्त निधडें[2]।
ब्रह्माचेनि पाडें। निःशंक होय ॥
तेवेळीं आपणपेंया सहितें। इयें अशेषेंही भूतें।
माझ्या स्वरूपीं अखंडितें। देखसी तूं ॥
ऐसें ज्ञानप्रकाशें पाहलें। तैं मोहांधकार जाईल।
जैं श्रीगुरुकृपा होईल। पार्था गा ॥

ज्ञा. ४. १६५–१७१.

---

## १२१. गुरुकृपेनें आत्मसिद्धि.

ऐसी कर्मं साम्यदशा। होय तेथ वीरेशा।
मग श्रीगुरु आपैसा[3]। भेटेचि गा ॥
रात्रीची चौपाहारी[4]। वेंचलिया अवधारीं।
डोळ्यां तमारी[5]। मिळे जैसा।
कां येऊनि फळाचा घड। पारुपवी[6] केळीची वाढ।
श्रीगुरु भेटोनि करी पाड। मुमुक्षु तैसा ॥
मग आलिंगिला पूर्णिमा। जैसा उणीव सांडी चंद्रमा।
तैसें होय वीरोत्तमा। गुरुकृपा तया ॥
तेव्हां अबोधमात्र असे। ते तेव तया कृपा नाशे।
तेथ निशिसवें जैसें। आंधारें जाय ॥
तैसी अबोधाचिये कुशी। कर्म कर्ता कार्य ऐशी।
त्रिपुटी असे ते जैसी। गाभिणी मारिली ॥
तैसेंचि अबोधनाशासवें। नाशे क्रियाजात आघवें[7]।
ऐसा समूळ संभवे। संन्यास हा ॥
येणें मूळाज्ञानसंन्यासें। दृश्याचा जेथ ठावो पुसे।
तेथ बुझावें[8] तें आपैसें। तोचि आहे ॥

---

१ प्रकाशानें. २ उजाडेल. ३ आपोआप ४. चारप्रहर ५ सूर्य. ६ थांबवितो. ७ सर्व अज्ञान. ८ जाणावें.

चेइलियावरी पाही । स्वप्नींचिया तिये डोहीं ।
आपणयातें काई । काढूं जाइजे ॥
तैं मी नेणे आतां जाणेन । हें सरलें तया दुःस्वप्न ।
जाला ज्ञातृज्ञेयाविहीन । चिदाकार ॥
मुखाभासेंसीं आरिसा । परता नेलिया वीरेशा ।
पाहतेंपणेंवीण जैसा । पाहता ठाके ॥
तैसें नेणणें जें गेलें । तेणें जाणणें ही नेलें ।
मग निष्क्रिय उरलें । चिन्मात्रचि ॥
तेथ स्वभावें धनंजया । नाहीं कोणीचि क्रिया ।
म्हणौनि प्रवाद तया । नैष्कर्म्य ऐसा ।
तें आपुलें आपणपें । असतचि होऊनि हारपे ।
तरंग का वायुलोपें । समुद्र जैसा ॥
तैसें न होणें निपजे । तें नैष्कर्म्यसिद्धि जाणिजे ।
सर्व सिद्धींत सहजें । परम हेचि ॥
देऊळाचिया कामा कळस । उपरम गंगेसी सिंधुप्रवेश ।
कां सुवर्णशुद्धी कस । सोळावा जैसा ॥
तैसें आपुलें नेणणें । फेडिजे कां जाणणें ।
तेंही गिळूनि असणें । ऐसी जे दशा ॥
तियेपरतें कांहीं । निपजणें येथ नाहीं ।
म्हणौनि म्हणिपे पाहीं । परमसिद्धि ते ॥
परि हेचि आत्मसिद्धि । जो कोणी भाग्यनिधि ।
श्रीगुरुकृपालब्धि-।काळीं पावे ॥

ज्ञा. १८, ९६६–९८४.

---

## १२२. नामघोषगौरवानें विश्व धवळित होतें.

तरि कीर्तनाचेनि नटनाचें । नाशिलें व्यवसाय प्रायश्चित्तांचे ।
जें नामचि नाहीं पापाचें । ऐसें केलें ॥

नांव. २ उत्कर्षानें. ३ व्यापार.

यमदमां अवकळा आणिली । तीर्थें ठायावरूनि उठविलीं ।
यमलोकींची खुंटिली । राहाटी आघवी ॥
यम म्हणे काय यमावें । दम म्हणे कवणातें दमावें ।
तीर्थ म्हणती काय खावें । दोष औषधासि नाहीं ॥
ऐसें माझेनि नामघोषें । नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें ।
अवघें जगचि महासुखें । दुमदुमित भरलें ॥
ते पाहांटेंविण पाहावित । अमृतेंविण जीववित ।
योगेंवीण दावित । कैवल्य डोळां ।
परि राया रंका पाड धरूं । नेणती सानेयां थोरां कडसणी करूं ।
एकसरें आनंदाचें आवारूं । होत जगा ॥
कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें ।
ऐसें नामघोषगौरवें । धवळलें विश्व ॥
तेजें सूर्य तैसे सोज्वळ । परि तोही अस्तवे हें किडाळ ।
चंद्र संपूर्ण एकादे वेळ । हे सदा पुरते ॥
मेघ उदार परि वोसरे । म्हणउनी उपमेसी न पुरे ।
हे निःशंकपणें सपाखरे । पंचानन ॥
जयांचे वाचेपुढां भोजें । अखंड नाम नाचत असे माझें ।
जें जन्मसहस्रीं वोळगिजे । एकवेळ यावया ॥
तो मी वैकुंठीं नसें । वेळ एक भानुबिंबींही न दिसें ।
वरी योगियांचींही मानसें । उमरडोनि[10] जाय ॥
परि तयापासीं पांडवा । मी हारपला[11] गिंवसावा[12] ।
जेथ नामघोष बरवा । करिती माझा ॥
कैसे माझ्या गुणीं धाले[13] । देशकाळातें विसरले ।
कीर्तनसुखें सुखावले । आपणपांचि ॥
कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामांचे निखिल[14] प्रबंध ।
माजी आत्मचर्चा विशद[15] । उदंड गाती ॥

---

१ योग्यता. २ निवड. ३ गांवकुस. ४ प्रकाशित केलें, पापरहित केलें. ५वाईट ६ सरतो. ७ कृपाळु, सकृप. ८ आवडीनें. ९ सेवा करावी लागते. १० उल्लंघून. ११ हरवलेला. १२ शोधून काढावा. १३ तृप्त झाले. १४ केवळ. १५ शुद्ध

हें बहु असो यापरी । कीर्तित मातें अवधारीं ।
एक विचरती चराचरीं । पांडुकुमरा ॥

ज्ञा. ९. १९७-२११.

---

## "१२३. पंगुं लंघयते गिरिम्"

येणेंचि अभ्यासेंसी योगु । चित्तासी करी पां चांगु ।
अगा उपायबळें पंगु[1] । पहाड ठाकी ॥
तैंवि सदभ्यासें निरंतर । चित्तासि परम पुरुषाचि मोहर[2] ।
लावीं मग शरीर । राहो अथवा जावो ॥
जें नाना गतींतें पाववितें । तें चित्त वरील आत्मगातें ।
मग कवण आठवी देहातें । गेलें कीं आहे ॥

ज्ञा. ८. ८१-८३.

---

## १२४. अभ्यासास कोणतीच गोष्ट दुष्कर नाहीं-

अथवा हें चित्त । मनबुद्धिसहित ।
माझ्या हातीं अचुंबित[3] । न शकसी देवों ॥
तरि गा ऐसें करीं । यया आठां पाहारां माझारीं ।
मोटकें[4] निमिषभरी । देत जाईं ॥
मग जें जें कां निमिख । देखेल माझें सुख ।
ततुलें अरोचक । विषयीं घेईल ॥
जैसें शरत्काल रिगे । मग सरिता वोहटूं लागे ।
तैसें चित्त काढेल वेगें । प्रपंचौनि ॥
मग पुनवेहूनि जैसें । शशिबिंब दिसें दिसें[5] ।
हारपत अंवसें । नाहींचि होय ॥

---

१ लंगडा २ मार्ग. ३ समग्र, एकदम. ४ फक्त, थोडें. ५ दिवसेंदिवस.

तैसें भोगा आंतूनि निघतां । चित्त मजमाजीं रिगतां ।
हळुं हळुं पांडुसुता । मीचि होसील ॥
अगा अभ्यासयोग म्हणिजे । तो हा एक जाणिजे ।
येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ॥
पैं अभ्यासाचेनि बळें । एकां गती अंतराळें[1] ।
व्याघ्र सर्प प्रांजळें[2] । केलें एकीं ॥
विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे ।
एकीं वाग्ब्रह्म[3] थोकडें । अभ्यासें केलें ॥
म्हणोनि अभ्यासासी कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं ।
यालागीं माझ्या ठायीं । अभ्यासें मिळे ॥

ज्ञा १२. १०४-११३.

---

## १२५. अभ्यासास उपयोगी स्थान कसें असावें ?

तरि विशेषें[4] आतां बोलिजेल । वरि तें अनुभवें उपेगा जाईल ।
म्हणोनि तैसें एक लागेल । स्थान पहावें ॥
जेथ आरांणुकेचेनि[5] कोडें[6] । बैसलिया ऊठों नावडे ।
वैराग्यासी दुणीव[7] चढे । देखलियां जें ॥
जो संतीं वसविला ठावो । संतोषासी सावावो[8] ।
मना होय उत्सावो । धैर्याचा ॥...॥
जया आड[9] जातां पार्थां । तपश्चर्या मनोरथां ।
पांखांडियाही आस्था । समूळ होय ॥...॥
ऐसोनि न राहतयातें राहावी । भ्रमतयातें बैसवी ।
थापटूनि चेववी । विरक्तीतें ॥...॥
आणिकही एक पहावें । जें साधकीं वसतें होआवें ।
आणि जनाचेनि पांयरवें[10] । मैळेचिना[11] ॥

---

१ अंतरिक्षांत. २ सरळ. ३ वेद. ४ विस्तारानें ५ समाधान होण्याच्या. ६ आवडीनें. ७ दुप्पटपणा, दृढपणा ८ सहाय. ९ वरून सहज गेलें असतां. १० वर्दळीनें ११ मळत नाही.

जेथ अमृताचेनि पाडें । मुळांही सकट गोडें ।
जोडती दाटें झाडें । सदा फळतीं ॥
पाउलापाउलां उदकें । वर्षाकाळावीण अतिचोखें ।
निर्झरें[2] कां विशेखें । सुलभें जेथें ॥
हा आतपही अळुमाळ[3] । जाणिजे तरी शीतळ ।
पवन अति निश्चळ । मंद झुळके ॥
बहुतकरूनि निःशब्द । दाट न रिघे श्वापद[4] ।
शुक हन षट्पद[5] । तेउतें[6] नाहीं ॥
पाणिलगें[7] हंसें । दोनी चारी सारसें[8] ।
कवणें एके वेळे बैसे । कोकिळ ही हो कां ॥
निरंतर नाहीं । तरी आलीं गेलीं कांहीं ।
होतु कां मयूरें ही । आम्हीं ना न म्हणों ॥
परि आवश्यक पांडवा । ऐसा ठाव जोडावा ।
तेथ निगूढ[9] मठ होआवा । कां शिवालय ॥

ज्ञा. ६. १६३–१७९.

---

## १२६. कुंडलिनीचें उत्थान व अनाहतनादश्रवण.

हें असो ते कुंडलिनी बाळी । हृदयाआंत आली ।
तंव अनाहताची[10] बोली[11] । चावळे ते ॥
शक्तीचिया[12] आंगा लागलें । बुद्धीचें चैतन्य होतें जाहलें ।
तें तेणें आइकिलें । अळुमाळ[13] ॥
घोषाचिये[14] कुंडीं । नादचित्रांचीं रूपडीं[15] ।
प्रणवाचिया[16] मोडी[17] । रेखिलीं ऐसीं ॥

---

१ योग्यतेचीं, सारखी. २ झरे. ३ थोडा. ४ पशु. ५ भ्रमर. ६ तेथें. ७ पाण्याच्या आश्रयानें राहणारे. ८ चक्रवाकपक्षी. ९ गुप्त. १० योगधारणेंत एक प्रकारचा होणारा शब्द. ११ बोलते. १२ कुंडलिनीच्या. १३ किंचित्. १४ एक प्रकारचा नाद. १५ रूपें. १६ ओंकाराच्या. १७ आकारानें.

हेंचि कल्पवे[1] तरी जाणिजे । परि कल्पितें केंचें आणिजे ।
तरि नेणों काय गाजे[2] । तिये ठायीं ॥
विसरोनि गेलों अर्जुना । जंव नाश नाहीं पवना ।
तंव वाचा आथी गगना । म्हणऊनि घुमे ॥
तया अनाहताचेनि मेघें । आकाश दुमदुमों लागे ।
तंव ब्रह्मस्थानींचें वेगें[3] । सहज फिटे[4] ॥

ज्ञा. ६. २७४–२७९.

## १२७. योग हा अग्निप्रवेशाइतकाच कठीण आहे.

जिहीं सकळ भूतांचिया हितीं । निरालंबीं[5] अव्यक्तीं ।
पसरलिया आसक्ती । भक्तीविणें ॥
तया महेंद्रादि पदें । करिताति वाटवधें[6] ।
आणि ऋद्धिसिद्धींचीं द्वंद्वें[7] । पडोनि ठाती ॥ ॥
ताहानें ताहानचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी ।
अहोरात्र वावीं[8] । मवावा[9] वारा ॥ ..॥
शीत वेढावें । ऊष्ण पांघुरावें ।
वृष्टीचिया असावें । घराआंत ॥
किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेश नित्य नवा ।
भ्रताराविण करावा । तो हा योग ॥...॥
म्हणोनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा ।
तया दुःखाचाचि सेल वांटा । भागा आला ॥
पाहें पां लोहाचे चणे । जें बोचरिया[10] पडती खाणें ।
तें पोट भरणें कीं मरणें । शुद्धि नेणे ॥...॥
यालागीं पांगुळां हेवा । नव्हे वायूसी पांडवा ।
तेविं देहवंता जीवां । अव्यक्ति गती ॥

---

१ कल्पना करणारें. २ शब्द करी. ३ कपाट. ४ उघडे. ५ अनाश्रित. ६ वाटमारेपणा. ७ अडथळे. ८ हाताच्या वावांनीं. ९ मोजावा. १० दांत पडलेल्याला.

ऐसाही जरी धिंवसा । बांधोनियां आकाशा ।
झोंबती तरी क्लेशा । पात्र होती ॥
म्हणोनि येर ते पार्था । नेणतीचि हे व्यथा ।
जे कां भक्तिपंथा । वोठंगले ॥

ज्ञा. १२. ६०–७५.

## १२८. ईश्वराचें सर्वगत ध्यान.

म्हणोनि सदा स्मरावें । मातेंचि तुवां ॥
डोळां जें देखावें । कां कानीं हें ऐकावें ।
मनीं जें भावावें । बोलावें वाचे ॥
तें आंत बाहेरीं आघवें । मीचि करूनि घालावें ।
मग सर्वांकाळीं स्वभावें । मीचि आहे ॥
अर्जुना ऐसें जाहालिया । मग न मरिजे देह गेलिया ।
मा संग्राम केलिया । भय काय तुज ॥
तूं मनबुद्धि साचेंसीं । जरि माझिया स्वरूपीं अर्पिसी ।
तरि मातेंचि गा पावसी । हे माझी भाक ॥
हेंच कासिसयावरी होये । ऐसा जरी संदेह वर्तत आहे ।
तरी अभ्यासून आधीं पाहे । मग नव्हे तरी कोपें ॥

ज्ञा. ८. ७५–८०.

## १२९. देव सन्मुख विन्मुख दोहींकडे आहे.

जी काय एक तूं नव्हसी । कवणें ठायीं नससी ।
हें असो जैसा आहासी । तैसिया नमो ॥..॥

१ धैर्य. २ आश्रय करून राहिले. ३ चिंतावें. ४ खरोखर. ५ शपथ.

ऐसें सानुरागें चित्तें । स्तवन केलें पांडुसुतें ।
मग पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥
पाठीं तियें साद्यंतें । न्याहाळी श्रीमूर्तीतें ।
आणि पुढतीं म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥
पाहत पाहतां प्रांतें । समाधान पावे चित्तें ।
आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥
इयें चराचरीं जीं भूतें । सर्वत्र देखे तयातें ।
आणि पुनः पुनः म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥..॥
आणिक स्तुतीही नाठवे । आणि निवांतही नसवे ।
नेणो कैसा प्रेमभावें । गाजोंचि लागे ॥
किंबहुना इयापरि । नमन केलें सहस्रवरी ।
कीं पुढती म्हणे श्रीहरी । तुज सन्मुखा नमो ॥
देवासी पाठी पोट आथि कीं नाहीं । येणे उपयोग आम्हां काई ।
तरि तुज पाठिमोरेयाही । नमो स्वामी ॥
उभा माझिये पाठीशीं । म्हणोनि पाठिमोरें म्हणावें तुम्हांसी ।
सन्मुख विन्मुख जगेंसी । न घडे तुज ॥
आतां वेगळालियां अवयवां । नेणें रूप करूं देवा ।
म्हणोनि नमो तुज सर्वा । सर्वात्मका ॥

ज्ञा. ११. ५१९-५३२.

---

## १३०. ईश्वराचा ज्ञानियांस नित्य उदय.

जें गगनाहूनि जुनें । जें परमाणूहूनि सानें ।
जयाचेनि संन्निधानें । विश्व चळे ॥
जें सर्वातें यया विये । विश्व सर्व जेणें जिये ।
हेतु जया बिहे । अचिंत्य जें ॥

१ सप्रेम. २ भाग. ३ न रहावें. ४ लहान. ५ तर्क. ६ भितो.

देखें बोळेंवा[1] इंगळ[2] न चरे। तेजीं तिमिर[3] न शिरे।
जें दिहाचि[4] आंधारें। चर्मचक्षूसीं॥
सुसडा[5] सूर्यकिरणांच्या राशी। जो नित्यउदो ज्ञानियांसी।
अस्तमानाचें जयासी। आडनांव नाहीं॥

ज्ञा. ८. ८७-९०.

## १३१. "और वो एक शिपाई"

म्हणोनि मज आत्मयाचा भाव। जिहीं जियावया केला ठाय।
एक मीवांचूनि वाव। येर मानिलें॥
तया तत्त्वज्ञानचोखटां। दिवी[6] पोतासांची सुभटा।
मग मीचि होऊनि दिवटा। पुढां पुढां चाले॥
अज्ञानाचिये राती-। माजि तमाची मिळणी दाटती।
ते नाशूनि घाली परौती[9]। तयां करीं नित्योदय॥

ज्ञा. १०. १४१-१४३.

## १३२. ईश्वराचें अप्रतिम तेज.

तिये अंगप्रभेचा[10] देवा। नवलावो[11] काइसयाऐसा सांगावा।
कल्पांतीं एकाचि मेळावा। द्वादशादित्यांचा होय॥
तैसे ते दिव्य सूर्य सहस्रवरी। जरी उदयजती कां एकेचि अवसरीं।
तरी जया तेजाची थोरी। उपमू नये॥
अवघियांचि विजूंचा मेळावा कीजे। आणि प्रळयाग्नीची सर्व
सामुग्री आणिजे। तर्वीचि दशकही मेळविजे। महातेजांचा॥
तऱ्ही तिये अंगप्रभेचेनि पाडें। हें तेज कांहीं होईल थोडें॥
आणि तया ऐसें कीर चोखडें। त्रिशुद्धी नोहे॥

---

१ वाळवी. २ विस्तव. ३ अंधार. ४ दिवसा. ५ अतिशय सडिक, अथवा तेजस्वी. ६ दिवटी. ७ कापूर. ८ मशालजी. ९ पलीकडे. १० अंगच्या तेजाचा ११ आश्चर्य.

ऐसें महात्मया श्रीहरीचें सहज । फांकतसें सर्वांगींचें तेज ।
तें मुनिकृपा जी मज । दृश्य जाहालें ॥
ज्ञा. ११. २३७–२४१.

---

## १३३ ईश्वराचा सबाह्याभ्यंतर साक्षात्कार.

ऐसी एकेक शृंगारशोभा । पाहतां अर्जुन जातसे क्षोभा ।
तवंचि देव बैसला कीं उभा । शयानु हें नेणवे ॥
बाहेर दिठी उघडोनी पाहे । तंव आघवें मूर्तिमय देखत आहे ।
मग आतां न पाहे म्हणोनि उगा राहे । तरी आंतही तैसेंचि ॥
अनावर मुखें समोर देखे । तया भेणें पाठिमोरा जंव ठाके ।
तंव तयाहीकडे श्रीमुखें । करचरण तैसे चि ॥
अहो पाहतां कीर प्रतिभासे । येथ नवलावो काय असे ।
परि न पाहतांही दिसे । चोज आइका ॥
कैसें अनुग्रहाचें करणें । पार्थाचें पाहणें आणि न पाहणें ।
तयाही सकट नारायणें । व्यापूनि घेतलें ॥
म्हणोनि आश्चर्याच्या पुरीं एकीं । ठायेंठाव तेंडीं टाकी ।
तंव चमत्काराचिया आणिकीं । महार्णवीं पडे ॥...॥
आणि दीपें कां सूर्यें प्रगटे । अथवा निमुटलिया देखावेंचि खुंटे ।
तैसी दिठी नव्हे जे वैकुंठें । दिधली आहे ॥
ज्ञा. ११. २२६–२३४.

---

## १३४. ईश्वराचें अमेयत्व.

हें अग्नी स्वर्गपाताळ । कीं भूमि दिशा अंतराळ ।
हे विवंक्षा ठेली सकळ । मूर्तिमय देखतसे ॥...॥

---

१ अस्वस्थतेप्रत. २ निजलेला, ३ आश्चर्य. ४ तात्काळ. ५ ती ६ मिटली असतां. ७ बोलणें. ८ राहिले.

ऐसा कवणें ठायाहूनि तूं आलासी। एथ बैसलासी कीं उभा आहासी। आणि कवणिये मायेचिये पोटीं होतासी। तुझें ठाण केवढें॥ तुझें रूप वय कैसें। तुज पैलीकडे काय असे। तूं कायिसयावरी आहासी ऐसें। पाहिलें मियां॥
तंव देखिलें जी आघवेंचि। तरि आतां तुझा ठाव तूंचि।
तूं कवणाचा नव्हेसी ऐसाचि। अनादि आयता॥
तूं उभा ना बैठा। दिघडा ना खुजटा।
तुज तळीं वरी वैकुंठा। तूंचि आहासी॥...॥
किंबहुना आतां। तुझें तूंचि आघवें अनंता।
हें पुढतपुढतीं पाहातां। देखिलें मियां॥

ज्ञा. ११. २७१–२७९.

---

## १३५. आत्मसाक्षात्कार.

ऐसेनि गा वीरनाथा। आत्मज्ञानाचिया खड्गलता।
छेदूनिया भवाश्वत्था। ऊर्ध्वमूळातें॥
मग इदंतेसी वाळलें। जें मीपणेंवीण डाहारलें।
तें रूप पाहिजे आपलें। आपणचि॥
परि दर्पणाचेनि आधारें। एकाचि करून दुसरें।
मुख पाहती गव्हारें। तैसें नको हो॥
हें पाहणें ऐसें असे वीरा। जैसा न मोडलियां विहिरा।
मग आपुलिया उगमीं झरा। भरोनि ठाके॥
नातरि आटलीया अंभ। निजबिंबीं प्रतिबिंब।
नेहटे कां नभीं नभ। घटाभावीं॥
ना ना इंधनांश सरलेया। वन्हि परते जेविं आपणपयां।
तैसें आपेंआप धनंजया। न्याहाळणें जें॥

---

१ आकृति. २ दीर्घ, उंच. ३ लहान. ४ तरवारीनें. ५ हेंपण. ६ नाहीसें झालें. ७ प्रसिद्धीस आलें. ८ मूर्ख. ९ पाणी. १० मिळतें. ११ जळण.

जिव्हे आपली चवी चाखणें । चक्षु निज बुबुळ देखणें ।
आहे तया ऐसें निरीक्षणें । आपुलें पैं ॥ ॥
आपणेंचि आपणयातें । पाहिजे जें अद्वैतें ।
तें ऐसें होय निरुतें । बोलिजत असे ॥
जें पाहिजतेनवीण पाहिजे । कांहीं नेणणांचि जाणिजे ।
आद्यपुरुष म्हणिजे । जया ठायातें ॥
तेथही उपाधीचा बोथंबा । घेऊनि श्रुति उभविती जिभा ।
मग नामरूपांचा वडंबा । करिती वायां ॥
पैं भवस्वर्गा उबगले । मुमुक्षु योगज्ञाना वळंघले ।
पुढतीं न यों इया निगालें । पैजा जेथ ॥
संसाराचिया पायां पुढां । पळती वीतराग होडा ।
ओलांडोनि ब्रह्मपदाचा कर्मकडा । घालती मागां ॥
अहंतादिभावां आपुलियां । झाडा देउनीं आघवेयां ।
पत्र घेती ज्ञानिये जया । मूळघरासी ॥...॥
पार्था तें वस्तु पहिलें । आपणपें आपुलें ।
पाहिजे जैसें हिंवलें । हिंवँ हिंवें ॥
आणीकही एक तया । वोळखण असे धनंजया ।
तरी कां जयाभेटलिया । येणेंचि नाहीं ॥

ज्ञा. १५. २६६–२८३.

---

## १३६. आत्मसुखानें विषयज्ञानाचा नाश.

जया आपणपें सांडूनि कहीं । इंद्रियग्रामावरी येणें नाहीं ।
तो विषय न सेवी हें काई । विचित्र येथ ॥
सहजें स्वसुखाचेनि अपारें । सुरवांडलेनि अंतरें ।
रचिला म्हणऊनि बाहिरें । पाऊल न घाली ॥

१ आश्रय. २ अवडंबर. ३ कंटाळले. ४ अनुसरले. ५ पैजेनें. ६ थंडवावें. ७ थंडी. ८ इंद्रियांचा समुदाय. ९ रंगलेल्या.

सांगें कुमुददळाचेनि ताटें । जो जेविला चंद्रकिरणें चोखटें ।
तो चकोर काय वाळुवंटें[2] । चुंबित असे ॥
तैसें आत्मसुख उपाइलें[3] । जयासी आपणपेंचि फावलें[4] ।
तया विषय सहज सांडवले । म्हणों काई ॥

ज्ञा. ५. १०५–१०८.

---

## साधूंचीं चिन्हें.

जो आत्मलाभासारिखें । गोमटें कांहींच न देखे ।
म्हणोनि भोगविशेखें । हरिखेना[5] जो ॥
आपणचि विश्व जाहला । तरि भेदभाव सहजचि गेला ।
म्हणोनि द्वेष ठेला । जया पुरुषा ॥
पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे[6] ।
हें जाणोनि गतावें । न शोची जो ॥
आणि जया परौतें[7] कांहीं नाहीं । तें आपणचि आपुल्याठायीं ।
यालागीं जो कांहीं । आकांक्षी[8] ना ॥...॥
ऐसा बोधचि केवळ । जो होऊनि असे निखळ ।
त्याहीवरी भजनशीळ । माझ्याठायीं ॥
तरि तया ऐसें दुसरें । आम्हां पढियंतें[10] सोयरें ।
नाहीं गा साचोकारें । तुझी आण ॥

ज्ञा. १२. १९०–१९६.

---

## १३८. ज्यास परमानंदाची प्राप्ति झाली तोच स्थितप्रज्ञ.

देखे ऋद्धिसिद्धि तयापरी । आली गेली से[11] न करी ।
तोचि गुंतला असे अंतरीं । महासुखीं ॥

---

१ कमळाचें पान. २ वाळुवंट. ३ उत्कृष्ट. ४ प्राप्त झालें. ५ हर्ष होत नाही. ६ नासत नाहीं, जात नाहीं. ७ पलीकडे. ८ इच्छा करीत नाहीं. ९ निखिल स्वच्छ. १० आवडतें. ११ आठवण.

जो आपुलेनि नागरपणें[1] । इंद्रभुवनातें पाबळें[2] म्हणे ।
तो कवि रंजे[3] पालवणें । भिल्लाचेनि ॥
जो अमृतातें ठी[4] ठेवी । तो कांजी जैसा न सेवी ।
तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ॥
पार्था नवल हें पाहीं । जेथ स्वर्गसुखा लेखणी नाहीं ।
तेथ ऋद्धिसिद्धि कायी । प्राकृता होती ॥
ऐसा आत्मबोधें तोषला । जो परमानंदें पोखला ।
तोचि स्थितप्रज्ञ भला । वोळख तूं ॥
तो अहंकारातें दवडुनी । सकळ काम सांडुनी ।
विचरे विश्व होउनी । विश्वामाजी ॥

ज्ञा. २. ३६२–३६७.

---

## १३९. परमामृतप्राप्तीसाठीं क्षीराब्धिमंथनाचें कारण नाहीं.

जें काळकूटाचें सहोदर । हें मृत्युभेणें प्यालें अमर ।
तरि दिहाचे पुरंदर । चौदा जाती ॥
ऐसा कवण एक क्षीराब्धीचा रस । जया वायांचि अमृतपणाचा
आभास । तयाचाही मिठांश । जें पुरे म्हणों नेदी ॥
तया पाबळेयाही येतुलेवरी । गोडियेची आथि थोरी ।
मग हें तंव अवधारीं । परमामृत साचें ॥
जें मंदराचळ न ढाळितां । क्षीरसागर न डहुळतां ।
अनादि स्वभावतां । आइतें आहे ॥...॥
जयाची गोठीचि एकतखेंवो । अवघा संसार होय वावो ।
बळिया नित्यता लागे येवों । आपणपेयां ॥

१ मोठेपणानें. २ तुच्छ, हलकें. ३ संतोष पावे. ४ पर्णकुटीनें, झोंपडीनें. ५ नांव, दोष. ६ ताकाची निवळ. ७ गणना. ८ सामान्य. ९ पुष्ट झाला. १० वागतो. ११ बंधु. १२ दिवासचे. १३ इंद्र. १४ आळ. १५ गोडी. १६ नाशिवंताला. १७ हलवतां. १८ घुसळतां. १९ ऐकतांक्षणींच.

जन्ममृत्यूंची भाखं। हारपोनि जाय निःशेख।
आंत बाहेरी महासुख। वाढोंचि लागे॥
मग दैवगत्या जरि सेविजे। तरि तें आपणचि होउनी ठाकिजे।
तें तुज देतां चित्त माझें। पुरें म्हणों न शके॥
तंव तुझें नामचि आम्हां आवडे। वरि भेटी होय आणि जवळिक
जोडे। पाठीं गोठी सांगसी सुरवाडें। आनंदाचेनि॥
ज्ञा. १०. १९२–२००.

---

## १४० साक्षात्कारी पुरुषाचें देहाविषयीं औदासीन्य.

तरि आतां देह असो अथवा जावो। आम्हीं तों केवळ वस्तूचि
आहों। कां जें दोरीसर्पत्व वावो। दोराचिकडूनि॥
मज तरंगपण असे कीं नसे। ऐसें हें उदकाप्रति कहीं भासे।
तें भलतेव्हां जैसें तैसें। उदकचि कीं॥
तरंगाकारें न जन्मेचि। ना तरंगलोपें न निमेचि।
तेविं देहीं जे देहेंचि। वस्तु जाहले॥
आतां शरीरांचें तयांचिया ठायीं। आडनांवही उरलें नाहीं।
तरि कोणें काळें काई। निमे तें पाहे पां॥
मग मार्गातें कासया शोधावें। कोणें कोठूनि के जावें।
जरि देशकाळादि आघवें। आपणचि असे॥
आणि हां गा घट जे वेळीं फुटे। ते वेळीं तेथिचें आकाश लागे
नीट वाटे। वाटा लागलें तरि गगना भेटे। येरवीं काय चुके॥
ऐसिया बोधाचेनि सुरवाडें। मार्गामार्गाचें सांकडें।
तया सोहंसिद्धां न पडे। योगियांसी॥
या कारणें पंडुसुता। तुवां होआवें योगयुक्ता।
तेतुलेनि सर्वकाळीं साम्यता। आपैसया होईल॥

---

१ गोष्ट, वार्ता. २ भरानें. ३ खोटें. ४ केव्हांही ५ अथवा. ६ मरत नाहीं.
७ देहासुद्धां. ८ सुखानें, सोईनें.

मग भलतेथ भलतेव्हां । देह असो अथवा जावा ।
परि अबंधा नित्य ब्रह्मभावा । विघड नाहीं ॥
ज्ञा. ८. २४८–२५७.

---

## १४१ ईश्वरध्यानाचा शारीरिक परिणाम.

मग तेथ आपण । एकाग्र अंतःकरण ।
करूनि सद्गुरु स्मरण । अनुभविजे ॥
जेथ स्मरतांनि आदरें । सबाह्य सात्त्विकें भरे ।
जंव काठिण्य विरे । अहंभावाचें ॥
विषयांचा विसर पडे । इंद्रियांची कसमेस मोडे ।
मनाची घडी घडे । हृदयामाजी ॥
ऐसें ऐक्य हें सहजें । फावे तंव राहिजे ।
मग तेणेंचि बोधें बैसिजे । आसनावरी ॥
आतां आंगातें आंग वरी । पवनातें पवन धरी ।
ऐसी अनुभवाची उजरी । होंचि लागे ॥
प्रवृत्ति मांघौती मोहरे । समाधी ऐलांडी उतरे ।
आघवें अभ्यासूं सरे । बैसतेंखेंवो ॥
ज्ञा. ६. १८६–१९१

---

## १४२ ईश्वरध्यानाचा आध्यात्मिक परिणाम.

तूं प्राप्तीची चाड वाहसी । परि अभ्यासी दक्ष न होसी ।
तें सांग पां काय बिहसी । दुर्वाडपणें ॥
तरि पार्था हें झणें । सायास घेशी हो मनें ।
वायां बागुल इयें दुर्जनें । इंद्रियें करिती ॥

---

१ बंधरहित. २ करावें. ३ स्मरणाच्या. ४ रग. ५ सांभाळतें. ६ उत्कर्ष उदय. ७ मागें. ८ फिरते. ९ अलिकडे. १० बसल्याक्षणीं ११ सावध. १२ कठीपणामुळें. १३ कदाचित्. १४ भय दाखविणारे.

पाहे पां आयुष्यातें अढळ करी । जें सरतें जीवित वारी ।
तया औषधातें वैरी । काय जिव्हा न म्हणे ॥
ऐसें हितासी जें जें निकें । तें सदाचि या इंद्रियां दुखे ।
येऱ्हवीं सोपें योगासारिखें । कांहीं आहे ॥
म्हणोनि आसनाचिया गाढिका । जो आम्हीं अभ्यासू सांगितला
निका । तेणें होईल तरि हो कां । निरोध ययां ॥
येऱ्हवीं तरी येणें योगें । जें इंद्रियां विंदाण लागे ।
तैं चित्त भेटों रिगें । आपणपेयां ॥
परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियातें आपण देखे ।
देखतखेवों वोळखे । म्हणे तत्त्व हें मी ॥
तिये वोळखीचिसरिसें । सुखाचिया साम्राज्यीं बैसे ।
मग आपणपां समरसें । विरोनि जाय ॥

ज्ञा. ६. ३६०–३६७.

---

## १४३. साधूची पद्मपत्राप्रमाणें अलिप्तता.

जो अंतरीं दृढ । परमात्मरूपीं गूढ ।
बाह्य तरी रूढ । लौकिकु जैसा ॥
तो इंद्रियां आज्ञा न करी । विषयांचें भय न धरी ।
प्राप्त कर्म नाव्हेरी । उचित जें जें ॥
तो कर्मेंद्रियें कर्मीं । राहाटतां तरी न नियमी ।
परि तेथिचेनि ऊर्मीं । झांकोळेना ॥
तो कामानामात्रें न घेपे । मोहमळें न लिंपे ।
जैसें जळीं जळें न शिंपे । पद्मपत्र ॥
तैसा संसर्गामाजी असे । सकळासारिखा दिसे ।
जैसें तोय संगें आभासे । भानुबिंब ॥

---

१ स्थिर. २ दृढपणानें. ३ वेध, निग्रह. ४ अंतर्मुख. ५ बरोबर. ६ गुग, गढलेला. ७ आचरण करणारा. ८ न टाकी. ९ वेगानें. १० विकार पावत नाहीं ११ आकळला जात नाही. १२. संसारांत.

तैसें सामान्यत्वें पाहिजे । तरि साधारणचि देखिजे ।
येरवीं निर्धारितां नेणिजे । सोय[1] जयाची ॥
ऐशा चिन्हीं चिन्हित । देखसी तोचि मुक्त ।
आशापाशरहित । वोळख पां ॥

ज्ञा. ३. ६८–७४.

---

## १४४. “ शरीरीचि परी कौतुकें । परब्रह्माचेनि पाडें तुकें. ”

ऐसा शरीरीचि परी कौतुकें । ब्रह्माचेनि पाडें तुके ।
जेणें जितलीं एकें । इंद्रियें गा ॥...॥
देखे सोनयाचें निखळ[3] । मेरुयेसणें ढिसाळ ।
आणि मातियेचें डिखळ । कीं सरसेंचि मानी ॥
पाहतां पृथ्वीचें मोल थोडें । ऐसें अनर्घ्य रत्न चोखडें ।
देखे दगडाचेनि पाडें । निचाड ऐसा ॥ . ॥
तया बंधु कोण काह्याचा । द्वेषिया कवण तयाचा ।
मीचि विश्व ऐसा जयाचा । बोध जाहला ॥. . ॥
जयाचें नांव तीर्थरावो । दर्शनें प्रशस्तीसि ठावो ।
जयाचेनि संगें ब्रह्मभावो । भ्रांतासही ॥
जयाचेनि बोलें धर्म जिये । दिठी महासिद्धीतें विये ।
देखें स्वर्गसुखादि इयें । खेळ जयाचा ॥
विपायें जरी आठविला चित्ता । तरी दे आपुली योग्यता ।
हें असो तया प्रशंसितां । लाभ आथि ॥

ज्ञा. ६. ९०–१०४.

---

१ स्वरूप, स्थिति. २ तुलनेस येतो. ३ शुद्ध. ४ प्रचंड. ५ ढेंकळ. ६ अमोल. ७ पूज्यतेला. ८ कदाचित्.

## १४५ स्थितप्रज्ञस्थिति

जो सर्वत्र सदा सरिसा । परिपूर्ण चंद्र कां जैसा ।
अधमोत्तम प्रकाशा-। माजि न म्हणे ॥
ऐसी अनवच्छिन्न[1] समता । भूतमात्रीं सदयता ।
आणि पालट नाहीं चित्ता । कवणे वेळे ॥
गोमटें कांहीं पावे । तरी संतोषें तेणें नाभिभवे[2] ।
जो ओखटेंनि[3] नागवे[4] । विषादासी ॥
ऐसा हरिखशोकरहित । जो आत्मबोधभारित ।
तो जाण पां प्रज्ञायुक्त[5] । धनुर्धरा ॥

ज्ञा. २. २९७-३००.

---

## १४६ साधूंची नीतिलक्षणें.

परि तया भेटती ऐसे । जे ज्ञानें सर्वत्र सरिसे[6] ।
महाप्रळयांबूचें[7] जैसें । भरलेपण ॥
जया पुरुषांचें कां मन । सांडोनि गेलें मोह मान ।
वर्षांतीं[8] जैसे घन[9] । आकाशातें ॥...॥
फळली केली उन्मूळे[10] । तैसी आत्मलाभें प्रबळ ।
जयाची क्रिया ढाळेंढाळें[11] । गळती आहे ॥
आगी लागलिया रुखीं[12] । देखोनि सैरा पळती पक्षी ।
तैसें सांडिलें अशेखीं । विकल्पीं जे ॥....॥
लोहाचें सांकडें[13] परिसा । न जोडे आंधार रवी जैसा ।
द्वैतबुद्धीचा तैसा । दुष्काळ सदा जयां ॥.. ॥
आणि अनात्मवर्गनीर । सांडूनि आत्मरसाचें क्षीर ।
चरताति जे सविचार । राजहंस ॥...॥

---

१ अविभक्त. २ व्याप्त होत नाहीं. ३ वाईटानें ४ स्वाधीन होत नाहीं. ५ स्थितप्रज्ञ ६ सारखे. ७ महाप्रलयकालच्या पाण्याचे. ८ वर्षाऋतुच्या शेवटीं. ९ ढग. १० उन्मळून पडते. ११ क्रमाक्रमानें. १२ वृक्षाला. १३ संकट.

तैसें आत्मभ्रांतीसाठीं । वस्तु विखुरली[1] बारा वाटीं ।
ते एकवटिती ज्ञानदृष्टीं । अखंड जे ॥
किंबहुना आत्मयाचा । निर्धारीं विवेक जयाचा ।
बुडाला बोध गंगेचा । सिंधुमाजि जैसा ॥ ..॥
जैसा अग्नीचा डोंगर । नेघे कोणी बीज अंकुर ।
तैसा मनीं जयांच्या विकार । उदयजेना ॥
जैसा काढिलिया मंदराचळ । राहे क्षीराब्धि निश्चळ ।
तैसा नुठी जयां सळ[2] । कामोर्मींचा ॥
चंद्रमा कळीं[3] धाला । न दिसे कोणें आंगीं वोसावला[4] ।
तैसें अपेक्षेचा अवखळा[5] । न पडे जयां ॥...॥
एवं जे जे कोणी ऐसे । केले ज्ञानाख्यहुताशें ।
ते तेथ मिळती जैसें । हेमीं हेम ॥

ज्ञा. १५. २८४–३०५.

---

## १४४. त्रिगुणातीताचा अभेदभक्तियोग.

यया देवाचिया बोला । पार्थ अति सुखावला ।
मेघें संबोखिला[7] । मयुर जैसा ॥
तेणें तोषें वीर पुसे । जी कोण्हीं चिन्हीं तो दिसे ।
जयामाजि वसे । ऐसा बोध ॥...॥
यया अर्जुनाचिया प्रश्ना । तो षड्गुणांचा राणा ।
परिहार[8] आकर्णा[9] । बोलत असे ॥...॥
सायंप्रातर्मध्यान्हा । या तिहीं काळांची गणना ।
नाहीं जेविं तपना[10] । तैसा असे ॥...॥
ता जिणता[11] ना हारवी[12] । तैसा गुण नव्हे ना करवी ।
जैसी कां श्रोणवी[13] । संग्रामींची ॥

---

१ पसरली. २ उसळली, कडा, ३ कलांनी, ४ न्यून असलेला. ५ न्यूनता. ६ सोन्यांत ७ तृप्त केलेला ८ उत्तर ९ ऐका १० सूर्याला. ११ जिकणारा १२ हरणाला. १३ युद्धभूमी.

कां शरीरा आंतील प्राणु । घरीं आतिथ्याचा ब्राह्मणु ।
ना ना चोहटांचा स्थाणु[1] । उदास जैसा ॥
आणि गुणांचा यावाजावा[2] । ढळे चळे ना पांडवा ।
मृगजळाचा हेलावां[3] । मेरु जैसा ॥ .. ॥
परि तयाचि गा सत्ता । होती गुणक्रिया समस्ता ।
हें फुडें जाणें सविता । लौकिका जेवीं ॥
समुद्रचि भरती । सोमकांत द्रवती ।
कुमुदें विकासती । चंद्र तो उगा ॥
कां वाराचि वाजे विझे[4] । गगनें निश्चळ असिजे ।
तैसा गुणांचिये गजबजें । डोलेना जो ॥
अर्जुना येणें लक्षणें । तो गुणातीत जाणणें ।
परिसें आतां आचरणें । तयाचीं जीं ॥

ज्ञा. १४. ३१९–३४८.

तरि वस्त्रासि पाठीं पोटीं । नाहीं सुतावांचुनि किरीटी ।
ऐसें[5] सुयें[6] दिठी । चराचर मद्रूपें ॥
म्हणोनि सुखदुःखासरिसें । कांटोळें[7] आचरे ऐसें ।
रिपुभक्तां जैसें । हरीचें देणें ॥
येरवीं तरी सहजें । सुखदुःख तेंचि सेविजे ।
देहजळीं होइजे । मासोळी जें ॥
आतां तें तंव तेणें सांडिलें । आहे स्वरूपेंसींचि मांडिलें ।
सस्यांतीं निवडिलें । बीज जैसें ॥
कां वोघ सांडूनि गंगा । रिघोनि समुद्राचे अंगा ।
निस्तरली[8] लगबगा[9] । खळाळाची ॥
तेवीं आपणपांचि जया । । वस्ती जाली गा धनंजया ।
तया देहीं आपैसया । सुख तैसें दुःख ॥

---

१ खांब. २ येण्याजाण्यानें. ३ हेलाव्यानें. ४ उमा राहतो. ५ ऐक. ६ घालतो. ७ तराजु, तुलना. ८ पलीकडे गेली. ९ त्वरा.

रात्रि तैसें पाहलें[1] । हें धारणा जेविं एक जालें ।
आत्मारामा देहीं आतलें । द्वंद तैसें ॥
पैं निद्रिताचेनि आंगेंसीं । साप तैशी उर्वशी ।
तेवीं स्वरूपस्था सरिसीं । देहीं द्वंद्वें ॥
म्हणौनि तयाच्या ठायीं । शेणा सोनया विशेष नाहीं ।
रत्ना गुंडेया[3] कांहीं । नेणिजे भेद ॥
घरां येवो पां स्वर्ग । कां वरिपडो[4] वाघ ।
परि आत्मबुद्धीसी भंग । कदा नोहे ॥
निंवटलें न उपवढें । जाळिनलें न विरूढें ।
साम्यबुद्धि न मोडे । तयापरि ॥
हा ब्रह्मा ऐसेनि स्तविजो । कां नीच म्हणोनि निंदिजो ।
परि नेणे जळो विझो । राख जैसी ॥...॥
ईश्वर म्हणोनि पूजिला । कां चोर म्हणोनि गांजिला ।
वृषगजीं वेढिला । केला रावो ॥
कां सुहृद पासीं आले । अथवा वैरी वरपडे जाले ।
परि नेणे राती पाहालें । तेज जेवीं ॥
साही ऋतु येतां आकाश । लिंपिजेचि ना जैसें ।
तेविं वैषम्य मानसें । जाणिजेना ॥
आणीकही एक पाहीं । आचार तयाच्या ठायीं ।
तरि व्यापारांसि नाहीं । जालें दिसे ॥

ज्ञा. १४. ३५०–३६५

तरि अभिचाररहितचित्तें । भक्तियोगें मातें ।
सेवी तो गुणांतें । जाकळूं शके ॥
तरि कोण मी कैसी भक्ति । अव्यभिचारा काय व्यक्ति ।
हे आघवीचि निरुती । होआवी लागे ॥

---

१ उजाडलें. २ खांबाला. ३ दगडाला. ४ उडी घाली. ५ मेलेलें. ६ जागे होणें. ७ स्वाधीन करूं. ८ विचार, निश्चय.

तरी पार्था परियेसा । मी तंव येथ ऐसा ।
रत्नीं किं[१]ळावो जैसा । रत्नचि तो ॥
कां द्रवपणचि नीर । अवकाशचि अंबर ।
गोडी तेचि साखर । आन नाहीं ॥
वह्नी तेचि ज्वाळ । दळां[२]चि नांव कमळ ।
रूख तेंचि डों[३]ळ । फळादिक ॥
अगा हि[४]मं जें आकर्[५]षलें । तेंचि हिमवंत जेविं जालें ।
नाना दूध मुरालें । तेंचि दही ॥
तैसें विश्व येणें नांवें । हें मीचि पैं आघवें ।
घेई चंद्रबिंब सोलावें । न लगे जेंवी ॥
घृताचें थिजलेंपण । न मोडितां घृतचि जाण ।
कां नाटितां कांक[६]ण । सोनेंचि तें ॥
न उकलितां पट । तंतूचि असे स्पष्ट ।
न विरवितां घट । मृत्तिका जेवीं ॥
म्हणोनि विश्वपण जावें । मग मातें घयावें ।
तैसा नव्हे आघवें । सकटचि मी ॥
ऐसेनि मातें जाणिजे । ते अव्याभिचारी भक्ति म्हणिजे ।
येथ भेदु कांहीं देखिजे । तरि व्यभिचार तो ॥

ज्ञा. १४. ३७१–३८१.

याकारणें भेदातें । सांडूनि अभेदें चित्तें ॥
आपणयासकट मातें । जाणावें गा ॥
पार्था सोनयाची टिक[७] । सोन्यासी लागली देख ।
तैसें आपणपें आणिक । मानावें ना ॥
तेजाचा तेजौनि निघाला । परि तेजींचि असे लागला ।
तया रश्मी ऐसा भला । बोध होआवा ॥

---

१ कांति, तेज. २ पांकळी. ३ फांदी. ४ थंडी ५ घट्ट झाली.
६ सोन्याचें कडें, ७ टिकली.

पैं परमाणु भूतळीं । हिमकण हिमाचळीं ।
मजमाजीं न्याहाळीं । अहं तैसें ॥
हो कां तरंग लहान । परि सिंधूसीं नाहीं भिन्न ।
तैसा ईश्वरीं मी आन । नोहेचि मा ॥
ऐसेनि बा समरसें । दृष्टि जें उल्लासे ।
भक्ति पैं ऐसें । आम्हीं म्हणों ॥

ज्ञा. १४. ३८२.-३८७.

आणि ज्ञानाचें चांगावें । इये दृष्टि मानावें ।
योगाचेंही आघवें । सर्वस्व हें ॥
सिंधु आणि जलधरा-[१] माजी लागली अखंड धारा ।
तैसी वृत्ति वीरा । प्रवर्ते ते ॥
कां कुहेंसीं[२] आकाशा । तोंडीं सांदा नाहीं जैसा ।
तो परमपुरुषीं तैसा । एकवटे गा ॥
प्रतिबिंबौनि बिंबवरी । प्रभेची जैसी उजरी ।
ते सोहंवृत्ति अवधारीं । तैसी होय ॥
ऐसेनि मग परम्परें । ते सोहंवृत्ति जें अवतरे ।
तें तियेही सकट सरे । अपैसया ॥
जैसा सैंधवाचा रवा[३] । सिंधूमाजि पांडवा ।
विरालेया विरवावा । हेंही ठाके ॥
नातरि जाळूनि तृण । वन्हि ही विझे आपण ।
तैसे भेद नाशूनि जाण । ज्ञानही नुरे ॥
माझें पैलपणें[४] जाये । भक्त हें ऐलपण ठाये ।
अनादि ऐक्य जें आहे । तेंचि निवडे ॥
आतां गुणातें तो किरीटी । जिणें या नव्हती गोष्टी ।
जे एकपणाही मिठी । पडो सरली ॥

---

१ आडास. २ जोड. ३ खडा. ४ पलीकडेपणा.

किंबहुना ऐसी दशा । तें ब्रह्मत्व गा सुदंशा[1] ।
हें तो पावे जो ऐसा । मातें भजे ॥
पुढतीं इहीं लिंगीं । भक्त जो माझा जगीं ।
हे ब्रह्मता तयालागीं । पतिव्रता ।
जैसें गंगेचेनि वोघें । डळमळीत जळ जें निघे ।
सिंधुपद तया जोगें । आन नाहीं ॥
तैसा ज्ञानाचिया दिठी । जो मातें सेवी किरीटी ।
तो होय ब्रह्मतेच्या मुकुटीं । चूडारत्न[2] ॥

ज्ञा. १४. ३८९–४००.

## १४८. अष्टसात्त्विकभाव

तेथ एक विश्व एक आपण । ऐसें अळुमाळु[3] होतें जें दुजेपण ।
तेंही आटोनि गेलें अंतःकरण । विरालें सहसा ॥
आंतु आनंदा चेइरें[4] जाहालें । बाहेरी गात्रांचें[5] बळ हारपोनि गेलें ।
आपाद पांगुतलें[6] । पुलकांचलें[7] ॥
वर्षिये[8] प्रथमदशे । वोहंळलया[9] शैलांचें सर्वांग जैसें ।
विरूढे कोमलांकुरीं तैसें । रोमांच जाहाले ॥
शिवतला चंद्रकरीं । सोमकांत द्राव धरी ।
तैसिया स्वेदकणिका[10] शरीरीं । दाटलिया ।
माजि सांपडलेनि अलिकुळें[11] । जळावरी कमळकळिका जेविं आंदोळे[12]
तेविं आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरी कांपे ॥
कपुरकर्दळीचीं[13] गर्भपुटें[14] । उकलतां कापुराचेनि कोंदाटें[15] ।
पुलिका[16] गळती तेविं थेंबुटें । नेत्रोनि[17] पडती ॥

---

१ मर्मज्ञा. २ शिरोभूषण. ३ थोडेंसें. ४ जागृति. ५ इंद्रियांचें. ६ व्याप्त झालें. ७ रोमांचानीं. ८ वर्षाऋतूंत. ९ ओहळून गेल्यावर. १० घामाचे बिंदु. ११ भ्रमरसमुदायानें. १२ हालते. १३ कापुरकेळीची. १४ गाभ्याचे पडदे. १५ दाट भरणें. १६ कण. १७ नेत्रांतून.

उदयलेनि सुधाकरें[1]। जैसा भरलाचि समुद्र भरे।
तैसा वेळोवेळीं ऊर्मिभरें। उचंबळत असे॥
ऐसा सात्विकांही आठां भावां। परस्परें वर्ततसे हेवा।
तेथ ब्रह्मानंदाची जीवा। राणीव[2] फावली॥
तेथ बैसला होता जिया सवा[3]। तिया।चिकडे मस्तक खालाविला
देवा। मग जोडूनि करसंपुट बरवा। बोलत असे॥

ज्ञा. ११. २४५–२५४.

---

## १४९. " अंतरात्मयाही निश्चळा। आली शियारी. "

देवा विश्वरूप पहावयाचे डोहळे[4]। केले तियें पावलों प्रतिफळें।
बापा देखिलासी आतां डोळे। निवावे तैसे निवाले॥
अहो देह पार्थिव[5] कीर जाये। ययाची काकुळती कवणा आहे।
परि आतां चैतन्य माझें विपायें। वांचेल कीं न वांचे॥
येऱ्हवीं भयास्तव आंग कांपे। नावेक आगळें तरि मन तापे।
अथवा बुद्धी वासिपे[6]। अभिमान विसरिजे॥
परि येतुलियाही वेगळा। जो केवळ आनंदैककळा।
तया अंतरात्मयाही निश्चळा। आली शियारी[7]॥
बाप साक्षात्काराचा वेध[8]। कैसा देशधडी[9] केला बोध।
हा गुरुशिष्यसंबंध। विपायें[10] नांदे॥

ज्ञा. ११. ३६६–३७०.

---

## १५०. स्वरुपानंदांत द्वैतभाषेचा आत्यंतिक लोप.

परि तें वेगळेंपणें भोगिजे। जैसें पक्षिये फळ चुंबिजे[11]।
तैसें नव्हे, तेथ विसरिजे। भोगितेंपणही॥

---

१ चंद्र. २ राज्य. ३ ज्या बाजूस. ४ उत्कट इच्छा. ५ मातीचा. ६ भिते. ७ कांटा, कंप. ८ छंद. ९ देशपार. १० क्वचित्च. ११ सेवावें.

भोगीं अवस्था एक उठी। ते अहंकाराचा अंचळ[1] लोटी[2]।
मग सुखेंसी घे आंठी[3]। गाढेपणें[4]॥
तियें आलिंगनमेळीं। होय आपेंआप कवळी।
तेथ जळ जैसें जळीं। वेगळें न दिसे॥
कां आकाशीं वायो हरपे। तेथ "दोन्ही" हे भाष लोपे।
तैसें सुखाचि उरे स्वरूपें। सुरतीं तिये॥
ऐशी द्वैताची भाष जाय। मग म्हणों जरी एकचि होय।
तरि येथ साक्षी कवण आहे। जाणतें जें॥

ज्ञा. ५. १३१–१३५.

---

## १५१. "प्राप्तिचिया पैलतीरीं। विपाइला निघे"

पैं गा मनुष्यांचिया सहस्रंशा[5]–। माजि विपाइलेचिया[6] येथ धिंवसा[7]।
तैसेया धिंवसेकरां बहुवसा–। माजि विरळा जाणे॥
जैसा भरलेया त्रिभुवना–। आंत एक एक चांग अर्जुना।
निवडूनि कीजे सेना। लक्षवरी॥
कीं तयाही पाठीं[8]। जे वेळीं लोहं[9] मासातें घांटी[10]।
ते वेळीं विजयश्रियेचिया पाटीं[11]। एकचि बैसे॥
तैसे आस्थेच्या महापुरीं। रिघताती कोटिवरी।
परि प्राप्तीच्या पैलतिरीं। विपाइला निघे॥

ज्ञा. ७. १०–१३.

---

## १५२. ईश्वराचा क्रमाक्रमानें साक्षात्कार.

ऐसी आत्मसाक्षात्कारीं। लाभे ज्ञानाची उंजरी[12]।
ते सामग्री कीर पुरी। मेळविली॥

---

पडदा. २ दूर करते. ३ आलिंगन ४ दृढपणानें. ५ हजारोंत. ६ एखाद्याला. ७ धैर्य. ८ नंतर. ९ शस्त्र. १० कांपतें. ११ पदावर. १२ प्रकाश, उत्कर्ष.

आणि तेचि समयीं । सद्गुरु भेटले पाहीं ।
तेवींचि तिहीं कांहीं । वंचिजेना[1] ॥
परि वोखद[2] घेतखेंवो । काय लाभे आपला ठावो ।
कां उदयजतांची दिवो । माध्यान्ह होय ॥
सुक्षेत्रीं आणि वोलटें[3] । बीजही पेरिलें गोमटें ।
तरि अलोट[4] फळ भेटे । परि वेळें कीं गा ।
जोडला मार्ग प्रांजळ[5] । मिनला सुसंगाचाही मेळ ।
तरि पाविजे वांचूनि वेळ । लागेचि कीं ॥
तसा वैराग्यलाभ जाला । वरी सद्गुरुही भेटला ।
जीवीं अंकुर फुटला । विवेकाचा ॥
तेणें ब्रह्म एक आथी । येर आघवीची भ्रांति ।
हेही कीर प्रतीती । गाढ[6] केली ॥
परि तेंचि जें परब्रह्म । सर्वात्मक सर्वोत्तम ।
मोक्षाचेंहि काम । सरे जेथ ॥
यया तिन्ही अवस्था पोटीं । जिरवी जें गा किरिटी ।
तया ज्ञानासही मिठी । दे जें वस्तु ॥
ऐक्याचें एकपण सरे । जेथ आनंदकण ही विरे ।
कांहींचि नुरोनि उरे । जें कांहीं गा ॥
तिये ब्रह्मीं ऐक्यपणें । ब्रह्मचि होऊनि असणें ।
तें क्रमेंचि करूनि तेणें । पाविजे पैं ॥
भुकेलियापासीं । वोगरिलें[7] षड्रसीं ।
तो तृप्ति प्रतिग्रासीं । लाहे जेवीं ॥
तैसा वैराग्याचा ओलावा । विवेकाचा तो दिवा ।
आंबुथितां आत्मठेवा । काढीचि तो ॥
तरि भोगिजे आत्मऋद्धि । येवढी योग्यतेची सिद्धि ।
जयाच्या आंगीं निरवधि[9] । लेणें जाली ॥

---

१ फसवलें नाहीं. २ औषध. ३ ओल्या जमीनीत. ४ अत्यंत. ५ सरळ, सोपा. ६ दृढ ७ वाढलें. ८ उजळला असतां. ९ अत्यंत.

तो जेणें क्रमें ब्रह्म । होणें करी गा सुगम[1] ।
तया क्रमाचें आतां वर्म । आईक सांगों ॥
ज्ञा. १८. ९९६-१०१०.

---

## १५३. "साधनहतियेर । हळूचि ठेवी."

ऐसा जितलिया रिपुवर्ग । अपमानिलिया हें जग ।
अपैसा[2] योगतुरंग । स्थिर जाला ॥
वैराग्याचें गाढलें[3] । अंगत्राण[4] होतें भलें ।
तेंहीं नावेंकें[5] ढिलें । तेव्हां करी ॥
आणि निर्वटी[6] ध्यानाचें खांडें[7] । तें दुजें नाहींचि पुढें ।
म्हणूनि हात आसुडे । वृत्तीचाही ॥
जैसें रसौषध खरें । आपुलें काज करूनि पुरें ।
आपणही नुरें । तसें होतसे ॥
देखोनि ठाकिजता ठावा । धांवता थिरावे पावो ।
तैसा ब्रह्मसामीप्यें थांवो[10] । अभ्यास सांडी ॥
घडतां[11] महोदधीसी । गंगा वेग सांडी जैसी ।
कां कामिनी कांतापासीं । स्थिर होय ॥
ना ना फळातिये वेळे । केळीची वाढी मांटुळे[12] ।
कां गांवापुढें वळे । मार्ग जैसा ॥
तैसा आत्मसाक्षात्कार । होईल देखोनि गोचर ।
ऐसा साधनहतियेर[13] । हळूचि ठेवी ॥
म्हणौनि ब्रह्मेंसीं तया । ऐक्याचा समो[14] धनंजया ।
होतसे तैं उपाया । वोहट पडे ॥
मग वैराग्याची गोधेळुक[15] । जें ज्ञानाभ्यासाचें वार्धक्य ।
योगफळाचाही परिपाक । दशा जे कां ॥

---

१ सोपें. २ सहजच. ३ अंगावर बळकट घातलेलें. ४ कवच. ५ क्षणभर. ६ उगारणें. ७ तरवार. ८ हिसका बसतो. ९ विश्रांतिस्थान. १० बळ. ११ मिळतां. १२ खुटते. १३ शस्त्र. १४ समय, वेळ. १५ मावळती वेळ.

ते शांति पैं गा सुभगा । संपूर्ण ये तयाचिया आंगा ।
तैं ब्रह्म होआवयाजोगा । होय तो पुरुष ॥
पुनवेहुनी चतुर्दशी । जेतुलें उणेंपण शशी ।
कां सोळेया ऊनी जैसी । पंधरावी वानी ॥
सागरींही पाणी वेगें । संचरे तें रूप गंगे ।
येर निश्चळ जें उगें । तें समुद्र जैसा ॥
ब्रह्मा आणि ब्रह्महोतियें । योग्यते तैसा पाड आहे ।
तेंचि शांतीचेनि लोंहें । होतें तो गा ॥

ज्ञा. १८. १०७६–१०८९.

---

## १५४. भक्ताची ईश्वरस्वरूपांत निमग्नता.

ऐसा शरीरसंयोगाचिये राती–। माजि धांवतां सडिया आयितीं।
तंव कर्मक्षयाची पोहाती । पाहांट जाली ॥
तैसीच गुरुकृपा उखा उजळली । ज्ञानाची वोतपैली पडली ।
तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दृष्टी ॥
ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया एक आहे ।
अथवा निवांत जरी राहे । तऱ्ही मीचि तया ॥
हें असो आणीक कांहीं । तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं ।
जैसें सबाह्यजळ डोहीं । बुडालिया घटा ॥
तैसा तो मजभीतरीं । मी तया आंतबाहेरीं ।
हें सांगिजेल बोलवरी । तैसें नव्हे ॥

ज्ञा. १३०–१३४.

---

१ कस. २ मिळवितो. ३ एकटा. ४ तयारीनें. ५ उजाडती. ६ उषःकाल. ७ कोंवळें ऊन. ८ वाट.

## १५५. भक्तांचें संवादसुख.

चित्तें मीचि जाहाले । मियेंचि प्राणें धाले[1] ।
मग जीवों मरों विसरले । बोधाचिया भुलीं ॥
मग तया बोधाचेनि माजें[2] । नाचती संवादसुखाचेनि भोजें[3] ।
आतां एकमेकां घेपे दीजे । बोधचि वरी ॥
जैसीं जवळिकेचीं सरोवरें । उचंबळलिया कालवती परस्परें ।
मग तरंगासी धवळारें[4] । तरंगचि होती ॥
तैसी येरयेरांचिये मिळणीं[5] । पडत आनंदकल्लोळांची वेणी ।
तेथें बोधाचीं लेणीं । बोधेंचि मिरवी ।
जैसें सूर्यें सूर्यातें वोवाळिलें । कीं चंद्रें चंद्रम्या खेंव दीधलें ।
ना तरी सारिसेनि पाडें[6] मिनले । दोन्हीं वोघ ।
तैसें प्रयाग होत सामरस्याचे[7] । वरी वोसाण[8] तरत सात्त्विकाचें ।
ते संवादचतुष्पथींचे[9] । गणेश जाहाले ॥
पैं गुरुशिष्यांचिया एकांतीं । जे अक्षरा एकाची वदंती[10] ।
ते मेघाचिया परी त्रिजगतीं । गर्जती सैंघ[11] ॥
जैसी कमळकळिका जालेपणें । हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे ।
दे राया रंका पारणें । आमोदाचें[12] ॥
तैसेंचि मातें विश्वीं कथित । कथितेनि तोषें कथूं विसरत ।
मग तया विसरामाजि विरत । आंगें जीवें ॥

ज्ञा. १०. ११९-१२८.

---

१ तृप्त झाले. २ मदानें. ३ संतोषानें. ४ धवलागारें, चुनेगच्चीं घरें. ५ आलिंगन. ६ योग्यतेनें. ७ ऐक्यरसाचें. ८ पुरांतील वाहून येणारीं लांकडें. ९ संवादरूप चौकांतील (जेथें चार रस्ते मिळतात तेथें) १० उच्चार. ११ पुष्कळ. १२ सुवास.

## १५६. ईश्वरास प्रियतम कोण ?

जें न सांगेचि पितया वसुदेवासी । जें न सांगेचि माते देवकीसी ।
जें न सांगेचि बंधु बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेंसीं बोलत ॥
देवी लक्ष्मी येवढी जवळिक । ते ही न देखे या प्रेमाचें सुख ।
आजि कृष्णप्रेमा बिक । यातेंचि आथि ॥
सनकादिकांचिया आशा । वाढीनल्या कीर वहुवसा ।
परि त्याही येणेंमानें[२] यशा । येतीचिना ॥
या श्रीजगदीश्वराचें प्रेम । एथ दिसतसे निरुपम ।
कैसें पार्थें येणें सर्वोत्तम । पुण्य केलें ॥

ज्ञा. ४. ८–११.

---

## १५७. "तो वल्लभा मी कांत । ऐसा पढिये."

तो सर्वभूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेचि कहीं ।
आपपर नाहीं । चैतन्या जैसा ॥
उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे ।
हें कांहींचि नेणिजे । वसुधा जेवीं ॥...॥
गाईची तृषा हरूं । व्याघ्रा विष होऊनि मारूं ।
ऐसें नेणेंचि गा करूं । तोय जैसें ॥
तैसी आघवियांचि भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री ।
कृपेसी धात्री[३] । आपण जो ॥
आणि मी हे भाष नेणे । माझें कांहींचि न म्हणे ।
सुखदुःख जाणणें । नाहीं जया ॥
तेवींचि क्षमेलागीं । पृथ्वीसी पैजाड[४] आंगीं ।
संतोषा उत्संगीं[५] । दिधलें घर ॥ - ॥
जीव परमात्मा दोन्ही । बैसले एकासनीं ।

---

१ बळ. २ याच्या मानानें. ३ पृथ्वी, आधार. ४ योग्यता. ५ मांडीवर.

जयाचिया हृदयभुवनीं । विराजती[1] ॥
ऐसा योगसमृद्धि । होऊनि जो निरवधि ।
अर्पी मनोबुद्धि । माझ्या ठायीं ॥
आंत बाहेरीं योग । निर्वाळलेयाही[2] चांग ।
तरि माझा अनुराग[3] । सप्रेम जया ॥
अर्जुना तो भक्त । तोचि योगी तोचि मुक्त ।
तो वल्लभा[4] मी कांत[5] । ऐसा पढिये ॥...॥
तरि पढियंतयाची[6] कहाणी[7] । हे भुलीची[8] भारणी ।
इयें तंव न बोलणीं । परि बोलवी श्रद्धा ॥...॥
तरी आतां बोलों । भलें या सुखा मीनलों ।
ऐसें म्हणतखेवीं डोलों । लागला देवो ॥

ज्ञा. १२. १४४–१६३.

## १५८. भक्तांच्या योगक्षेमाची काळजी देवास आहे.

पैं सर्वभावेंसीं[9] उखितें[10] । जे वोपिले[11] मज चित्तें ।
जैसा गर्भगोळ उद्यमातें । कोण्याही नेणे ॥
तैसा मीवांचुनी कांहीं । आणीक गोमटेंचि नाहीं ।
मजचि नाम पाहीं । जिणेयां[12] ठेविलें ॥
ऐसें अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसांते[13] मातें ।
जे उपासिती तयांतें । मीचि सेवीं ॥
ते एकवटूनि जिये क्षणीं । अनुसरले गा माझिये वांहणीं[14] ।
तेव्हांचि तयांची चिंतवणीं[15] । मजचि पडली ॥
मग तिहीं जें जें करावें । तें मजचि पडलें आघवें ।
जैसी अजातपक्षाचेनि[16] जीवें । पक्षिणी जिये ॥

---

१ शोभतात. २ निर्मलपणें सिद्ध झाल्यावरही. ३ प्रीति. ४ स्त्री ५ पति. ६ आवडत्याची. ७ गोष्ट. ८ भुरळ. ९ सर्व प्रकारच्या वृत्तीसहित. १० उक्तें. ११ विकले. १२ जगण्याला. १३ चिंतीत असतां. १४ मार्गाला. १५ काळजी. १६ पंख न फुटलेल्याच्या.

आपुली तहानभूक नेणे । तान्हया निकें तें माउलीसचि करणें ।
तैसे अनुसरले मज प्राणें । तयांचें सर्व मी करी ॥
तया माझिया सायुज्याची चाड । तरि तेंचि पुरवीं कोड ।
कां सेवा म्हणती तरि आड । प्रेम सुये ॥
ऐसा मनीं धरिती जो जो भावो । तो पुढां पुढां लागे तया देवो ।
आणि दिधलियाचा निर्वाहो । तोही मीचि करी ॥
हा योगक्षेम आघवा । तयांचा मजचि पडिला पांडवा ।
जयांचिया सर्वभावा । आश्रय मी ॥

ज्ञा. ९. ३३५–३४३

---

## १५९ " काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ? "

कर्मेंद्रियें सुखें । करिती कर्में अशेखें ।
जियें कां वर्णविशेखें । भागा आलीं ॥
विधीतें पाळित । निषेधातें गाळित ।
मज देऊनि जाळित । कर्मफळें ॥
ययापरी पाहीं । अर्जुना माझे ठायीं ।
संन्यसूनि नाहीं । करितीं कर्में ॥
आणीकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव ।
तयां मीवांचूनि धांव । आनौती नाहीं ॥
ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर ।
ध्यानमिषें घर । माझें झाले ॥
जयांचिये आवडी । केली मजसीं कुळवाडी ।
भोगमोक्ष बापुडीं । त्यजिलीं कुळें ॥
ऐसे अनन्ययोगें । विकले जीवें मनें आंगें ।
तयांचें कायि एक सांगें । जें सर्व मी करीं ॥...॥

---

१ घालतो. २ हेतु. ३ व्यवस्था. ४ योग = आप्राप्ताची प्राप्ति, क्षेम = प्राप्ताचें संरक्षण. ५ अर्पण करून. ६ नाहींशीं. ७ अन्य, दुसरी. ८ व्यवहार. ९ दीन.

तोवीं मी तयां । जैसे असती तैसियां ।
कळिकाळ नोकोनियां । घेतला पटां ॥
ये-हवीं तरी माझिया भक्तां । आणि संसाराची चिंता ।
काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ॥

ज्ञा. १२. ७६–८५.

---

१६०. "आणि काळाची दृष्टि न पडे । हें आम्हां करणें"

ऐसें प्रेमाचेनि बहुवसपणें । नाहीं रातीदिवो जाणणें ।
केलें माझें सुख अव्यंगवाणें । आपणपेयां जिहीं ॥
कां जे ते जिया वाटा । निगाले गा सुभटा ।
ते सोयँ पाहोनि अव्हांटा । स्वर्गापवर्ग ॥...॥
आतां यावरी येतुलें घडे । जे तेंचि सुख आगळें वाढे ।
आणि काळाची दृष्टि न पडे । हें आम्हां करणें ॥
ललयाचिया बाळका किरीटी । गवसणी करूनि स्नेहाचिया दिठी ।
जैसी खेळतां पाठोपाठीं । माउली धांवे ॥
तें जो जो खेळ दावी । तो तो पुढें सोनयाचा करूनि ठवी ।
तैसी उपास्तीची पदवी । पोषित मी जायें ॥
जिये पदवीचेनि पोषकें । ते मातें पावती यथासुखें ।
हे पाळती मज विशेखें । आवडे करूं ॥
पैं गा भक्तांसि माझें कोड । मज तयांचे अनन्यगतीची चाड ।
कां जे प्रेमळांचें सांकड । आमुचिया घरीं ॥
पाहे पां स्वर्गमोक्ष उपांयिले । दोन्ही मार्ग तयांचिया वाहणी केले ।
आम्हीं आंगही शेखीं वेंचिलें । लक्ष्मियेसीं ॥

---

१ जिंकून, पराभवकरून. २ पदरांत. ३ कोरडी भिक्षा. ४ आधिक्यानें. ५ पूर्ण. ६ आपलेसें. ७ मार्ग. ८ आडमार्ग ९ स्वर्ग व मोक्ष. १० अधिक ११ आवडत्या. १२ पांघरूण. १३ उपासनेची. १४ योग्यता, अधिकार. १५ रक्षण, क्षेम. १६ आवड. १७ उत्पन्न झालेले. १८ मार्ग, रहदारी. १९ शेवटीं.

परि आपणपेंवीण जें एक । तें तसेंचि सुख साजुक ।
सप्रेमालागीं देख । ठविलें जतन ॥

ज्ञा. १०. १२९–१३९.

---

## १६१. "आम्हीं भावाचे पाहुणे । भलतेया"

मग निःसीमभावउल्हासें । मज अर्पावयाचेनि मिसें ।
फळ एक आवडे तसें । भलतयाचें हो ॥
भक्त माझियेकडे दावी । आणि मी दोन्ही हात वोडवीं ।
मग देंठ न फाडितां सेवीं । आदरेंसीं ॥
पैं गा भक्तीचेनि नांवें । फूल एक मज द्यावें ।
तें लेखें तरि म्यां तुरंबावें । परि मुखींचि घाली ।
हें असो कायसीं फुलें । पानचि एक आवडतें जाहालें ।
तें साजुकही न हो, सुकलें । भलतैसें ॥
परि सर्वभावें भरलें देखें । आणि भुकेला अमृतें तोखे ।
तैसें पत्रचि परि तेणें सुखें । आरोगूं लागें ।
अथवा ऐसेंही एक घडे । जें पालाही परि न जोडे ।
तरी उदकाचें तंव सांकडें । नव्हेल कीं ॥
तें भलतेथ निमोलें । न जोडितां आहे जोडिलें ।
तेंचि सर्वस्व करूनि अर्पिलें । जेणें मज ॥
तेणें वैकुंठापासोनि विशाळें । मजलागीं केलीं राउळें ।
कौस्तुभाहूनि निर्मळें । लेणीं दिधलीं ॥....॥
हें सांगावें काय किरीटी । तुवांचि देखिलें आपुलिया दिठी ।
मी सुदामयाचिया सोडी गांठी । पव्हयासाठीं ॥
पैं भक्ति एकी मी जाणें । तेथ सानें थोर न म्हणे ।
आम्हीं भावाचे पाहुणे । भलतेया ॥

---

१ अनुच्छिष्ट. २ अमर्याद प्रेमाच्या उत्कर्षानें. ३ निमित्तानें. ४ हवें तें. ५ पुढें करतो. ६ तोडतां. ७ समज. ८ हुंगावें. ९ तुष्ट होतो. १० खाऊं लागतो. ११ किंमतीवांचून. १२ घरें.

येर पत्र पुष्प फळ । हें भजावया मिस केवळ ।
वांचूनि आमुचियालागीं निष्कळ । भक्तितत्त्व ॥
म्हणोनि अर्जुना अवधारीं । तूं बुद्धी एकी सोपारी करीं ।
तरी सहजें आपुलिया मनोमंदिरीं । न विसंबें मातें ॥

ज्ञा. ९. ३८२–३९७.

---

१६२. "तयातें आम्हीं माथां । मुकुट करूं."

मग यावरीही पार्था । माझ्या भजनीं आस्था ।
तरी तयातें मी माथां । मुकुट करी ॥...॥
जे पुरुषार्थसिद्धि चौथी । घेऊनि आपुलिया हातीं ।
रिगाला भक्तिपंथीं । जगा देत ॥
कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडीबांधी करी ।
कीं जळाचिये परी । तळवट घे ॥
म्हणोनि गा नमस्कारूं । तयातें आम्हीं माथां मुकुट करूं ।
तयाची टांच धरूं । हृदयीं आम्हीं ॥
तयाचिया गुणांचीं लेणीं । लेववूं आपुलिये वाणीं ।
तयाची कीर्ति श्रवणीं । आम्हीं लेवूं ॥
तो पाहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसि मज डोळे ।
हातींचेनि लीलाकमळें । पूजूं तयातें ॥
दोंवरी दोनी । भुजा आलों घेउनी ।
आलिंगावयालागुनी । तयाचें आंग ॥....॥
आम्हीं तयाचें करूं ध्यान । ते आमुचें देवतार्चन ।
तें वांचूनि आन । गोमटें न मानूं ॥
तयाचें आम्हां व्यसन । ते आमुचे निधिनिधान ।
किंबहुना समाधान । ते मिळती तें ॥

ज्ञा. १२. २१४–२३७.

---

१ स्वाधीन. २ विसरूं नकोस. ३ श्रद्धा. ४ नम्रता. ५ इच्छा. ६ हात

## १६३. भक्तांचिया उद्धाराची काळजी ईश्वरास आहे.

जन्ममृत्यूचिया लाटीं[1] । झेळंबतां[2] इया सृष्टीं ।
तें देखोनियां पोटीं । ऐसें जाहालें ॥
भवसिंधूचेनि माजें । कवणासी धाक[3] नुपजे ।
तेथ जरी कां माझे । बिहिती हन ॥
म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा ।
करूनि त्यांचिया गांवा । धांवत आलों ॥
नामाचेया सहस्रवरी । नावा इया अवधारीं ।
सजूनियां[4] संसारीं । तारूं जाहलों ॥
सडे[5] जे देखिले । ते ध्यानकांसे लाविले ।
परिग्रही घातले । तरियांवरी[6] ॥
प्रेमाची पेटी । बांधली एकाचिया पोटीं ।
मग आणले तटीं । सायुज्याचिया ॥
परि भक्तांचेनि नांवें । चतुष्पदादि[7] आघवे ।
वैकुंठीचिये[8] राणिवे । योग्य केले ॥
म्हणोनि गा भक्तां । नाहीं एकही चिंता ।
तयांतें समुद्धर्ता । आथि मी सदा ॥
आणि जेव्हांचि कां भक्तीं । दिधली आपुली चित्तवृत्ति ।
तेव्हांचि मज सूति[9] । त्यांचिये नाटीं[10] ॥
याकारणें गा भक्तराया । हा मंत्र तुवां धनंजया ।
शिकिजे जे यया । मार्गा भजिजे ॥

ज्ञा. १२, ८७-९६.

---

१ लाटांनीं. २ बुडतील, स्पर्श केले जातील. ३ भीति. ४ तयार करून. ५ एकटे. ६ नावेवर. ७ पश्वादिक. ८ राज्याला. ९ प्रवेश. १० ठिकाणी.

## १६४. देहांतींच्या दुःखाचें ईश्वर निवारण करितो.

तेथ अर्जुना जरी विपायें[1] । तुझ्या जीवीं हन ऐसें जाये ।
ना हें स्मरण मग होये । कायसयावरी अंतीं ॥
इंद्रियां अनघड[2] पडलिया[3] । जीविताचें[4] सुख बुडालिया ।
आंत बाहेरीं उघडलिया । मृत्युचिन्हें ॥
ते वेळीं बैसावेंचि कवणें[6] । मग कवण निरोधी करणें[5] ।
तेथ काह्यांचेनि अंतःकरणें । प्रणव स्मरावा ॥
तरि गा ऐसीया हो ध्वनी[7] । झणें थारा देशी गा मनीं ।
पैं नित्य सेविला मी निदानीं । सेवक होय ॥
जे विषयांसि तिळांजुळी[8] देउनी । प्रवृत्तीवरी निगड[9] वाउनी[10] ।
मातें हृदयीं सूनी । भोगिताती ॥ ॥
ऐसे निरंतर एकवटले । जे अंतःकरणीं मजसीं लिगटले[11] ।
मीचि होउनी आतले । उपासिती ॥
तया देहावसान जें पावे । तें तिहीं मातें स्मरावें ।
मग म्यां जरी न पावावें । तरी उपास्ति[12] ते कायसी ॥
पैं रंकें[13] एक आडलेपणें । काकुळती धांव गा धांव म्हणे ।
तरि तयाचिये ग्लानी[14] धांवणें । काय न घडे मज ॥
आणि भक्तांहीं तेचि दशा । तरि भक्तीचा सोस[15] कायसा ।
म्हणऊनि हा ध्वनी ऐसा । न वाखाणावा[16] ॥
तिहीं जे वेळीं स्मरावा । ते वेळीं स्मरिला कीं पावावा ।
तो आभारही जीवा । साहवेचिना ॥
तें ऋणवैपण[17] देखोनि आंगीं । मी आपुलियाचि उत्तीर्णत्वालागीं[18] ।
भक्तांचिया तनुत्यागीं । परिचर्या[19] करीं ॥

---

१ कदाचित्. २ असमर्थता. संकोचितता. ३ प्राप्त झाली असतां. ४ जगण्याचें. ५ इंद्रियें. ६ कोणत्या. ७ संशय ८ सर्वथैव सोडून ९ हत्तीच्या पायाला अडकवण्याची बेडी. १० घालून ११ तल्लीन झाले. १२ उपासना. १३ दीन. १४ संकट, दुःख १५ खटाटोप. १६ बोलूं नकोस. १७ कर्जाचें ओझें. १८ उतराईकरतां. १९ सेवा.

देहवैकल्याचा[1] वारा । झणें लागेल या सुकुमारा ।
म्हणोनि आत्मबोधाचे पांजिरां[2] । सुयें तयातें ॥
वरि आपुलिया स्मरणाची उवायिली[3] । हींव[4] ऐसी करीं साउली ।
ऐसेनि नित्यबुद्धि संचली । मी आणी तयातें ॥
म्हणोनि देहांतीचें सांकडें । माझियां कहींचि न घडे ।
मी आपुलियांतें आपुलीकडे । सुखेंचि आणीं ॥

ज्ञा. ८. १२०.–१३४

---

## १६५. साधु देह कसा ठेवतो ?

तया अभ्यंगवाणेया[5] ब्रह्मातें । प्रयाणकाळे प्राप्ते[6] ।
जो स्थिरावलेनि चित्तें । जाणोनि स्मरे ॥
बाहेर पद्मासन रचुनी । उत्तराभिमुख बैसोनि ।
जीवीं सुख सूनी । कर्मयोगाचें ॥
आंतु मिनलेनि[7] मनोधर्में । स्वरूपप्राप्तीचेनि प्रेमें ।
आपेंआप संभ्रमें । मिळावया ॥...॥
परी मनाचेनि स्थैर्यें धरिला । भक्तीचिया भावना भरला ।
योगबळें आवरला । सज्ज होउनी ॥
तो जडाजडातें विरावितु[8] । भ्रूलतांमाजीं[9] संचरतु ।
जैसा घंटानाद लयस्थु । घंटेसींच होय ॥
कां झांकलिये घटींचा दिवा । नेणिजे काय जाहला केव्हां ।
या रीतीं जो पांडवा । देह ठेवी ॥
तो केवळ परब्रह्म । जया परमपुरुष ऐसें नाम ।
तें माझें निजधाम । होऊनि ठाके ॥

ज्ञा. ८. ९१–९९.

---

१ देहदुःखाचा. २ पिंजऱ्यांत. ३ प्रशस्त. ४ गार. ५ देतो. ६ पूर्ण. ७ एकवटलेल्या. ८ लीन करतो. ९ भ्रुकुटीमध्यें.

## १६६. ईश्वरास मिळाल्यावर पुनरावृत्ति नाहीं.

हें एकैक सांगोनि वायां । काय फार करूं धनंजया ।
पैं गेलिया जया ठाया । तो ठावोचि होइजे ॥...॥
तैसा संसार जया गांवा । गेला सांता पांडवा ।
होऊनि ठाके आघवा । मोक्षाचाची ॥...॥
म्हणोनि तूप होऊनि माघौतें । जेवीं दुधपणा न येचि निरुतें ।
तेवि पावोनियां जयातें । पुनरावृत्ति नाहीं ॥
तें माझें परम । साचोकारें निजधाम ।
हें अंतुवट तुज वर्म । दाविजत असे ॥

ज्ञा. ८. १९६–२०३.

---

## १६७. देवभक्तांची अभिन्नता.

जैसा वारा कां गगनीं विरे । मग वारेंपण वेगळें नुरे ।
तेवि भक्त हें पैंज न सरे । जरी ऐक्या आला ॥
जरी पवन हालवूनि पाहिजे । तरी गगनावेगळा देखिजे ।
येऱ्हवीं गगन तो सहजे । असे जैसें ॥
तैसें शरीरीं हन कर्में । तो भक्त ऐसा गमे ।
परी अंतरप्रतीतिधर्में । मीचि जाला ॥
आणि ज्ञानाचेनि उँजिवडलेपणें । मी आत्मा ऐसें तो जाणे ।
म्हणउनि मीही तैसेंचि म्हणे । उचंबळलासांता ॥ ..॥
कां जे तनुमनप्राणें । तें आणिक कांहींच नेणें ।
देखतसांते म्हणे । हे माय माझी ॥
तें येणें मानें अनन्यगति । म्हणऊनि धेनुही तैसीच प्रीति ।
तयालागीं लक्ष्मीपति । बोलिले साचें ॥

१ गेला असतां २ निश्चयेंकरून. ३ अंतरंग. ४ शांत होतो ५ प्रतिज्ञा, ६ वाटतो. ७ उदयानें.

हें असो मग म्हणितलें । जें कां तुज सांगितलें ।
तेही भक्त भले । पढियंते आम्हां ॥
परि जाणोनियां मातें । जे पाहीं विसरले माघौतें ।
जैसें सागरा येऊनि सरिते । मुरडावें ठलें ॥
तैसीं अंतःकरणकुहरीं जन्मली । जयाची प्रतीतिगंगा मज मीनली ।
तो मी हे काय बोलों । फार करूं ॥
यऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे । तो चैतन्यचि केवळ माझें ।
हें न म्हणावें परि काय कीजे । न बोलणें बोलों ॥

ज्ञा. ७. ११४.–१२६.

---

## १६८. जीवन्मुक्तावस्था.

आणि भक्तां तरी देहीं । विशेष एकवंकीचा ठाव नाहीं ।
म्हणऊनि अव्हेर करितां कांहीं । वियोग ऐसा न वाटे ॥
ना तरी देहांतींचि मियां यावें । मग आपणपें यातें न्यावें ।
हेंही नाहीं जे स्वभावें । आधींचि मज मिनले ॥
येरीं शरीराचिया सलिलीं । असतेंपण हेंचि साउली ।
वांचुनि चंद्रिका ते ठली । चंद्रीच आहे ॥
ऐसे जे नित्ययुक्त । तयांसि सुलभ मी सतत ।
म्हणऊनि देहांतीं निश्चित । मीचि होती ॥

ज्ञा. ८. १३६–१३९.

---

## १६९. " ते मरणाऐलीचकडे । मज मिळोनि गेले फुडे. "

मनीं वाचा करणीं । जयांचिया भजनीं देवांचिया वांहाणी ।
ते शरीर जातियेक्षणीं । देवचि जाले ॥

---

१ मागें २ माघारें उलटणें. ३ राहिले. ४ गुहेंत. ५ तादात्म्याचा ६ पत्ता. ७ यऱ्हवीं. ८ इंद्रियें. ९ इंद्रादिकदेवांच्या. १० मार्ग.

अथवा पितरांचीं व्रतें । वाहातीं जयांचीं चित्तें ।
जीवित सरलिया तयांतें । पितृत्व वरी ॥
कां क्षुद्रदेवतादि भूतें । तियेंचि ज्यांचीं परम दैवतें ।
जिहीं अभिचारिकीं[1] तयांतें । उपासिलें ॥
तयां देहाची जवनिका[2] फिटली । आणि भूतत्वाची प्राप्ति जाहली ।
एवं संकल्पवशें फळलीं । कर्मे तया ॥
मग मीचि डोळां देखिला । जिहीं कानीं मीचि ऐकिला ।
मीचि मनीं भाविला[3] । वानिला वाचा ॥
सर्वांगीं सर्वां ठायीं । मीचि नमस्कारिला जिहीं ।
दानपुण्यादिकें जें कांहीं । तें माझियाचि मोहरां[4] ॥
जिहीं मातेंचि अध्ययन केलें । जे आंतबाहेरीं मियांची धाले ।
जयांचें जीवित्व जोडलें । मजचिलागीं ॥
जे अहंकार वाहत अंगीं । आम्हीं हरीचे भूषावयालागीं ।
जे लोभिये एकचि जगीं । माझेनि लोभें ॥
जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम ।
जे माझिया भुली सभ्रम । नेणती लोक ॥
जयांचीं जाणतीं मजचि शास्त्रें । मी जोडें जयांचेनि मंत्रें ।
ऐसे जे चेष्टामात्रें । भजले मज ॥
ते मरणाऐलीचकडे[5] । मज मिळोनि गेले फुडें[6] ।
मग मरणीं आणिकीकडे । जातील केवीं ॥
म्हणोनि मद्याजी[7] जे जाहले । ते माझिया सायुज्या आले ।
जिहीं उपचारमिषें[8] दिधलें । आपणपें मज ॥

ज्ञा. ९. ३५५-३६६.

---

१ जारणमारण कर्म करणाऱ्यांनीं. २ पडदा. ३ कल्पना केली. ४ उद्देशानें. ५ अलीकडे. ६ निश्चयेंकरून. ७ माझे भजन करणारे. ८ सेवेच्या निमित्तानें.

## १७०. देवाशीं ऐक्यतेचीं साधनें.

तरी बाह्य आणि अंतरा । आपुलिया सर्व व्यापारा ।
मज व्यापकातें वीरा । विषय करीं ॥
आघवा आंगीं जैसा । वायु मिळोनि आहे आकाशा ।
तूं सर्वकर्मी तैसा । मजसींचि अस ।
किंबहुना आपुलें मन । करीं माझें एकायतन[1] ।
माझेनि श्रवणें कान । भरूनि घालीं ॥
आत्मज्ञानें चोखडीं[2] । संत जे माझीं रूपडीं ।
तेथ दृष्टी पडो आवडी । कामिनी जैसी ॥
मी सर्ववस्तीचें वसौटें[3] । माझीं नामें जियें चोखटें ।
तियें जीवा यावया वाटे । वाचेचिये लावीं ॥
हाताचे करणें । कां पायाचें चालणें ।
तें होय मजकारणें । तैसें करीं ।
आपुला अथवा परावा-। ठायीं उपकरसी पांडवा ।
तेणें यज्ञें होयीं बरवा । याज्ञिक माझा ॥
हें एकैक शिकऊं कायी । पैं सेवकै[4] आपुल्या ठायीं ।
उरऊनि येर सर्वेही । मी सेव्यचि करीं ॥
तेथ जाऊनि भूतद्वेष । सर्वत्र नमवेन मींचि येक ।
ऐसेनि आश्रय आत्यंतिकें[5] । लाहसीं तूं माझा ॥
मग भरलेया जगाआंत । जाऊनि तिजयाची[6] मात ।
होऊनि ठायील एकांत । आम्हां तुम्हां ॥
तेव्हां भलतिये अवस्थे । मी तूतें तूं मातें ।
भोगिसी ऐसें आइतें । वाढेल सुख ॥
आणि तिजें आडंळकरितें[7] । निमालें अर्जुना जेथें ।
तें मीचि म्हणौनि तूं मातें । पावसी शेखीं ॥
जैसी जळींची प्रतिमा । जळनाशीं बिंबा ।
येतां गाभीगोभा[8] । कांहीं आहे ॥

१ एकस्थान. २ शुद्ध. ३ वसतिस्थान. ४ सेवकपणा. ५ अतिशय. ६ तिसऱ्याची. ७ प्रतिबंध करणारें ८ अडथळा.

पैं पवन अंबरा । कां कल्लोळ सागरा ।
मिळतां आडवारा[1] । कोणाचा गा ॥
म्हणौनि तूं आणि आम्हीं । हें दिसताहे देहधर्मी ।
मग ययाच्या विरामीं । मीचि हौसी ॥

ज्ञा. १८. १३५३–१३६७.

---

## १७१. ऐक्यभक्ति.

तरि जयांचे चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी ।
जयां निजेल्यांतें उपासी । वैराग्य गा ॥
जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि धाले ।
जे शांतीसि झाले । पल्लव नवे ॥
जे परिणामा निघाले कोंभ । जे धैर्यमंडपाचे स्तंभ ।
जे आनंदसमुद्रीं कुंभ । चुबकळोनि भरले ॥
जयां भक्तीची येतुली प्राप्ति । जे कैवल्यातें परते[2] सर म्हणती ।
जयांचिये लीलेमाजि नीति । जियाली दिसे ॥
जे आघवांचि करणी[3] । लेइले शांतीचीं लेणीं ।
जयांचे चित्त गवसणी[4] । व्यापका मज ॥
ऐसे जे महानुभाव । दैविये प्रकृतीचें दैव ।
जे जाणोनियां सर्व । स्वरुप माझें ॥
मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती जे महात्मे ।
परि दुजेपण मनोधर्मे । शिवतलें नाहीं ॥
ऐसें मीचि होऊनि पांडवा । करिती माझी सेवा ।
परि नवलावो तो सांगावा । असे आइक ॥

ज्ञा. ९. १८८–१९६.

---

१ अडचण. २ पलीकडे. ३ इंद्रिय. ४ आच्छादन, पिशवी.

## १७२ अनन्यसाक्षात्कार.

एवं तो बोले तें स्तवन। तो देखे तें दर्शन।
अद्वया मज गमन। तो चाले तेंचि ॥
तो करी ततुली पूजा। तो कल्पी तो जप माझा।
तो निजे तेंचि कपिध्वजा। समाधि माझी।
जैसें कनकेंसीं कांकणें। आसिजे अनन्यपणें।
तो भक्तियोगें येणें। मजसीं तैसा ॥
उदकीं कल्लोळ। कापुरीं परिमळ।
रत्नीं उजाळ[1]। अनन्य जैसा ॥
किंबहुना तंतूसीं पट। कां मृत्तिकेसीं घट।
तैसा तो येकवट। मजसीं माझा ॥
इया अनन्यासिद्धा भक्ति। या आघवाचि दृश्यजातीं।
मज आपणपेंया सुमति। द्रष्टयातें जाणे ॥

ज्ञा. १८. ११८०–८५.

---

## १७३ अद्वैतजागृति.

तेथ अज्ञान सरोनि जाये। आणि यजिता यजन हें ठाये[2]।
आत्मसमरसीं न्हाये। अवभृथीं जेव्हां ॥ ... ॥
जैसा चेइला तो अर्जुना। म्हणे स्वप्नींची हे विचित्र सेना।
मीचि जाहलों होतों ना। निद्रावशें ॥
आतां सेना ते सेना नव्हे। हें मीचि एक आघवें।
ऐसें एकत्वें मानवे। विश्व तया ॥
मग तो जीव हे भाष सरे। आब्रह्म परमात्मबोधें भरे।
ऐसे भजती ज्ञानाध्वरें[3]। एकत्वें येणें ॥

ज्ञा. ९. २४४–२४८.

---

१ चकाकी. २ राहतें. ३ ज्ञानरूपी यज्ञानें.

## १७४ स्वराज्यप्राप्तीचा आनंद.

ऐसी वैराग्याची अंगीं । बाणूनियां वज्रांगी[1] ।
राजयोगतुरंगीं । आरूढला ॥
वरि आड पडिलें दिठी । सानें थोर हि निवटी[2] ।
ते वेळीं[3] विवेकमुठीं । ध्यानाचें खांडें[4] ॥
ऐसेनि संसाररणाआंतु । आंधारीं सूर्य तैसा असे जातु ।
मोक्षविजयश्रिये वरैतु[5] । होआवयालागीं ॥
तेथ आडवावया आले । दोषवैरी जे धोपटिले[6] ।
तयांमाजी पहिलें । देहाहंकार ॥ ... ॥
तयाचा देहदुर्ग हा थारा । मोडुनी घेतला तो वीरा ।
आणि बळ हा दुसरा । मारिला वैरी ॥ ... ॥
तो विषयविषाचा अथावो । आघवियां दोषांचा रावो ।
परी ध्यानखड्गाचा घावो । साहेल कैंचा ॥ ... ॥
तो विश्वासें मारितां रिपु । निवटूनि[8] घातला दर्पु ।
आणि जयाचा अहा कंपु । तापसांसी ॥ ... ॥
तो कामु कोणेची ठायीं[7] । नसे ऐसें केलें पाहीं ।
कीं तेंचि क्रोधाही । सहजें जालें ॥
मुळाचें तोडणें जैसें । होय कां शाखोद्देशीं[9] ।
कामें नासलेनि नासे । तैसा क्रोध ॥
म्हणौनि कामु वैरी । जाला जेथ ठाणोरी[10] ।
तेथ सरली वारी[11] । क्रोधाची ही ॥
आणि समर्थु आपुला खोडा[12] । शिसे वाहवी जैसा होडा[13] ।
तैसा भुंजौनि[14] जो गाढा । परिग्रहो ॥ ... ॥

---

१ कवच. २ संहार करणें. ३ बळकट धरतो. ४ खड्ग, तलवार. ५ वरयितु, वरणारा, भर्ता. ६ बडविले. ७ ठाव, डोह. ८ वध करणें. ९ शाखांच्या उद्देशानें. १० नामशेष, नष्ट. ११ येणेंजाणें. १२ अडकण, बेडी. १३ पैजेनें. १४ उपभोग घेऊन.

शिष्यशाखादिविलासें । मठादि[1]मुद्रेचेनि मिसें ।
घातले आहाती फांसे । निःसंगा[2] येणें ॥
घरीं कुटुंबपणें सरे । तरि वनीं वन्य होऊनि अवतरे ।
नागवियां ही शरीरें । लागला आहे ॥
ऐसा दुर्जयो जो परिग्रहो । तयाचा फेडूनि ठावो ।
भवविजयाचा उत्साहो । भोगितसे तो ॥
तेथ अमानित्वादि आघवे । ज्ञानगुणांचे जे मेळावे ।
ते कैवल्यदेशींचे आववे । रावो[3] जैसे आले ॥
तेव्हां सम्यक्ज्ञानाचिया । राणिवा[4] उगाणूनि[5] तया ।
परिवारु होऊनियां । राहत आंगें ॥
प्रवृत्तीचिये राज[6]बिदीं । अवस्था[7]भेदप्रमदीं ।
कीजत आहे प्रतिपदीं । सुखाचें लोण[8] ॥
पुढां बोधाचिये कांबी[9]वरी । विवेक[10] दृश्याची[11] मांदी सारी ।
योगभूमिका आरती करीं । येती जैसिया[12] ॥
तेथ ऋद्धिसिद्धीचीं अनेगें । वृंदें[13] मिळती प्रसंगें ।
तिये पुष्पवर्षी अंगें । नाहतसे तो ॥
ऐसेनि ब्रह्मैक्यासरिसें । स्वराज्य येतां जवळिके ।
[14]झेळंबित आहे [15]हारिखें । तिन्ही लोक ॥
तेव्हां वैरिया कां मैत्रिया । तयासि माझें म्हणावया ।
समानता धनंजया । उरेचिही ना ॥
हें ना भलतेणें व्याजें । तो जयातें म्हणे माझें ।
तें नो[16]डवेचि कां दुजें । अद्वितीय जाला ॥

ज्ञा. १८. १०४७–१०७४.

---

१ चिन्ह. २ निःसंगमनुष्याप्रत. ३ मांडलिक ४ राज्य. ५ अर्पून. ६ राजमार्ग. ७ जाग्रत-स्वप्न-सुषुप्त्यादि सुंदर स्त्रिया. ८ निंबलोण. ९ सोन्याची कांठी. १० विवेकरूपी चोपदार. ११ गर्दी. १२ जणुंकांहीं. १३ समुदाय. १४ उचंबळणें. १५ हर्षानें. १६ प्राप्त होत नाहीं, सांपडत नाहीं.

## १७५. आत्मानुभवाचा पट्टाभिषेक.

तयावरी जैत रे जैत । म्हणोनि ध्यानाचें निशांण[1] वाजत ।
दिसे तन्मयाचें झळकत । एकछत्र ॥
पाठीं समाधीश्रियेचा अशेखा । आत्मानुभवराज्यसुखा ।
पट्टाभिषेक देखा । समरसें जाहला ॥

ज्ञा. ९. २१७–२१८.

---

## १७६. देवभक्तांचा आत्यंतिक संयोग.

अगा पूर्वापर सागर । यया नामासींचि सिंनार[2] ।
येर आघवें तें नीरें[3] । एक जैसें ॥
तैसा श्रीकृष्ण पार्थ ऐसें । हें आंगाचिपासीं दिसे ।
मग संवादीं जी नसे । कांहींच भेद ॥
पैं दर्पणाहूनि चोखें । दोन्हीं होतीं सन्मुखें ।
तेथ येरीं येरें देखें । आपणपें जैसें ॥
तैसा देवेंसीं पंडुसुत । आपणपें देवीं देखत ।
पांडवेंसीं देखे अनंत । आपणपें पार्थीं ॥
देव देवाभक्तालागीं । जिये विंवर[4] देखे आंगीं ।
येरुं[5]ही तियेचि भागीं । दोन्ही देखे ॥
आणिक कांहींचि नाहीं । म्हणौनि करिती काई ।
दोघे येकपणें पाहीं । नांदताती ॥
आतां भेद जरी मोडे । तरी प्रश्नोत्तर कां घडे ।
ना भेदचि तरी जोडे । संवादसुख कां ॥
ऐसें बोलतां दुजेपणें । संवादीं द्वैत गिळणें ।
तें आइकिलें बोलणें । दोघांचें मियां ॥

---

१ नगारा. २ वेगळेपणा. ३ पाणी. ४ छिद्र. ५ दुसरा, अर्जुन.

उटूनि[1] दोन्ही आरसे । वोडवलियां[2] सरिसे[3] ।
कोण कोणा पाहातसे । कल्पावें पां ॥
कां दीपासन्मुख । ठेविलिया दीपक ।
कोण कोणा आर्थिक[4] । कोण जाणे ॥
नाना अर्कापुढें अर्क । उदयलिया आणिक ।
कोण म्हणे प्रकाशक । प्रकाश्य कवण ॥
हें निर्धारूं जातां फुडें । निर्धारासि ठकें पडे ।
ते दोघे जाले येवढें । संवादें सरिसें ॥
जी मिळतां दोन्ही उदकें । माजि लवण वारूं ठाके ।
कीं तयांसींही निमिखें[6] । तेंचि होय ॥
तैसें श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादलें तें मनीं ।
धरितां मजही वानी[7] । तेचि होतसे ॥
एसे म्हणे ना मोटकें । तंव हिरोनि सात्त्विकें ।
आठव नेला नेणों कें । संजयपणाचा ॥
रोमांच जंव फरके । तंव तंव आंग सुरकें[8] ।
स्तंभस्वेदातें जिंके । एकला कंप ॥
अद्वयानंदस्पर्शें । दिठी रसमय जाली असे ।
ते अश्रु नव्हती जैसें । द्रवत्वाचि ॥
नेणों काय न माय पोटीं । काय नेणों गुंपे कंठीं ।
वागर्थी[10] पडत मिठी । उससाचिया[11] ॥
किंबहुना सात्विकां आठा । चाचरें[12] मांडितां[12] उमेठां[13] ।
संजय जाहलासे चोहटा[14] । संवादसुखाचा ॥

ज्ञा. १८. १५८९–१६०७.

---

१ घासून. २ पुढें ठेवणें. ३ सारखें, एकासमोर एक. ४ इच्छा करणारा. ५ स्तब्धता. ६ क्षणांत. ७ प्रकार. ८ उभारे. ९ संकोचें. १० शब्दार्थाला. ११ श्वासोश्वास. १२ बोबडी वळली असतां. १३ अतिशय. १४ चवाठा.

# ५. उपसंहार.

## १७७. जेथें देवभक्तांचा संयोग आहे तेथें विजय ठेवलेलाच आहे.

यया बोला संजयो म्हणे । जी येरयेरांचें मी नेणें ।
परि आयुष्य तेथें जिणें[1] । हें फुडें[2] कीं गा ॥
चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका ।
संत तेथें विवेका । असणें कीं जी ॥
रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोइरीक ।
वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ॥
दया तेथें धर्म । धर्म तेथें सुखागम ।
सुखीं पुरुषोत्तम । असे जैसा ॥
वसंत तेथ वनें । वन तेथ सुमनें ।
सुमनीं पाळिंगनें[3] । सारंगांचीं[4] ॥
गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन ।
दर्शनीं समाधान । आथि जैसें ॥
भाग्य तेथ विलास । सुख तेथ उल्लास ।
हें असो तेथ प्रकाश । सूर्य जेथें ॥
तैसे सकळ पुरुषार्थ । जेणें स्वामी कां सनाथ ।
तो श्रीकृष्णरावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥
आणि आपलेनि कांतेसीं । ते जगदंबा जयापासीं ।
अणिमादिकी काय दासी । नव्हती तयांतें ॥
कृष्ण विजयस्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें ।
तें जय लागवेगें । तेथेंचि आहे ॥
विजयी नामें अर्जुन विख्यात । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथ ।
श्रीयेसीं विजय निश्चित । तेथेंचि असे ॥

---

१ जगणें. २ निश्चयेंकरून. ३ समुदाय. ४ भ्रमरांचीं.

तयाचिये देशींच्या झाडीं । कल्पतरूतें होडी[1] ।
न जिणावें कां येवढीं । मायबापें असतां ॥

ते पाषाणही आघवे । चिंतारत्नें कां नोहावे ।
तिये भूमिके कां न यावें । सुवर्णत्व ॥

तयाचिया गांवींचिया । नदी अमृतें वाहाविया ।
नवल काय राया । विचारीं पां ॥

तयाचे बिसाट[2] शब्द । सुखें म्हणों येती वेद ।
सदेह सच्चिदानंद । कां नोहावे ते ॥

पैं स्वर्गापवर्ग[3] दोन्हीं । इयें पदें तया अधीनीं ।
श्रीकृष्ण बाप जननी । कमळा[4] जया ॥

म्हणौनि जिया बाहीं उभा । तो लक्ष्मीयेचा वल्लभा ।
तेथ सर्व सिद्धी स्वयंभा । येर मी नेणें ॥

आणि समुद्राचा मेघ । उपयोगें तयाहूनि चांग ।
तैसा पार्थी आजि लाग[5] । आहे तये ॥

कनकत्वदीक्षागुरु । लोहा परीस होय कीरु ।
पारि जगा पोसिता व्यवहारु । तेंचि जाणें ॥
येथ गुरुत्वा येतसे उणें । ऐसें झणें कोणी म्हणे ।
वन्हि प्रकाश दीपपणें । प्रकाशी आपुला ॥
तैसा देवाचिया शक्ती । पार्थ देवासीच बहुतीं ।
परी माने इये स्तुती । गौरव असे ॥
आणि पुत्रें मी सर्वगुणीं । जिणावा हे बाप शिराणी[6] ।
करी, ते शार्ङ्गपाणीं । फळा आली ॥
किंबहुना ऐसा नृपा । पार्थ जालासे कृष्णकृपा ।
तो जयाकडे साक्षेपा[7] । रीती आहे ॥

---

१ पैजेनें. २ भलते, अव्यवस्थित. ३ स्वर्ग व मोक्ष. ४ लक्ष्मी. ५ संबंध
६ आवड, इच्छा. ७ दक्षतापूर्वक.

तोचि गा विजयासि ठावो । येथ तुज कोण संदेहो ।
तेथ नये तरी वावो[1] । विजयोचि होय ॥
म्हणोनि जेथ श्री श्रीमंत । जेथ तो पंडुचा सुत ।
तेथ विजय समस्त । अभ्युदय तेथ ॥
जरी व्यासाचेनि साचें । धिरे मन तुमचें ।
तरी या बोलाचें । ध्रुवत्वचि[2] माना ॥
जेथ तो श्रीवल्लभ । जेथ भक्तकदंब ।
तेथ सुख आणि लाभ । मंगळाचा ॥
या बोला आन होय । तरी व्यासाचा अंक[3] न वाहे ।
ऐसे गाजोनि बाहे । उभिली तेणें ॥

ज्ञा. १८. १६३२–१६५९.

---

## १७८. ईश्वराचें प्रसाददान.

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान[4] हें ॥
जे खळांची व्यंकटी[5] सांडो । तया सत्कर्मीं रति वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवांचें ॥
दुरिताचें[6] तिमिर[7] जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥
वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी[8] ।
अनवरत[9] भूतळीं । भेटो तयां भूतां ॥
चलां[10] कल्पतरूंचे आरव[11] । चेतनां[12] चिंतामणींचे गाव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥

---

१ खोटा. २ सत्यत्व, अढळत्व. ३ शिष्यत्व, अंकितपण. ४ प्रसादाचें दान ५ वक्रदृष्टी. ६ पातकाचें. ७ अंधार. ८ समुदाय. ९ निरंतर, अखंड. १० चालत्या. ११ अंकुर. १२ सजीव.

चंद्रमे जे अलांछन[1] । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥
किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुषीं । अखंडित ॥
आणि ग्रंथोपजीविये । विशेषें लोकीं इयें ।
दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥
येथ म्हणे श्रीविश्वेशरावो । हा होइल दानपसावो[2] ।
येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया जाला ॥

ज्ञा. १८. १७९४–१८०२.

---

## १७९. एकनाथसंशोधन.

श्रीशके पंधराशें साहोत्तरीं । तारणनाम संवत्सरीं ।
येकाजनार्दनें अत्यादरीं । गीताज्ञानेश्वरीप्रति शुद्ध केली ॥
ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध ।
तो शोधूनियां एवंविध । प्रति शुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥
नमो ज्ञानेश्वरा निष्कलंका । जयाची गीतेची वाचितां टीका ।
ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थीयां ॥
बहुकाळ पर्वणी गोमटी । भाद्रपदमास कपिलाषष्टी ।
प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनकामाठीं संपूर्ण जाहाली ॥
ज्ञानेश्वरीपाठीं[3] । जो ओंवी करील मऱ्हाटी ।
तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥

---

१ कलंकरहित. २ दानप्रसाद. ३ मागाहून, अगर पाठांत.

## १ सद्गुरुस्तवन.

आतां उपायवनवसंतु । जो आज्ञेचा आहे[1]वतंतु ॥
अमूर्तचि परि मूर्तु । कारुण्याचा ॥ १ ॥...॥
[2]मोडौनि मायाकुंजरु । [3]मुक्तमोतियांचा [4]बोगरु ॥
जेवविता सद्गुरु । निवृत्ति वंदूं ॥ ३ ॥
जयाचेनि [5]अपांगपातें । बंध मोक्षपणीं [6]आंते ॥
भेटे जाणतया जाणतें । जयापाशीं ॥ ४ ॥
कैवल्यकनकाचिया दाना । जो न [7]कडँसी थोर साना ॥
द्रष्ट्याचिया दर्शना । [8]पाढाउ जो ॥ ५ ॥
सामर्थ्याचेनि [9]बिंकें । जो शिवाचेंही गुरुत्व जिंके ॥
आत्मा आत्मसुख देखे । आरिसां जियें ॥ ६ ॥
बोधचंद्राचिया कळा । विखुरलिया येकवळा ॥
[10]कृपापुनीवलीळा । करी जयाची ॥ ७ ॥
जो भेटलियाचि सवें । [11]पुरती उपायांचे धांवे ॥
प्रवृत्ति-गंगा स्थिरावे । सागरीं जिये ॥ ८ ॥...॥
जयाचेनि कृपासलिलें । जीवु हा ठाववरी [12]पाखाळे ॥
जें शिवपणहि वोंविळें । अंगीं न लवी ॥ ११ ॥...॥
एकपण नव्हे [13]सुसास । म्हणोनि गुरु-शिष्यांचें करोनि [14]मिसें ॥
पाहणेंचि आपुली वास । पाहतसे ॥ १३ ॥...॥
जो उघड कीं न दिसे । प्रकाश कीं न प्रकाशे ॥
असतेपणेंचि नसे । कव्हणीकडे ॥ २६ ॥
आतां जो तो इहीं शब्दीं । कें मेळऊं अनुमानांची [15]मांदी ॥
हा प्रमाणांहि वो नेदी । कोण्हाहि मा ॥ २७ ॥

---

१ सौभाग्याचें मंगलसूत्र. २ नाश करून. ३ हत्तीच्या गंडस्थळांतील मोती. ४ पक्वान्न. ५ अर्धोन्मीलित दृष्टीनें. ६ होतो; येतो. ७ भेदाभेद करीत नाहीं. ८ पुढारी; मार्गदर्शक ९ डौल १० पौर्णिमा. ११ पूर्ण होतात; संपतात. १२ शुद्ध होतो. १३ सुसह्य ; सुखकारक. १४ निमित्त. १५ गर्दी; दाटी.

जेथें शब्दाची लिही पुसे । तेणेंसि चावलों बैसें ॥
दुजयाचा रागीं रुसे । येकपणा जो ॥ २८ ॥
प्रमाणाची परी सरे । तें प्रमेयचि आविष्करे ॥
नवल, मेचुं ये धुंरे । नाहींपणाची ॥ २९ ॥...॥
तेथ नमनें कां बोलें । केउतीं सुयें पाउलें ॥
आंगीं लाऊनि नाडिलें । नांवचि येणें ॥ ३१ ॥...॥
दर्पणेंविण डोळा । आपुले भेटीचा सोहळा ॥
भोगिता तरी लीळा । सांगतों हे ॥ ६८ ॥

अमृ० २×१--६८.

---

## २ सच्चिदानंदातीत परमात्मस्वरूप.

सत्ता प्रकाश सुख । या तिहीं तीं उणें लेखं ॥
जैसें विखपणेंचि विख । विखा नाहीं ॥ १ ॥
कांति कांठिण्य कनक । तिन्ही मिळोनि कनक एक ॥
द्राव गोडी पीयुंख । पीयुखचि जेविं ॥ २ ॥...॥
येऱ्हवीं सच्चिदानंदभेदें । चालिलीं तिन्ही पदें ॥
परि तिन्हीं उणीं आनंदें । केलीं येणें ॥ ६ ॥
सत्ताचि कीं सुख प्रकाशु । प्रकाशुचि सत्ता उल्हासु ॥
हें न निवडे मिठांशुं । अमृतीं जेवीं ॥ ७ ॥
शुक्लपक्षींचिया सोळा । दिवसां वाढती कळा ॥
परि चंद्र मात्र सगळा । चंद्रीं जेवीं ॥ ८ ॥ ..॥
तैसें असताचिया व्यांवृत्ती । सत् म्हणों आलें श्रुति ॥
जडाचिया समाप्ती । चिद्रूप ऐसें ॥ १० ॥
दुःखाचेनि सर्वनाशें । उरलें तें सुख ऐसें ॥
निर्गदिलें निश्वासें । प्रभूचेनि ॥ ११ ॥

---

१ पंक्ति; बोली. २ बोलण्यास. ३ आवड; प्रीति. ४ उत्कटत्वास; उत्कर्षास. ५ बाधक. ६ शब्द. ७ पांढरेपणा. ८ माधुर्याचा अंश. ९ निराकरण. १० सांगितलें; व्यक्त केलें.

ऐसीं सदादि प्रतियोगियें। असदादि तिन्हीं इयें ॥
लोटितां जाली त्रीये। सत्तादिकां ॥ १२ ॥
एवं सच्चिदानंदु। आत्मा हा ऐसा शब्दु ॥
अनन्यावृत्ति सिद्धु-। वाचक नव्हे ॥ १३ ॥...॥
विषो नाहीं कोण्हाही। जया प्रमेयत्वचि नाहीं ॥
तया स्वप्रकाशा काइ। प्रमाण होय ? ॥ १६ ॥
प्रमेयपरिच्छेदें। प्रमाणत्व नांदे ॥
तें काइ स्वतःसिद्धें। वस्तूच्या ठायीं ? ॥ १७ ॥
एवं वस्तूसि जाणों जातां। जाणणेंचि वस्तु तत्वता ॥
मग जाणणें आणि जाणता। कैंचा उरे ? ॥ १८ ॥
म्हणोनि सच्चित्सुख। हे बोल वस्तुवाचक ॥
नव्हती; हे शेष। विचाराचे ॥ १९ ॥
ऐसोनि इयें प्रसिद्धें। चालिलीं सच्चिदानंद पदें ॥
मग द्रष्ट्या स्वसंवादें। भेटती जेव्हां ॥ २० ॥
ते वेळीं वरिसोनि मेघु। समुद्र होऊनि वोघु ॥
सरे दाऊनि मांगु। राहे जैसा ॥ २१ ॥
फळ विऊनि फुल सुके। फळनाशें रस पाके ॥
तोहि रस उंपखे। तृप्तिदानीं ॥ २२ ॥
नाना मुखा मुख दाउनी। आरिसा जाय निगोनि ॥
कां निदैलें चेववुनि। चेवविते जैसें ॥ २४ ॥
तैसा सच्चिदानंदा चोखटा। दाऊनि द्रष्ट्या द्रष्टा ॥
तिन्हीं पदें लागतीं वाटा। मौनाचिया ॥ २५ ॥

अमृ० ५×१--२५.

---

१ अस्तित्व. २ सार. ३ मार्ग. ४ आटतो; शमतो. ५ निद्रिस्त माणूस. ६ जागें करून. ७ विशुद्ध.

## ३. परमात्मस्फुरण

तें दृश्य मोटकें[1] देखे । आपण स्वयें दृष्टत्वें तोखे ॥
तेंचि दिठीचेनि मुखें । माजीं दाटे ॥ १३२ ॥ ... ॥
अंगें अंगावरी पहुडे । चेइला वेगळा न पडे ॥
तया वारुवाचेनि पाडें । घेणें देणें ॥ १३४ ॥ ... ॥
सहस्रवरी बाहिया । आहाती सहास्रार्जुना राया ॥
तरी तो काइ तिया । येकोत्तरा[2]चा ? ॥ १४० ॥ ... ॥
कां नुदैलिया सुधाकरु । आपणपें भरे सागरु ॥
ना कूर्मी गिळी विस्तारु । आपेंआप ॥ १५२ ॥
अंवसेचिये दिवसीं । सतरावियें अंशीं ॥
स्वयें जैसें शशी । रिगणें होय ॥ १५३ ॥ ... ॥
सहजें आघवेंचि आहे । तरी कोणा कोण पाहे ? ॥
तें न देखणेंचि आहे । स्वरूपनिद्रा ॥ १५५ ॥ ... ॥
ना ना ते लता । आपुले वेली गुंडाळितां ॥
घर करी न करितां । जयापरी ॥ १६९ ॥ ... ॥
द्रष्टा दृश्याचा ग्रासीं । मध्यें लखु[3] विकासी ॥
योगभूमिका ऐसी । अंगीं वाजे ॥ १८५ ॥ ... ॥
कां नीद सरोनि गेली । जागृति नाहीं चेयिली ॥
तेव्हां होये आपुली । जैसी स्थिति ॥ १८७ ॥ ... ॥
तयासारिखा ठावो । हा निकरा[4]चा आत्मभावो ॥
येणें कां पाहों । न पाहों लाभे ? ॥ १९२ ॥ ... ॥
सर्वांगें देखणा रवि । परि ऐसें घडे केवीं ॥
जे उदोअस्तूंची चवी । स्वयें घेणें ॥ १९५ ॥ ... ॥
म्हणोनि स्वयंप्रकाशा यया । आपणपें देखावया ॥
निमित्त हा वांचुनियां । नाहींच मा ॥ २३४ ॥ ... ॥

---

१ अल्पमात्र. २ सहस्राधिक. ३ अवस्था. ४ आत्यंतिक.

तैसें दृश्य कां द्रष्टा । या दोन्ही दशा वांझटा ॥
पाहतां येकीं काष्ठा । स्फूर्तिमात्र तो ॥ २४४ ॥ ... ॥
पुढें फरके ना दिसतें । ना मागें डोकावी देखतें ॥
पाहतां येणें ययातें । स्फुरद्रूपेंचि ॥ २४६ ॥ ... ॥
येथें बोलणें न साहे । जाणणें न समाये ॥
अनुभऊ न लाहे । अंग मिरऊं ॥ २५२ ॥ ... ॥
रश्मि सूर्यींच आथी । परि बिंबाबाहेरी जाती ॥
म्हणोनि बोधसंपत्ति । उपमा नोहे ॥ २६२ ॥ ... ॥
म्हणोनि इये आत्मलीळे । नाहीं आन कांटाळें ॥
आतां ययाचिये तुळे । हाचि यया ॥ २६६ ॥

अमृ० ७×१३२–२६६.

---

## ४ ज्ञानाज्ञानातीत चिदादित्याचें वर्णन.

आगी पोतांसाचेनि मिसें । आपणपें जाळिलें जैसें ।
ज्ञाना अज्ञाननाशें । तैसें जालें ॥ ५ ॥ . ॥
तरंगाचें रूपा येणें । तयाचि नांव निमणें ।
कां विजूचें उदैजिणें । तोचि अस्तु ॥ ९ ॥...॥
जैसें कल्पांतीचें भरितें । स्थळाजळा दोहींतें ।
बुडविलिया आरौतें । राहोंचि नेणें ॥ ११ ॥
कीं विश्वाहि वेगळ । वाढे जैं सूर्यमंडळ ।
तैं तेज तम निखळ । तेंचि होय ॥ १२ ॥...॥

अमृ. ४×५–१२.

कां मस्तकान्त निर्धारिली । जो छाया उडों पाहे आपुली ।
तयाची फांकांवली । बुद्धि जैसी ॥ ११७ ॥

अमृ० ७×११७.

---

१ फडकत नाहीं. २ कांटा; तुलना. ३ कापूर. ४ भ्रमली.

हा ठावोवरी गुरुरायें । नांदविलों उवायें[1] ।
जे आम्ही न समाये । आम्हांमाजीं ॥ ३ ॥ ..॥
आमुची करवे गोठी[2] । ते जालीचि नाहीं वाक्सृष्टी ।
आमुतें देखे दिठीं । ते दिठीचि नव्हे ॥ ५ ॥...॥
किंबहुना श्रीनिवृत्तीं । ठेविलों असों जया स्थितीं ।
ते काइ देऊं हातीं । वाचेचिया ॥ ८ ॥...॥
जैसीं दंपत्यें परस्परें । तोडोनि पालटिलीं शिरें ।
तेथें पालटु ना पण सरे । दोहींचें जिणें ॥ १३ ॥ ..॥
एवं ज्ञानाज्ञानें दोन्ही । पोटीं सूनि अहर्नी[3] ।
उदेला चिद्गगनीं । चिदादित्यु हा ॥ १९ ॥

अमृ० ८×३-१९

---

## ५ ब्रह्मनिष्ठावस्था.

तैसें भोग्य आणि भोक्ता । दिसे आणि देखता ।
हें सरलें अद्वैता । अस्फुटामाजीं ॥ ७ ॥
सेवंतेपणा बाहेरी । न निगतांचि परी ।
पांतीं[4] सहस्त्रवरी । उपलें[5] विजेते ॥ ८ ॥...॥
म्हणोनि विषयांचेनि नांवें । सूनि इंद्रियांचे थवे ।
सैंघ घेती धांवे । समोरही ॥ १० ॥
परी आरिसा शिवे शिवे । तंव दिठीसी दिठी फावे ।
तैसे जाले धांवे । वृत्तीचे या ॥ ११ ॥...॥
हातापाशीं स्पर्शु । डोळ्यापाशीं रूपसु ।
जिव्हेपाशीं मिठांशु । कोणही एकु ॥ १४ ॥
तऱ्ही परिमळापरौतें । मिरवणें नाहीं कापुरातें ।
तेंवि बहुतापरी स्फुरतें । तेंचि स्फुरे ॥ १५ ॥ ..॥

---

१ सुखानें; आनंदानें २ वर्णना. ३ दिवस व रात्र. ४ पाकळ्या. ५ उकलतात; फुलतात. ६ शिवे न शिवे तोंच.

जियें पेरीं दिसतीं उसीं । तियें लाभती कीं रसीं ।
कांति जेविं शशीं । पुनिवेचिया ॥ १८ ॥
पडिलें चांदावरी चांदिणें । समुद्रीं झालें वरिषणें ।
विषयां करणें । भेटती तैशीं ॥ १९ ॥
म्हणोन तोंडाआड पडे । तेंहि वाचा वावडे ।
परी समाधि न मोडे । मौनमुद्रेची ॥ २० ॥
व्यापाराचे गांडे । मोडतांहि अपाडे ॥
अक्रियेचें न मोडे । पाऊल केंही ॥ २१ ॥...॥
चंद्र वेंचूं गेला चांदिणें । तव वेंचिलें काय कोणें ।
विऊनि वांझे स्मरणें । होतीं जैसीं ॥ २६ ॥...॥
द्वैतदशेचें आंगण । अद्वैत वोळगे आपण ।
भेदा तंव तंव दुणें । अभेदासी ॥ २९ ॥
कैवल्याहि चढावा । करीत विषयसेवा ।
जाला भृत्य-भज्य कालोवा । भक्तीचिया घरीं ॥ ३० ॥ ..
जाला स्वेच्छाचि विधि । स्वैर जाला समाधि ।
दशे ये मोक्षऋद्धि । बैसौं घापे ॥ ३४ ॥

अमृ० ९×७–३४.

---

## ६ अभेदभक्ति.

जाला देवोचि भक्तु । ठावोचि जाला पंथु ।
होऊनि ठेला एकांतु । विश्वचि हें ॥ ३५ ॥
भलतेउनि देवें । भलतेन भक्त होआवें ।
बैसला तेथ रांणिवें । अकर्मु हा ॥ ३६ ॥
देवाचिया दाटणीं । देउळा जाली आटणी ।
देशकाळादि वाहाणीं । येईच ना ॥ ३७ ॥...॥

---

१ चंद्राच्या कळा. २ बडबडे. ३ समुदाय; ढीग. ४ दुपटी; वाढ ५ वरचढपणा. ६ देवभक्त. ७ ऐक्य; एकरूपता. ८ मुक्कामाचें ठिकाण प्राप्यस्थान. ९ राज्यपदीं. १० विस्तार; व्यापकता.

अवधिया उपचारा । जपध्याननिर्धारा ।
नाहीं आन संसरा[1] । देवोवांचुनी ॥ ४० ॥...॥
देव देऊळ परिवारु । कीजे कोरूनि डोंगरु ।
तैसा भक्तीचा व्यवहारु । कां न व्हावा? ॥ ४३ ॥...॥
दीप्तीचीं लुगडीं । दीपकलिके तूं वेढी ।
हें न म्हणतां ते उघडी । ठाके काई ? ॥ ४६ ॥...॥
म्हणोनि भजतां भजावें । मा न भजतां काय नव्हे ।
ऐसें नाहीं स्वभावें । श्रीशिवुचि असे ॥ ४९ ॥...॥
म्हणौनि उपनिषदें । दशे येती निंदे ।
निंदाचि विशदें । स्तोत्रें होतीं ॥ ५१ ॥
ना तरी निंदास्तुति । दोन्ही मौनासाठीं जाती ।
मौनीं मौन आथी । न बोलतां बोलीं ॥ ५२ ॥...॥
कर्माचा हातु न लगे । ज्ञानाचेंहि कांहीं न रिगे ।
ऐसीचि होतसे आंगें[2] । उपास्ति हे ॥ ५९ ॥
निफजे ना निमे । आंगें आंग घुमे[3] ।
सुखा सुख उपमे । देववेल यया ? ॥ ६० ॥
कोण्ही एक अकृत्रिम । भक्तीचें हें वर्म ।
योगज्ञानादि विश्राम । भूमिका हे ।' ६१ ॥

अमृ० ९×३५--६१.

---

## ७ समारोप

परि गा श्रीनिवृत्तिराया । हातींतळीं[4] सुखविलें तूं या ।
तरी निवांतचि मियां । भोगावें कीं तें ॥ १ ॥...॥
परि महेशें सूर्याहातीं । दिधली तेजाची सुती[5] ।
तया भासा[6] अंतर्वर्ती । जगचि केलें ॥ २ ॥ ..॥

---

१ अवकाश; जागा. २ आपोआप; सहज. ३ रममाण होते. ४ मस्तकावर हात ठेवून. ५ सूत्र. ६ प्रकाशानें.

म्हणौनि हें अंसंवर्य । दैविकीचें औदार्य ।
वांचोनि स्वातंतर्य । माझें नाहीं ॥ ६ ॥...॥
पढियंतें सदा नेंवि । परी भोगीं नवी नवी रुचि ।
म्हणौनि हा उचिनुचि । अनुवाद सिद्ध ॥ १३ ॥
या कारणें मिथां । गौण्य दाविलें बोलूनियां ।
ऐलें नाहीं, आर्यसया । प्रकाशुचि ॥ १४ ॥...॥
आवणया आपणवें । निरूपण काय ओपे ? ।
मा उगेंपण हारपे । ऐसें आहे ? ॥ १६ ॥...॥
म्हणोनि माझी वैखरी । मौनाचेंहि मौन करी ।
हे पाणियावरी मकरी । रेखिली पां ॥ १७ ॥...॥
एवं दशोपनिषदें । पुढारीं न ढळती पदें ।
देखोनि बुडी बोधें । येथेंचि दिधली ॥ १८ ॥...॥
ज्ञानदेवो म्हणे श्रीमंत । हें अनुभवामृत ।
सेवोनि जीवन्मुक्त । हेंचि होतु ॥ १९ ॥...॥
मुक्ति कीर वेल्हाळ । अनुभवामृत निखळ ।
परी अमृताहि उठी लाळ । अमृतें येणें ॥ २० ॥ ..॥
म्हणोनि ज्ञानदेवो म्हणे । अनुभवामृतें येणें ।
सणु भोगिजे सणें । विश्वाचेनि ॥ २१ ॥ ..॥

अमृ० १०×१-२१.

---

## चांगदेवपासष्टी.

### १ देव प्रगटहि नाहीं व लपलेलाहि नाहीं.

स्वस्ति श्रीवटेशु । जो लपोनि जगदाभासु ।
दावी, मग ग्रासु । प्रगटला करी ॥ १ ॥

---

१ अफाट; अनावर. २ दैवी संपत्तीचें. ३ आवडतें. ४ सहजच. ५ अर्पावें ६ चांगा वटेश.

प्रगटे तंव तंव न दिसे । लपे तंव तंव आभासे ।
प्रगट ना लपाला असे । न खोमता जो ॥ २ ॥
बहु जंव जंव होये । तंव तंव कांहींच न होये ।
कांहीं न होनि आहे । अवघाचि जो ॥ ३ ॥ ... ॥
परमाणूंचिया मांदियां । पृथ्वीपणें न वचेचि वायां ।
तेवि विश्वस्फूर्ति इया । झांकवेना जो ॥ ६ ॥
कळांचेनि पांघुरणें । चंद्रमा हारपों नेणे ।
कां वन्हि दीपपणें । आन नोहे ॥ ७ ॥ ... ॥
जैंवि नाममात्र लुगडें । यऱ्हवीं सुतचि तें उघडें ।
कां माती मृद्भांडें । जयापरी ॥ ९ ॥
तैंवि द्रष्टा-दृश्यदशे-। अतीत दृङ्मात्र जें असे ।
तेंचि द्रष्टादृश्यमिसें । केवळ होय ॥ १० ॥
अलंकार येणें नामें । असिजे निखिल हेमें ।
नाना अवयव संभ्रमें । अवयविया जैंवि ॥ ११ ॥
तैंवि शिवोनि पृथ्वीवरी । भासती पदार्थांचिया परी ।
प्रकाशे, ते एकसरी । संवित्ति हे ॥ १२ ॥ ... ॥
न लिंपतां सुखदुःख । येणें आकारें क्षोभोनि नावेक ।
होय आपणेया सन्मुख । आपणचि जो ॥ १६ ॥
तैंवि आपणचि आपुला पोटीं । आपणया दृश्य दावीत उठी ।
द्रष्टा दृश्य दर्शन त्रिपुटी । मांडे तें हें ॥ १८ ॥ ... ॥
नुसधें मुख जैसें । देखिजतसें दर्पणमिसें ।
वायांचि देखणें एसें । गमों लागे ॥ २० ॥

चां० पा. १–२०.

---

## २ ज्ञानदेव--चक्रपाणी हे दोन डोळस आरसेच होत.

तया पुत्र तूं वटेश्वराचा । रवा जैसा कापुराचा ।
चांगया मज तुज आपणयाचा । बोल एक ॥ ३७ ॥

---

१ कमी न होणारा; अविकारी. २ दाटीनें; गर्दींत. ३ केवल ज्ञान-स्वरूप. ४ ज्ञान. ५ क्षणभर; क्षणमात्र.

ज्ञानदेव म्हणे । तुज माझा बोल ऐकणें ।
तें तळहाता तळीं मिठी देणें । जयापरी ॥ ३८ ॥...॥
सोनिया वरकल सोनें जैसा । कां मुख मुखा हो आरिसा ।
मज तुज संवाद तैसा । चक्रपाणि ॥ ४० ॥...
सखया तुझेनि उद्देशें । भेटावया जीव उल्हासे ।
कीं सिद्धभेटी विसकुसे । ऐसिया विहे ॥ ४२ ॥
घेवों पाहें तुझें दर्शन । तंव रूपा येवों पाहे मन ।
तेथें दर्शना होय अवंजतन । ऐसें गमों लागे ॥ ४३ ॥...॥
लवण पाणियाचा थावो । माजि रिघोनि गेलें पाहों ।
तंव तेंचि नाहीं मा काय घेवों । माप जळा ॥ ४६ ॥
तैसें तुज आत्मयातें पाही । देखों गेलिया मीचि नाहीं ।
तेथें तूं कैंचा काई । कल्पावेया जोगा ॥ ४७ ॥ ..॥
रुचातियाचेनि मिसें । रुचितें जेविजे जैसें ।
कां दर्पणव्याजें दिसे । देखतें जेवि ॥ ५४ ॥...॥
तैसीं अप्रमेयें प्रमेयें भरलीं । मौनाचीं अक्षरें भलीं ।
रचोनि गोष्टी केली । मोळियेची ॥ ५५ ॥
इयेचें करूनि व्याज । तूं आपणयातें बुझ ।
दीप दीपपणें पाहे निज । आपुलें जैसें ॥ ५६ ॥
तैसी केलिया गोठी । तया उघडिजे दृष्टी ।
आपणिया आपण भेटी । आपणामाजीं ॥ ५७ ॥
जालिया प्रलयीं एकार्णव । अपार पाणियाची धांव ।
गिळी आपुला उगर्व । तैसें करी ॥ ५८ ॥
ज्ञानदेव म्हणे नामरूपें- । विण तुझें साच आहे आपणपें ।
तें स्वानंदजीवनपें । सुखिया होईं ॥ ५९ ॥

---

१ कसोटीचा दगड. २ बिघडेल; विसकटेल. ३ निराकरण; अभाव. ४ ठाव; खोली. ५ एकत्वाची; ऐक्याची. ६ निमित्त. ७ जाणून घे. ८ उगम.

चांगया पुढत पुढती । घरा आलिया ज्ञानसंपत्ति ।
वेद्यवेदकत्वहि अतीतीं । पदीं बैसें ॥ ६० ॥
चांगदेवा, तुझेनि व्याजें । माउलिया श्रीनिवृत्तिराजें ।
स्वानुभवरसाळ खाजें[1] । दिधलें लोभें ॥ ६१ ॥
एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे । दोन्ही डोळस आरिसे ।
परस्परां पाहतां कैसें । मुकले भेदा ॥ ६२ ॥
तियेपरि जो इया । दर्पण करील ओंविया ।
तो आत्माएवढिया । मिळेल सुखा ॥ ६३ ॥

चां० पा. ३७–६३.

---

1 खाऊ.

# अध्यायसूचि.




| ओंव्या | पृष्ठ |
|---|---|
| **अध्याय १ ला.** | |
| २२–२७. | ३ |
| **अध्याय २ रा.** | |
| २३७–२४२. | १०९ |
| २५६–२६३. | ५१ |
| २९७–३००. | १६७ |
| ३११–३१४. | ६४ |
| ३६२–३६७. | १६२ |
| **अध्याय ३ रा.** | |
| ६८–७४. | १६६ |
| ८५–९४. | १२४ |
| १५५–१५९ | १२० |
| १७२–१७६. | १२० |
| **अध्याय ४ था.** | |
| ८–११. | १८० |
| ९९–१०२. | ११९ |
| १६५–१७१. | १४८ |

| ओंव्या | पृष्ठ |
|---|---|
| **अध्याय ५ वा.** | |
| १०५–१०८. | १६१ |
| १३१–१३५. | १७५ |
| **अध्याय ६ वा.** | |
| ३२–३५. | ४ |
| ४९–५३. | ११० |
| ८१–८४. | ११० |
| ९०–१०४. | १६६ |
| १५२–१६०. | १३७ |
| १६३–१७९. | १५३ |
| १८६–१९१. | १६४ |
| २७४–२७९. | १५४ |
| ३४९–३५१. | १११ |
| ३६०–३६७. | १६५ |
| **अध्याय ७ वा.** | |
| १०–१३. | १७५ |
| ६८–९७. | ४२ |
| ११४–१२६. | ११० |
| १३०–१३४. | १७६ |

| ओंव्या | पृष्ठ |
|---|---|
| **अध्याय ८ वा.** | |
| ७५–८०. | १५[illegible] |
| ८१–८३. | १५१ |
| ८७–९०. | १५७ |
| ९१–९९. | १८८ |
| १२०–१३४. | १८८ |
| १३६–१३९. | १९० |
| १९६–२०३. | १८९ |
| २४८–२५७. | १६४ |
| **अध्याय ९ वा.** | |
| ११०–१२९. | १४ |
| १४०–१५२. | ४५ |
| १५६–१७१. | ४६ |
| १८८–१९६. | ११३ |
| १९७–२११. | १५१ |
| २१७–२१८. | ११७ |
| २२१–२२७. | ६६ |
| २४४–२४८. | ११४ |
| २५०–२६१. | १४५ |
| २८०–२८५. | ४३ |
| २८६–२९३. | ४३ |
| ३००–३०५. | ४२ |
| ३०७–३३४. | १२३ |
| ३३५–३४३. | १८२ |
| ३५५–३६६. | १२१ |
| ३६७–३८१. | ५० |
| ३८२–३९७. | १८५ |
| ४००–४०६. | १२७ |
| ४१८–४२८. | १४१ |
| ४३०–४४०. | १४४ |
| ४४१–४६०. | १४३ |
| ४६५–४७१. | १४० |
| ४९०–४९४. | १३८ |
| ४९६–५१६. | १४० |
| **अध्याय १० वा** | |
| ९–१५. | ४ |
| ६५–६९. | ५० |
| ७२–८०. | ५२ |
| ९८–११८. | ४८ |
| ११९–१२८. | १७९ |
| १२९–१३९. | १८४ |
| १४१–१४३. | १५७ |
| १४४–१७२. | १४७ |
| १९२–२००. | १६३ |
| २५९–२६३. | ५२ |
| **अध्याय ११ वा.** | |
| १७–२४. | १० |
| २८–३८. | ५३ |

| ओंव्या | पृष्ठ |
|---|---|
| ८१-८८. | ५४ |
| १५४-१५९. | ५५ |
| १७६-१९६. | ५५ |
| २२६-२३४. | १५८ |
| २३७-२४१. | १५८ |
| २४५-२५४. | १७४ |
| २७१-२७९. | १५९ |
| ३२६-३३६. | ४७ |
| ३६६-३७०. | १७४ |
| ४६६-४७०. | ४४ |
| ५१९-५३२. | १५६ |
| ५५५-५७४. | ५६ |
| ६०९-६३९. | ५८ |
| ६४०-६४६. | ५९ |
| ६८५-६९१. | १४४ |

## अध्याय १२ वा.

| ओंव्या | पृष्ठ |
|---|---|
| १-१९. | ६ |
| ३४-३९. | ५९ |
| ४०-५९. | ६० |
| ६०-७५. | १५५ |
| ७६-८५. | १८३ |
| ८७-९६. | १८६ |
| १०४-११३. | १५२ |
| ११४-१२४. | १२७ |
| १४४-१६३. | १८१ |
| १९०-१९६. | १६१ |
| १९७-२१३. | १११ |
| २१४-२३७. | १८५ |

## अध्याय १३ वा.

| ओंव्या | पृष्ठ |
|---|---|
| १-५. | ६ |
| १३४-१४१. | १४ |
| १५१-१५६. | २५ |
| १८५-२०२. | ६६ |
| २०३-२१७. | ६८ |
| २४१-२५५. | ६९ |
| २६१-२७२. | ७१ |
| २७३-२७६. | ७० |
| २७८-२९०. | ७० |
| २९३-३१२. | ७३ |
| ३४४-३५१. | ७३ |
| ३५६-३६७. | ७४ |
| ३६९-३८४. | ७५ |
| ३८५-३९०. | ७५ |
| ३९६-४०३. | ७६ |
| ४०४-४०८. | ७६ |
| ४३१-४३६. | ७७ |
| ४४२-४५९, | ७८ |
| ४६२-४८४. | ८० |
| ४८५-४९९. | ८१ |
| ५०२-५१२. | ८२ |
| ५१३-५२४. | ८३ |
| ५२५-५३४. | ८४ |

| ओंव्या | पृष्ठ |
|---|---|
| ५३६–५९०. | ८६ |
| ५९४–५९९. | ८७ |
| ६०४–६११. | ८८ |
| ६१२–६१४. | ८७ |
| ६१६–६३३. | ८९ |
| ६५३–८५२. | ९७ |
| ८६६–८८९. | ६२ |
| ९१५–९३८. | ६१ |
| ९५८–१०३६. | १८ |
| १०३७–१०४७. | १३८ |
| १०५९–१०८०. | ४८ |
| १०९५–११२४. | २६ |

अध्याय १४ वा.

| | |
|---|---|
| १–१६. | ७ |
| ६८–११७. | १९ |
| ११८–१२८. | ४९ |
| १२९–१५४. | १२९ |
| १६१–१७२. | १३० |
| १७४–१९४. | १३१ |
| २०५–२१४. | २७ |
| २१५–२२२. | २८ |
| २२७–२४३. | २९ |
| २४४–२६०. | ३० |
| २८७–३१५. | १३३ |
| ३१९–३४८. | १६९ |
| ३५०–३६५. | १७० |

| ओंव्या | पृष्ठ |
|---|---|
| ३७१–३८१. | १७१ |
| ३८२–३८७. | १७२ |
| ३८९–४००. | १७३ |

अध्याय १५ वा.

| | |
|---|---|
| १–८. | ८ |
| १८–२८. | १० |
| ४६–७०. | ३४ |
| ७२–७९. | ३५ |
| ८०–९०. | ३६ |
| ११०–१४०. | ३८ |
| २१०–२२३. | ३९ |
| २२४–२५४. | ४० |
| २५५–२६५. | १३४ |
| २६६–२८३. | १६० |
| २८४–३०५. | १६८ |
| ३१७–३३४. | ३१ |
| ३६१–३९०. | ३३ |
| ४७१–४७७. | २० |
| ४७८–५०१. | २१ |
| ५०२–५२४. | २२ |
| ५२६–५३२. | २३ |
| ५४०–५५६. | २४ |

अध्याय १६ वा.

| | |
|---|---|
| १–१६. | १४ |

| ओंव्या | पृष्ठ |
| --- | --- |
| १७–३०. | ९ |
| ६८–१०८. | ९९ |
| ११३–१८५. | १०४ |
| १८६–२०६. | १०५ |
| २०७–२१२. | १०६ |
| २१७–२६३. | १०९ |
| ४२४–४४४. | १३६ |

**अध्याय १७ वा.**

| ओंव्या | पृष्ठ |
| --- | --- |
| १७०–१८४. | ११३ |
| २००–२१३. | ११४ |
| २१५–२२३. | ११५ |
| २२४–२३६. | ११६ |
| २४२–२५२. | ११६ |
| २५४–२६२. | ११७ |

**अध्याय १८ वा.**

| ओंव्या | पृष्ठ |
| --- | --- |
| १२५–१३४. | १२६ |
| १४९–१६४. | १२२ |
| १६६–१७६. | १२५ |
| ९१६–९२२. | १२८ |
| ९६६–९८४. | १४९ |
| ९९६–१०१०. | १७५ |
| १०४७–१०७४. | १९६ |
| १०७६–१०८९. | १७८ |
| ११८०–११८५. | १९४ |
| १३५३–१३६७. | १९३ |
| १३९८–१४१६. | १९९ |
| १५८९–१६०७. | १९८ |
| १६३२–१६५९. | २०१ |
| १७०८–१७३५. | १३ |
| १७५१–१७६३. | ३ |
| १७९४–१८०२. | २०२ |
| १८०३–१८११. | १ |